बन्मस्त झालेल्या कित्येक स्त्रियांचे उद्धार, कृष्णाच्या पुत्रपौत्रांचें व वंशाचें वर्णन वगैरे संकीर्ण विषय आहेत. हे दोन्ही अध्याय विशेष मनोरम नसून देखील पंतांनीं त्यांचा अनुक्रमें ३३ व ५५ आर्याइतका विस्तार केला आहे; व तो विस्तारही फारसा मनोरम झाला आहे असें नाहीं. उत्तरार्धांतील पूर्वीच्या ५० ते ८८ या अध्यायांत पंतांचें प्रत्येक अध्यायास प्रमाण सरासरी ११ आर्याइतकें पडतें. आधीं इतका संक्षेप करून शेवटच्या दोन अध्यायांतच इतका विस्तार करण्याचें कारण पंतांच्या मंत्ररचनेकडे लक्ष दिलें म्हणजे उत्तम रीतीनें सांपडतें. पंतांना दशमस्कंधांत एकंदर १०८ मंत्र साधावयाचे होते. या 'भागवतमंत्रमुक्तामणिमाले'त बरोबर १०८ मंत्रमणि जे ओवले गेले ते केवळ यदृच्छेनें नसून १०८ या संख्येंत कांहीं पुण्यप्रदत्व आहे अशा समजुतीस अनुसरून पंतांनीं ती संख्या साधावयाचा आधींपासूनच संकल्प करून ठेवला होता. त्यांनीं साधारण अंदाजानें ठरविलेल्या संक्षेपाच्या धोरणास अनुसरून जेव्हां ते ८८ पर्यंत अध्याय रचीत आले तेव्हां त्यांच्या लक्षांत आलें कीं संक्षेपाचें हेंच प्रमाण कायम ठेवल्यास शेवटपर्यंत १०८ मंत्र साधून होणार नाहींत. कांहीं कमी पडतील. तेव्हां या उत्पन्न झालेल्या अडचणीकरितां आतापर्यंत रचलेला सर्व उत्तरार्ध मोडून टाकण्यापेक्षां ८९ व ९० या उरलेल्या अध्यायांतच प्रमाणाबाहेर विस्तार करून १०८ ही मंत्रसंख्या साधावी असें त्यांनीं ठरविलें अशी वस्तुस्थिति असल्याशिवाय अनेक रमणीय कथांनीं भरलेल्या मागील सर्व अध्यायांची प्रत्यकीं केवळ दहा अकरा आर्या इतक्या अल्प अवकाशांत बोळवण करून याच शेवटच्या दोन अध्यायांत त्यांनीं इतका प्रमाणाबाहेर विस्तार करावा याची उपपत्ति लागत नाहीं असो. एकंदरीनें मंत्रभागवताचा उत्तरार्ध पूर्वार्धाप्रमाणेंच सुंदर वठला आहे. पूर्वार्धाइतके वात्सल्याचे व प्रेमाचे प्रसंग यांत नसल्यानें वर्णनाचा रंग किंचित् फिका पडल्यासारखा वाटतो. पण तो फिकेपणा पूर्वार्धाशीं तुलना करण्याचें मनांत आणल्यासच लक्षांत येईल. एरवीं तुलना न करतां म्हणावयाचें झालें तर हा उत्तरार्ध उत्तमच वठला आहे असेंच कोणीही म्हणेल. विशेषतः रुक्मिणीविवाहप्रसंग ( आर्या ६९७–७२५ ), शाल्ववधप्रसंग ( आ० ९४१–९७० ), इत्यादि प्रसंग त्यांतल्या त्यांत अधिक सुंदर झाले आहेत. नारदाला कृष्णानें आपल्या सहस्रशः स्त्रियांशीं सह चाललेल्या गृहस्थधर्माचरणाचा दाखविलेला चमत्कार ( अ० ६९ ), व रुक्मिणी वगैरे कृष्णस्त्रिया द्रौपदीला आपल्या विवाहकथा सांगतात तो कथाभाग ( अ० ८३ ), असे दोन कथांश मात्र पंतांनीं गाळले आहेत. फक्त एकेक

आर्येत त्यांचा निर्देश केला आहे. हे प्रसंग कृष्णविजयांत अत्यंत विस्तारानें व उल्लासानें वर्णिले असल्यामुळेंच येथें गाळले आहेत हें उघड आहे.

---

## [ एकादश स्कंध ]

८०. एकादश व द्वादश हे दोन स्कंध मिळून मंत्रभागवताच्या तीन माळांपैकीं तिसरी माळा होते. तिचें निरीक्षण करण्यास आतां प्रारंभ करूं.

एकादश स्कंध म्हणजे मुमुक्षूंस अत्यंत प्रिय अशी वेदान्तसुधारसाची बापीच होय. देवोत्तम श्रीकृष्णानें भक्तश्रेष्ठ उद्धवाला अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रेमानें सांगितलेलें ब्रह्मज्ञान; व तें सांगून झाल्यानंतर उद्धवाला मित्रत्वाचा मान देऊन

अप्युद्धव त्वया ब्रह्म सखे समवधारितम् ।
अपि ते विगतो मोहः शोकश्चासौ मनोभवः ॥ भा. ११. २९. २९.

अशी सौहार्दानें व कळकळीनें केलेली पृच्छा; आणि स्वतः निवेदन केलेल्या सारभूत ज्ञानाबद्दल

नैतद्विज्ञाय जिज्ञासोर्ज्ञातव्यमवशिष्यते ।
पीत्वा पीयूषममृतं पातव्यं नावशिष्यते ॥ भा. ११.२९.३१

अशा तऱ्हेचा दिलेला निर्वाळा या गोष्टी कोणाचें चित्त थोडेंसें तरी भक्तिप्रवण करणार नाहींत ? तें भक्तियोगाचें प्रतिपादन व तो उद्धवश्रीकृष्णांचा प्रेमप्रसंग पाहून पाखंडी असेल तोही किंचित्काल तरी मस्तक नम्र करील; निष्ठुर व्यवहाराच्या रुक्षतेनें कोरडा ठणठणीत बनलेला असेल तोही थोडा तरी द्रवेल. मग पंत तर काय मोठ्या योग्यतेचे भगवद्भक्त होते व प्रेमरसाचा अखंड साठा हृदयामध्यें असलेले सहृदय रसिक होते. त्यांना या उद्धवकृष्णसंवादाची अलौकिकता तत्काळ पटून त्यानीं त्याच्या मुळांतील सौंदर्यास शोभेल अशा तऱ्हेचा महाराष्ट्र वेष त्यास देण्याचें योजिलें असल्यास त्यांत नवल काय ? पंतांना वेदान्ताचें विशेष प्रतिपादन आपल्या काव्यांत करणें रुचत नसे. त्यांनीं आधारास घेतलेल्या मूळ ग्रंथांतील वेदान्ताचें प्रतिपादन सर्वत्र टाळलें आहे. महाभारतांतील शांतिपर्व, अनुशासनपर्व व भागवतांतील अनेक वेदान्तमय प्रकरणें वगैरे भागांचा त्यांनीं कसा अतिसंक्षेप केला आहे हें पंतभक्तांच्या आजपर्यंत अनेकवार नजरेस आलेंच आहे. तथापि, असें असतांना देखील वेदान्ताविषयींच्या, आपल्या उदासीन वृत्तीला त्यांनीं आपण होऊन दोन अतिसय ठळक असे अप-

साद करून ठेवले. ते म्हणजे भगवद्गीता व भागवतांतील एकादशस्कंध यांचे होत. या दोन्ही ग्रंथांवर पंतांनीं आपल्या टीका लिहिल्या असून त्या अत्यंत व्यवस्थेनें, काळजीनें व विस्तारानें तयार केल्या आहेत. या एका गोष्टीवरूनच पंतांच्या मनांत या दोन्ही ग्रंथांबद्दल किती आदर व पूज्यभाव वसत होता हें स्पष्ट दिसून येतें. गीतेस जो मान द्यावासा वाटला तोच मान त्यांनीं एकादशस्कंधासही दिला. आणि हें त्यांनीं योग्यच केलें असें कोणीही म्हणेल. हे दोन ग्रंथ म्हणजे श्रीकृष्णानें आपल्या अत्यंत जिव्हाळ्याच्या दोन भक्तसख्यांना अत्यंत प्रेमानें अर्पिलेले उपदेशामृताचे चषकच होत. त्या 'कार्तस्वरमणिचषकां' तील अमृत पंतांनीं आपल्या 'पलाशद्रुमदलपुटकां' मध्यें ओतून प्राकृत वाचकांस प्यायला देण्याची सोय केली हें ठीकच झालें.*

८१. भगवद्गीतेप्रमाणें एकादशस्कंधांतील प्रतिपादन आंतील तत्वांच्या दृष्टीनें जरी अनुपम असलें तरी बाह्यांगाच्या दृष्टीनें गीतेपेक्षां जरा कमी प्रतीचें ठरेल. गीतेमधील प्रतिपादन सर्वत्र द्राक्षापाकसम किंवा स्फटिकवत् आहे. भागवतांतील एकादशामध्यें सर्वत्रच तसली अंतर्बाह्य प्रसादपूर्ण शैली आढळून यावयाची नाहीं. कांहीं ठिकाणीं भाषेस थोडेंबहुत काठिन्य व गहनता आली आहे. तथापि पंतांचें रूपांतर मात्र सर्वत्र एकसारखें गंभीर, सरळ व प्रसादपूर्ण वठलें आहे. मुळांत जेथें जेथें काठिन्य आलें आहे तेथील कल्पना पंतांनीं क्वचित् ठिकाणीं विस्ताराचा दोष पत्करूनदेखील अगदीं सुगम भाषेंत यथार्थ रीतीनें वर्णिल्या आहेत. मुळामधील १३६७ श्लोकांचा हा स्कंध पंतांनीं ६४९ आर्यांत आणला आहे, म्हणजे मुळाच्या फक्त एक द्वितीयांशाइतका संक्षेप केला आहे. मुळाच्या मानानें संक्षेपाचें इतकें अल्प प्रमाण मंत्रभागवतांत इतरत्र कोठेंच दिसून येत नाहीं. या प्रमाणावरून एकादशस्कंधांतला वेदान्त अगदीं व्यवस्थित रीतीनें कोठेंही कसर न करितां वर्णन करण्याचा पंतांनीं बेत केला होता असें दिसून येतें. आणि तो बेत किती उत्कृष्ट रीतीनें पंतांनीं सिद्धीस नेला आहे हें पाहून पंतांच्या कर्तबगारीविषयीं

* पंत हे स्वतःच आपल्या रचनेला पलाशद्रुमदलपुटकाची म्हणजे पळसाच्या द्रोणाची उपमा देतात म्हणून वर तसा उल्लेख केला आहे. वस्तुतः पंतांनीं ही अत्यंत विनयानें घेतलेली द्रोणाची उपमा त्यांच्या वाचकांस पटेल असें नाहीं. मुळाप्रमाणेंच सुवर्णरत्नखचित पेल्याची किंवा निदान रजतपात्राची तरी उपमा त्यांच्या रचनेला द्यावी असेंच सर्वांस वाटेल हें उघड आहे.

कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं. शक्य तोंवर मुळांतील आशय यथार्थ रीतीनें मराठींत आणावयाचा असा पंतांचा हेतु असल्यानें पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं मुळाचें बरहुकूम भाषांतर केलें आहे. अशीं भाषांतराचीं उदाहरणें पांगारकरांनीं आपल्या विवेचनांत कांहीं दिलीं आहेत व आणखीहि पुष्कळ देतां येतील. (पहा. मो.च.पृ. ४३०–४३४). पण येथें इतका विस्तार करण्यास अवकाश नाहीं आणि संदर्भरहित मधल्या मधल्या श्लोकांचे उतारे दिल्यानें वाचकाला ते अगदींच रुक्ष वाटतात व त्याच्या लक्षांत त्यांपैकीं फारसें कांहीं रहात नाहीं. आणखी पंतांच्या भाषांतर-कौशल्याचें उदाहरण पहावयाचें असल्यास मुळामधील अध्याय २ श्लोक २१–३१ हे पंतांच्या आर्या ४३–६० यांच्याशीं ताडून पहावे म्हणजे पंतांच्या कारागिरीची कांहीं कल्पना येईल. गहन वेदान्त देखील मुळापेक्षां जास्त विशद व सुगम करून पंतांनीं कसा दाखविला आहे हें पहावयाचें असल्यास अध्याय ११ श्लोक १–१५ यांचें स्पष्टीकरण पंतांनीं आर्या २२३ ते २५३ पर्यंत किती सुंदर रीतीनें केलें आहे तें पहावें. मुळापेक्षां विशेष विस्तार न करतां मुळांतील अवघड आर्षेतलि वेदान्त प्रसादपूर्ण व सुंदर अशा रीतीनें मराठींत आणणें हें किती कौशल्याचें काम आहे याची अगोदर यथार्थ कल्पना आपणांस बहुधा नसते. पंतांनीं जें काम केलें आहे तसें थोडें तरी आपण स्वतः करण्याचा प्रयत्न करून बघावा; परिश्रमाची पराकाष्ठा करून जो काय अंश आपण मराठींत आणला असेल तो पंतांच्या कृतीशीं ताडून बघावा म्हणजे पंतांच्या कौशल्याचें माप केवढें आहे हें चटकन् आपल्या लक्षांत येईल.

८१. आतां अध्यायवार पंतांनीं कोणकोणत्या गोष्टी कसकशा वर्णन केल्या आहेत तें थोडेसें अवलोकन करूं. पहिल्या अध्यायांत, पिंडारकक्षेत्रीं उन्मत्त झालेल्या यादवांनीं ऋषींची थट्टा केल्यावरून त्या ऋषींनीं यादवकुळक्षयास कारणीभूत होणारा भयंकर शाप दिला, ती सर्व हकीगत आली आहे. ती कथाप्रिय पंतांनीं नेहमींप्रमाणें यथास्थित वर्णिली आहे ( आर्या १–१३ ). पुढें अध्याय २–५ यांत निमि व नवयोगीश्वर यांचा संवाद आहे तो पंतांनीं आर्या १३–१२१ पर्यंत अत्यंत सुंदर रीतीनें वर्णिला आहे. या संवादांत जेथें जेथें हरिभक्तीचें, कीर्तनाचें वगैरे वर्णन आलें आहे तेथें पंतांची वाणी जरा विस्तार पावली असून सौंदर्याचा पाराही जास्त वर चढला आहे. चौथ्या अध्यायामध्यें मुळांत ईश्वराच्या बावीसएक अवतारांचें वर्णन आलें आहे; त्यांत नारायणावताराचें वर्णन विशेष

विस्तारानें आलें आहे. पंतांनींही नारायणावताराचेंच विस्तारानें वर्णन केलें आहे. पण बाकीच्या अवतारांपैकीं फक्त वालखिल्योद्धारक अवताराचा, दुसरीकडे कोठें त्याचा उल्लेख आलेला नाहीं म्हणून व रामचंद्राचा, स्वतःचें उपास्य दैवत म्हणून, पंतांनीं उल्लेख केलेला आहे. बाकी मुळांत जे सर्व अवतार सांगितले आहेत त्यांचा उल्लेख देखील पंतांनीं केला नाहीं. सहाव्या अध्यायांत, श्रीकृष्णाकडे सर्व देव येऊन त्याला अवतार संपवून निजधामीं परत येण्याबद्दल विनंती करतात असें वर्णन आहे; त्यांत देवांची स्तुति वगैरे असल्यामुळें पंतांनीं त्याचा संक्षेपच केला आहे. श्रीकृष्ण जाणार असें कळल्याबरोबर उद्धव धांवत येऊन आपल्याला बरोबर नेण्याची श्रीकृष्णाला एकांतांत विनवणी करतो. तो अत्यंत प्रेमळ व हृदयद्रावक प्रसंग मुळांत फारच बहारीनें वर्णन केला आहे. पण पंतांनीं त्याचा दोनच आर्यांत संक्षेप करून त्यांतील रस बहुतेक सांडून टाकला आहे. निदान असा काव्यमय प्रसंग तरी पंतांनीं वाया जाऊं द्यावयाचा नव्हता. असो. यापुढें श्रीकृष्णाचा वेदांतोपदेश सुरू होतो. अध्याय ७,८ व ९ यांमध्यें निरनिराळ्या चोवीस गुरूंपासून काय काय उपदेशाचें ग्रहण केलें तें श्रीदत्त अवधूतानें यदुराजाला सांगितलेलें श्रीकृष्णानें कथन केलें आहे. हा सर्व कथाभाग अत्यंत बोधप्रद असून फारसा गहनवेदांतमयही नाहीं. तो पंतांनीं जराशा संक्षेपानें परंतु फार उत्कृष्टपणें वर्णिला आहे. या अवधूतोपदेशाचे मुळांत १३१ श्लोक आहेत; पंतांनीं तो ७९ आर्यांत आणला आहे ( आर्या १४१–२१९ ). स्वतःचे दृष्टांत वगैरे घालून मुळाला पंतांनीं वारंवार शोभविलें आहे. सुंदर व्यावहारिक दृष्टांत देऊन मूळ विषय खुलवून दाखविण्याची पंतांची शैली प्रसिद्धच आहे. बाहेर अत्यंत प्रसन्न पण आंत अत्यंत गंभीर असावें असें सांगतांना पंत सुंदर दृष्टांत योजितात.:—

मोदितचित्त असावें, फार दिसावें प्रसन्न बाहेर ।
गंभीरतोसि अभ्यंतर तों, केवळ मुलीस माहेर ॥ १७८ ॥

असेच आणखी एकदोन व्यावहारिक दृष्टांत:—

द्वैतास्फूर्ति समाधिस हेतु, गृहा जेंवि राशि वित्ताची ॥ २१० ॥
मोठें रज विक्षेपा कारण, तमही लया; न यां उरवी ।
वाढुनि सत्व, जसें खलवैभव बहु पाठ बंधुची पुरवी ॥ २११ ॥

दहाव्या अध्यायांत श्रीकृष्णानें बराच वेदांत उद्धवास सांगितला आहे. तो किंचित् नीरस असल्यानें पंतांनीं अगदीं त्रोटक रूपानेंच वर्णिलेला आहे. अक-

राव्या अध्यायांत मात्र पंतांनीं बहार केली आहे. मुळांत या अध्यायाचा पूर्वार्ध वेदांतमय व किंचित् क्लिष्ट असा आहे आणि उत्तरार्ध भक्तियोगवर्णनपर आहे. पंतांनीं मुळापेक्षां विस्तार करून मुळांतील हे दोन्ही भाग अत्यंत उत्कृष्ट रीतीनें उतरले आहेत. बाराव्या अध्यायामध्येंही मुळांतील वेदान्ताचें सुगम वर्णन पंतांनीं टीकेच्या आधारें केलें आहे. पंतांची भागवतावरील कृति वाचतांना पंतांनीं श्रीधरी टीकेचा आधार घेऊन प्रसंगविशेषीं तिच्यांतील मजकूर स्वीकारला असल्याचें अनेक ठिकाणीं ध्यानांत येतें. विशेष सूक्ष्म वाचन करणाऱ्यासच दिसणारीं उदाहरणें असल्या लेखांत देतां येत नाहींत तथापि हें बाराव्या अध्यायाचें उदाहरण ठळक व सहज वरवर दिसणारें म्हणून देण्यास हरकत नाहीं. यापुढें तेराव्या अध्यायांतही अकरा पदार्थ जे सांगितले आहेत त्यांपैकीं प्रत्येकाचा सात्विक, राजस व तामस विभाग स्पष्ट करून मुळांत सांगितलेला नाहीं. तो पंतांनीं टीकेंतूनच घेऊन वर्णिलेला आहे ( आर्या ३०३–३०९ पहा ). तेराव्या अध्यायांतील बाकीचे विषय म्हणजे सनत्कुमार व ब्रह्मदेव यांना परमेश्वरानें हंसस्वरूप घेऊन केलेला उपदेश होय. तो पंतांनीं सुंदर रीतीनें वर्णिला आहे चौदाव्या अध्यायांत, सर्व श्रेयांमध्यें व प्राप्तव्यांमध्यें ईश्वरभक्ति हीच श्रेष्ठ होय असें प्रतिपादन करून भक्तीला उपयुक्त असा ध्यानधारणेचा विधि सांगितला आहे. तो पंतांनीं उत्कृष्ट वर्णिला आहे. पंधराव्यांत मुळामध्यें अणिमामहिमादि १५ सिद्धींचें वर्णन व त्यांच्या प्राप्तीचे उपाय वगैरे वर्णिले आहेत. परंतु या सिद्धि ईश्वरप्राप्तींत ज्या अर्थी अंतराय करितात त्याअर्थी त्यांचें वर्णन मुळींच न करितां ‘ प्रथमचि विदित असावें त्यांचें अहितत्व संतराया ! तें। ’ ३५९ येवढेंच बजावून पंत पुढें चालते झाले आहेत.

सोळाव्या अध्यायांत, गीतेंतील दहाव्या अध्यायाप्रमाणें ईश्वरानें आपल्या विभूति सांगितल्या आहेत. मधल्या मधल्या दोन चार विभूति सांगून पंतांनीं या केवळ परिगणनात्मक अध्यायाची बोळवण केली आहे. सतरा व अठरा या दोन अध्यायांत सविस्तरपणें भागवतकारांनीं चाऱ्ही आश्रमांचे धर्म व कर्तव्यें स्मृतीप्रमाणें सांगितलीं आहेत. पंतांनीं तें सर्व गाळून हे अध्याय अगदींच रोड केले आहेत. पंतांना मंत्रभागवत म्हणजे एक सर्वसंग्राहक पुराण करावयाचें नसून भक्तिरसमय काव्य करायचें होतें. तेव्हां हे मुख्यतः धर्मशास्त्रांत अंतर्भूत होणारे विषय पंतांनीं गाळले हे योग्यच केलें. एकोणिसावा अध्याय हा टीकेच्या आधारानें पंतांनीं वाढविलेला आणखी एक अध्याय होय. बारा यम व बारा नियम

याचें वर्णन ( आर्या ३८६–४०८ ) पंतांनीं टीकेच्या आधारानें मुळापेक्षां स्पष्ट चाळविलें आहे. विसावा अध्याय हा एक पंतांनीं जवळ जवळ मुळाप्रमाणें तंतो-तंत उतरलेला अध्याय आहे, ( आर्या ४०९ ते ४४४ ). यांत भगवंतांनीं कर्म, ज्ञान व भक्ति या योगांचें प्रतिपादन केलें आहे. मुळाबरहुकूम भाषांतर केलें असूनही यांतील आर्या अत्यंत गोड, सुंदर व सफाईदार उतरल्या आहेत. जिज्ञासूंनीं मुळाचा सर्व अध्यायच पंतकृतीशीं ताडून पहावा. एकविसाव्या अध्या-यांत गुणदोष वगैरेंचें वर्णन आहे. पण तें पंतांनीं सर्व गाळलें आहे. ' वाढेल ग्रंथ बहु, प्रणति करुनि सोडिलाचि म्यां गातां ' । ४४७ असें पंत म्हणतात. बाविसाव्या अध्यायांत प्रकृति, पुरुष व सांख्यांचीं तत्वें यांविषयीं विवरण आहे तें पंतांनीं सुंदर रीतीनें परंतु संक्षेपानें उतरलें आहे. तेविसाव्या अध्यायांत कृपण द्विजाची गोष्ट असून त्या द्विजाला उपरति झाल्यानंतर त्यानें गाइलेली वेदांतपूर्ण गाथा पंतांनीं तंतोतंत भाषांतर करून मराठींत उतरली आहे. अगदीं मुळांतील शब्द सुद्धां वाप-रून केलेलें सुंदर भाषांतर--

मूळ- मनोवशेऽन्ये ह्यभवं स्म देवा मनश्च नान्यस्य वशं समेति ।
भीष्मो हि देवः सहसः सहीयान् युंज्याद्वशे तं स हि देवदेवः ॥
भा. ११. २३. ४८.

पंतकृति—भजति सकलदेव मना, मन कोणाच्याहि हें नसे भजनीं; ।
भीष्म मनोदेव बळी, या वश करि तोचि देवदेव जनीं ॥४७१॥

आणखी एक नमुना—

मूळ—जनस्तु हेतुः सुखदुःखयोश्चेत् किमात्मनश्चात्र हि भौमयोस्तत् ।
जिव्हां क्वचित् संदशति स्वदद्भिस्तद्वेदनायां कतमाय कुप्येत् ॥
भा. ११. २३. ५१.

पंतकृति—ते षट् पदार्थ, त्यांत प्रथम जन सुखासुखासि हेतु जरी, ।
देहासि असो, आत्म्या काय ? न दंडूनि घे, न दंड करी ॥४७९॥
बा जीभ चाविली जरि, तरि हित जिव्हेचि सारिखे दांत; ।
कोणावरि कोपावें ? तत्सहनाचि तोषकारि खेदांत ॥ ४८० ॥

चोविसावा अध्याय हा भागवतांतील सांख्यतत्वज्ञानाचा केवळ गाभाच आहे असें म्हटलें तरी चालेल. पंतांना सांख्याविषयीं कांहीं विशेष प्रीति नसल्यानें त्यांनीं हा अध्याय जवळ जवळ गाळलाच आहे. पंचविसावा अध्याय संक्षेपानें उतरून

-अखिलाच्या अध्यायांतील पुरूरव्याचें पश्चात्ताप होऊन गाइलेलें ऐलगीत पुन: पंतांनीं मुळाबरहुकूम सुंदर रीतीनें उतरलें आहे. २७, २८, २९, हे अध्यायही पंतांनीं संक्षेपानें परंतु नेहमींच्या सुंदर रीतीनें वर्णिले आहेत. २९ व्यांतील उद्धवकृष्णवियोगाचा प्रसंग मात्र पंतांस मुळाइतका चांगला साधला नाहीं. त्या उदात्त प्रसंगास न शोभे असे क्षुल्लक दृष्टान्त घालून पंतांनीं मुळांतील उदात्त भक्तिप्रेमाचा विरस केला आहे असें म्हणावें लागतें. विशेषेकरून या प्रसंगांतील ५८३ व ५८५ या आर्या पाहण्यासारख्या आहेत. श्रीकृष्णवियोगप्रसंगीं उद्धवास झालेलें दुःख वर्णन करतांना घातलेलें

कन्येसि तसें रोदन आलें तें पसरवीच आज्ञात्या। ५८३.

हें आर्यार्ध तर अगदींच वैरस्योत्पादक आहे. अगोदर कन्येची उपमा या प्रसंगास विशेष समर्पक नाहीं. त्यांतून ' रोदन आ पसरवी ' असें जें म्हटलें आहे तें तर अगदींच अप्रयोजक आहे. येथील उपमान ज्या कन्या त्या कधीं असें ' आ पसरून ' रडत नाहींत; व उपमेय जो उद्धव तोही असें भोकाड पसरून रडला हें म्हणणें अगदीं शोभत नाहीं. त्याचप्रमाणे

मोठें रडताचि गेला तो उद्धव बाळ जेंवि शाळेला। ५८५.

आजन्म श्रीकृष्ण परमात्म्याला आपला सखा, आपला स्वामी किंबहुना आपलें सर्वस्व मानून ज्यानें अनन्यमनस्क होऊन प्रेमनिर्भरतेनें त्याची सेवा केली तो 'महाभागवत उद्धव' श्रीकृष्णवियोगसमयीं शाळेला जाणाऱ्या मुलाप्रमाणें रडत गेला असें म्हणणें म्हणजे त्या उदात्त प्रसंगाची थट्टाच करणें होय. त्यापेक्षां मूळ भागवतांत हा प्रसंग किती तरी गंभीर व उदात्त वर्णनशैलीनें ग्रथित केला आहे.

यापुढें अ. ३० व ३१ यांत यादवनाशाचें, श्रीकृष्णगमनाचें, द्वारकानाशाच वगैरे वर्णन आहे. तें नेहमींप्रमाणें सुंदर साधलें आहे. उच्छृंखल यादवांचें वर्णन एका आर्येंत अपन्हुति अलंकारानें सुंदर केलें आहे.

सुटले गुरुमर्यादेपासुनि यादव न सिंधु ते फुटले।
तुटले स्नेहमहागुण कलह करायासि सर्व हुटहुटले ॥ ५९ ॥

स्वत:च्या पायाला तीर मारणाऱ्या व्याधावर भगवंतांनीं दया करून त्याला स्वर्गीं पाठवलें त्याचें पंत प्रेमनिर्भरतेनें वर्णन करतात—

वात्सल्य तसें कोठें ? त्या प्रभुच्या आयका यशाला हो ।
आठुला क्षमा दया ती; कीं स्वर्गीं प्रभु म्हणे तशाला 'हो' ॥ ६०४॥

भगवानाची व यादवनाशाची शोकवार्ता घेऊन भगवंताचा सारथि दारुक द्वारकेला गेला त्याचें पंत दीपक अलंकारानें सुंदर वर्णन करतात;—

मोहाया तो दारुक सर्वी द्वारावतीस्थ लोकांतें,
पूर्वी श्रीकृष्णातें, तैसा घेऊनि जाय शोकातें ॥ ६२९ ॥

पूर्वी दारुक एकाद्या स्वारीवरून श्रीकृष्णासहित द्वारकेस परत आला म्हणजे द्वारकावासी जनांस आनंदानें मोह पडत असे व आतां तो द्वारकेंत गेला असतां तो अत्यंत वाईट बातमी घेऊन शोकानें मोह पाडण्यासाठीं गेला; अशा रीतीनें पूर्वींच्या आनंददायक प्रसंगाची आठवण काढून व सध्यांच्या शोकमय प्रसंगाशीं त्याचा विरोध सूचित करून पंतांनीं आपली अनुपम सहृदयता व्यक्त केली आहे.

८२. याप्रमाणें हा सर्व स्कंधच काव्यसुमनांनीं नटलेला आहे. वेदान्तमय भागांतसुद्धां पंतांनीं ठिकठिकाणीं समर्पक दृष्टान्तादिकांची योजना करून त्यास सौंदर्य आणलें आहे. उगाच उतारे तरी किती देत बसणार ? खरोखर काव्याची गोडी ज्यास घ्यावयाची असेल, त्यानें मुळासच हात घालावा. केवळ उदाहरणादाखल ३६, ३७, ४७, ४८, ७५, ११२, ११४, १२७, १३४, १७१, १७८, १८२, २१०, २११, २३८ या स्कंधाच्या प्रथमाधांतीलच आर्या पाहिल्यास कौटुंबिक व व्यावहारिक दृष्टान्त देण्याची खुबी, उत्कृष्ट व सहृदय अलंकार, प्रेमळ वर्णन वगैरे गुण थोडक्यांत परंतु स्पष्टपणें दिसून येतील.

---

## [ द्वादश स्कंध. ]

८३. उतारे द्यायचे नाहींत म्हणतां म्हणतां वरील स्कंधांत बऱ्याच आर्यांचे उतारे दिले गेले. तरी हा मोह आवरून आतां बाराव्या स्कंधांत काय आहे तें पाहूं. बारावा स्कंध हा भागवतांतील अगदीं शेवटचा स्कंध; त्यांत विशेष महत्त्वाचे किंवा रमणीय असे फारसे विषय नाहींत. श्रीकृष्ण निजधामास गेल्याच्या हकीकतीनंतरचा भाग आपण वाचूं लागलों म्हणजे तो केवळ फिका असा आपल्यास वाटूं लागतो. तथापि परीक्षितास येवढा वेळ जो अतुलनीय उपदेश केला

त्याचा उपसंहार करतांनाही शुकाचार्यांच्या वाणींतलें माधुर्य व भक्तियुक्त प्रेमळपणा नाहींसा झाला नाहीं असें दिसून येतें. पंतांनींही या स्कंधाची कांहीं उपेक्षा केलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर पहिल्या आठ स्कंधांतील कोणत्याही स्कंधापेक्षां हा स्कंध पंतांनीं जास्त विस्तारानें वर्णिला आहे. या स्कंधांतील तेरा अध्यायांमध्ये मुळांत पुढीलप्रमाणें विषय आहेत. प्रथम कलियुगांतील राजांच्या वंशावळी; नंतर कलियुगांतील लोकांच्या भ्रष्टस्थितीचें वर्णन; कल्कि अवताराचें भविष्यकथन; कृत, द्वापर, त्रेता व कलि या युगांतील लोकांचें वर्णन; येणेंप्रमाणें विषय आले असून शेवटीं भगवद्भक्तीचें आणि भागवतमाहिम्याचें सुंदर वर्णन करून शुकाचार्यांनीं उपसंहार केला आहे. शुकाचार्यांनीं सांगितलेल्या भागवताच्या श्रवणानें तृप्त झालेला परीक्षित ब्रह्मस्वरूपीं ध्यान लावून बसण्यास त्यांची परवानगी घेतो व त्याप्रमाणें आसनस्थ होऊन ध्यान लावून बसल्यानंतर ठरल्याप्रमाणें तक्षकदंश होऊन त्यास मृत्यु येतो. पित्याच्या मृत्यूनें रागावलेल्या जनमेजयाच्या सर्पसत्राची हकीकत नंतर सूतानें सांगितली असून त्यानंतर सूतानेंही आपलें भागवतकथन पुरें केलें आहे. पण वरील शौनक ऋषींनीं त्यास येथेंच पुरें करूं न देतां वेदसंहिता, पुराणें वगैरे संबंधीं प्रश्न विचारून त्याचा पिच्छा पुरवला आहे. सहस्रवार्षिक सत्र करणाऱ्या तपःस्वाध्यायनिरत शौनक ऋषींस धड वेदांबद्दलची माहिती नसावी व त्यांनीं ती सूतासारख्या पुराणिकास विचारावी हें जरा चमत्कारिकच दिसतें! असो. यानंतर शौनकऋषींनीं आणखी मार्कंडेयाची कथा विचारून घेतली आहे व ती आठ, नऊ व दहा या तीन अध्यायांत आली आहे. पुढें अकराव्या अध्यायांत विराट्पुरुषाचें वर्णन, सूर्यव्यूह वगैरे विषय आले आहेत. बाराव्या अध्यायांत श्रीमद्भागवतांतील १ ते १२ स्कंधांत काय काय विषय आले आहेत ते क्रमानें सांगितले असून परमेश्वरभक्ति, नामस्मरणाचें माहात्म्य वगैरे वर्णन केलें आहे. तेराव्या अध्यायांत लहानशी ईशस्तुति असून अठरा पुराणें व त्यांची श्लोकसंख्या यांचें परिगणन आलें आहे. व नंतर थोडक्यांत एका सुंदरशा परमेश्वरप्रार्थनेनें ग्रंथसमाप्ति झाली आहे.

८४. पंतांनीं या सर्व गोष्टींपैकीं फारसें कांहीं गाळलें नाहीं. प्रारंभींची निरनिराळ्या राजवंशांची यादी व अगदीं शेवटची पुराणांची श्लोकसंख्येसहित सांगितलेली यादी या तरी त्यांनीं गाळाव्या, पण त्यादेखील गाळलेल्या नाहींत. जवळजवळ मुळाइतक्याच सविस्तर वर्णिल्या आहेत. नाहीं म्हणावयास तिसऱ्या अध्या-

यांतील कृत, त्रेता, द्वापर, कलि या युगांचीं वर्णनें, सहाव्या अध्यायांतील वेद-शाखांचें वर्णन, अकराव्या अध्यायांतील सूर्यव्यूह, सूर्याचे गण, वगैरे गोष्टी मात्र त्यांनीं गाळल्या आहेत एकंदर या स्कंधांतील पंतांचें धोरण संग्राहकत्वाचें दिसतें. तथापि नेहमींप्रमाणें संक्षेपाचें धोरण पंतांनीं सोडलेलें नाहीं. या स्कंधांत मुळापेक्षां अडीच पटींनें पंतांनीं संक्षेप केला आहे हें मागें आलेंच आहे.

८५. या स्कंधांतील कलिवर्णन ( आर्या २७–३६ ), कलिदोषवर्जनाला श्रीकृष्णभक्तीचा उपाय (५२–६८), परीक्षितीचें शुकाचार्यांशीं भाषण (९०–९७), मार्कंडेयाचें आख्यान ( १३१–१८६ ) व शेवटच्या सूताच्या तोंडीं घातलेल्या उपसंहारात्मक आर्या ( २०१–२०९ ), वगैरे भाग चांगले वठले असून ते पंतांच्या वर्णनशैलीचें तेज शेवटीं शेवटींही मुळींच कमी झालें नसून तिच्यांतील भरदारपणा, जोम व माधुर्य अजूनही कायम आहे याची पूर्ण साक्ष देतात. आर्यांची रचनाही नेहमींप्रमाणें सुंदर झाली आहे. कलिवर्णनामधील कांहीं आर्या पांगारकरांनीं उद्धृत केल्या आहेतच. त्या येथें पुनः उतरण्याचें कारण दिसत नाहीं. सत्तेची व शाश्वतीची घमेंड मारणाऱ्या राजांच्या क्षुद्रतेचें व नश्वरतेचें पंत वर्णन करतात—

यश मात्र राहतें बा ! कांहीं काळापुढें मग न राहे, ।
क्षिति हांसे पति म्हणत्या काळनदतटोद्भवा नगनरा हे ॥ ४४ ॥
गणना गणनाथाला न घडे ऐसे महीश कवि झाले ।
कालहरांत तेजोनिधि दहन, करूनही शक, विझाले ॥ ४८ ॥

( दहन=अग्नि, म्ह० अग्नीप्रमाणें तेजस्वी राजे ) कालावर पहिल्या आर्येंत नदीचें व दुसरींत डोहाचे केलेलें सुंदर रूपक मुळांतील नाहीं. कलीचे सर्व दोष धुवून टाकून सद्गतीला नेणारें श्रीकृष्णस्मरणच होय असें पंत जोरदार भाषेनें वर्णितात.

देवांच्या देवातें धरितां हृदयांत, न चळतां स्मरणीं ।
घे भाक बा! कशाला संशय? वरिसील सुगतिला मरणीं ॥ ६४ ॥

परीक्षित् राजा मरण पावला तेव्हां सर्वांनीं शोक केला. प्रत्यक्ष

यमधर्मीहि ' हा ' वदला, बहु विस्मित मानसांत तो झाला, ।
शोकभवें प्रथम, मग प्रेमभवें अश्रुच्या भरें न्हाला ॥ ११० ॥

जनमेजयसत्राचें वर्णन झाल्यानंतर सूत पुराणिक आपलें पुराणकथन संप-

वाचयाच्या शेवटी येऊन श्रीकृष्णस्मरणपूर्वक कृष्णद्वैपायन व्यासांस नमन करतात.

मर्शे गातां श्रीहरिचें, भजतां निष्काम पादराजीवां, ।
वरिती स्वयंवरवधू जेंवि तशी मुक्ति सादरां जीवां ॥ १२१ ॥
नमन असो श्रीकृष्णद्वैपायनगुरुवरासि, हा छात्र ।
ज्याच्या चरणध्यानें झालों या संहितेसि मीं पात्र ॥ १२२ ॥

वरील आर्यासुमनांच्या सुवासावरून विषयांच्या मानानें पंतांच्या आर्येनें याही स्कंधांत आपलें सौंदर्य कायम राखलें आहे हें दिसून येईल. विषयाच्या मानानें वर्णनशैलीही खुलते अगर फिकी पडते. बाराव्या स्कंधांत आर्यांची माधुरी जर कांहीं थोडीबहुत कमी पडली असेल तर ती विषय बहारीचा न मिळाल्या-कारणानें होय, पंतांचें आर्याग्रथनकौशल्य घटत चाललें होतें म्हणून नव्हे. पंतांनीं सूताच्या तोंडीं घातलेल्या पुढील उपसंहारात्मक तेजस्वी आर्याच वरील म्हण-ण्याच्या सत्यत्वाबद्दल आणखी साक्ष देतील.

वाचावे ऐकावे भागवतांतील उत्तम श्लोक, ।
कीं अर्धे, पाद, तारिल या इतुक्यानें चि उत्तमश्लोक ॥ २०५ ॥
सुकवि तुम्हीं धन्य, तुम्हांकरितां हा सूत मीहि कीं धन्य ।
तारक सार कविमतें हरियशचि, न कलियुगीं असें अन्य ॥२०६॥
देउनि उत्साह मला श्रीभागवतार्थ वदविला साचा ।
आनंद यापुढें तो तुच्छ ब्रह्मादिपदविलासाचा ॥ २०७ ॥
वाचेनें, चित्तानें, देहानें, नित्य हरिपदा नमन ।
तज्जन सज्जनचरणा तैसेंचि असो, विटो कदा न मन ॥ २०८ ॥

या अर्थाचे श्लोक मुळांत सूताच्या तोंडीं कोठेंही नाहींत तथापि पंतांनीं शेवटीं सूताच्या तोंडीं फारच शोभतील व गर्भित अर्थानें आपल्यालाही लागू पडतील अशा या अतिशय मार्मिक व प्रेमळ आर्या स्वतः रचून घातल्या आहेत.



विभाग ५.

# पंतकाव्यांचा कालनिर्णय
# व
# पंतांच्या काव्यशक्तीचा विकास.

१. पंतांचीं एकंदर काव्यें विचारांत घेऊन त्यांचे रचनाकाल ठरविण्याचा व अशा रीतीनें पंतांच्या दीर्घकालीन वाङ्मयसेवेचा एक आराखडा काढण्याचा प्रयत्न या विभागांत करावयाचा आहे पंतांचीं सर्व काव्यें विचारांत घेतल्यानें त्यांच्या काव्यरचनेचा अथपासून इतिपर्यंत एक इतिहासच पाहिल्यासारखा होईल. पंतांची कवित्वशक्ति प्रथम कशी व कोणच्या स्वरूपांत प्रादुर्भूत झाली, नंतर तिची आरंभापासून अखेरपर्यंत कशी परिणति होत गेली याचा एक मनोरंजक चित्रपट वाचकांच्या डोळ्यांपुढें उभा करण्याचा आमचा मानस आहे. प्रस्तुत पुस्तकांत येथून पुढें पंतांच्या भागवती काव्यांपुरती दृष्टि न ठेवतां व्यापक दृष्टीनें विचार करण्याचें धोरण अंगीकारिलें आहे. तेव्हां या ठिकाणींही त्याच धोरणाचा स्वीकार करून पंतांच्या सर्व काव्यांविषयीं विचार करावयाचा आहे.

२. पंतकाव्यांचे रचनाकाल ठरविण्याचा आजपर्यंत कोणीच प्रयत्न केला नाहीं असें नाहीं कांहीं काव्यांचे रचनाकाल ठरविणाऱ्या अशा एक दोन परंपरागत आख्यायिका सोडून दिल्यास, या बाबतींत प्रथमचा, विश्वसनीय आधारांनिशीं केलेला प्रयत्न पांगारकरांचा होय. पंतांच्या काव्यांचे काल आपल्या मताप्रमाणें ठरवून त्या कालानुक्रमानेंच त्यांनीं पंतांच्या अखिल काव्यप्रणालीचें आलोडन केलें आहे. काव्यसंग्रहकारांनींही आपल्या प्रस्तावनांतून व टीपांतून प्रसंगोपात्त कालनिर्णायक चर्चा केली आहे. यानंतर पंतकाव्यांच्या पराडकरी आवृत्तींतील निरनिराळ्या खंडांस जे उपोद्घात जोडले आहेत त्यांतही पंतकाव्यांच्या रचनाकालाविषयीं चर्चा केलेली आढळून येते. विशेषतः आर्याभारतास श्री. शिवराम महादेव परांजपे यांनीं लिहिलेला उपोद्घात या दृष्टीनें विशेष उपयुक्त व महत्त्वाचा झाला आहे. याप्रमाणें आजपर्यंतचें या विषयावरचें लिखाण आहे. शिवाय कर्णपर्व प्रथम लिहिलें का भारतांतील पर्वांच्या अनुक्रमानेंच लिहिलें

या विषयावर व इतर किरकोळ विषयांवरही कांहीं लेख इतस्ततः प्रसिद्ध झाले आहेत. पंतकवितेवरील हंसांचा निबंध एका रसिक पंतभक्ताचे पंतकाव्याविषयींचे प्रेमपूर्ण उद्गार या दृष्टीनें वाचनीय असला तरी कालनिर्णयाच्या दृष्टीनें उपयुक्त मजकूर त्यांत कांहीं सांपडण्याजोगा नाहीं. एकंदरीनें पाहतां त्यांत विवेचक व शोधक बुद्धीचा कांहींसा अभावच दिसून येतो.

पंतकवितेच्या बाबतींत पांगारकरांनंतर आस्थेवाईक व चिकाटीनें प्रयत्न करणाऱ्या गृहस्थांचा उल्लेख करावयाचा म्हणजे पंतवंशज रामकृष्णपंत पराडकर यांचा होय. पंतकविता अत्यंत शुद्ध स्वरूपांत पुढें यावी याविषयीं त्यांनीं जितके प्रयत्न केले त्या मानानें काव्यविवेचनाच्या किंवा कालनिर्णयाच्या बाबतींत त्यांनीं पद्धतशीर उद्योग केल्याचें दिसत नाहीं. त्यांनीं केसरींत १९१० व १९११ सालीं पंतकवितेवर ७-८ लेख लिहिले त्यांचा रोख मुख्यत: पंतकवितेचे शुद्ध पाठ, पंतांची अप्रसिद्ध कविता व तिचें स्वरूप, यांवरच होता. तथापि पंतकवितेचें सर्व दप्तर व इतर कागदपत्र वगैरे भरपूर व पहिल्या प्रतीचीं साधनें त्यांना सदोदित उपलब्ध असल्यामुळें व शोधक बुद्धि त्यांच्यांत सदैव जागृत असल्यामुळें कालनिर्णयासंबंधींही कांहीं महत्त्वाच्या गोष्टी त्यांनीं उजेडांत आणल्या आहेत. मंत्रभागवताच्या रचनेविषयीं त्यांनीं लावलेला शोध महत्त्वाचा आहे. त्याचप्रमाणें नुकतीच २ वर्षांपूर्वी, पंतांची अप्रसिद्ध असलेली आर्याकेकावलि त्यांनीं स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली असून, तिच्या प्रस्तावनेंत पंतचरित्राच्या अज्ञात परंतु महत्त्वाच्या अशा भागावर अगदीं नवीन प्रकाश पाडणारें असें विवेचन आर्याकेकावलीच्या आधारानें केलें आहे.

३. आतां इतक्या अधिकारी विद्वानांनीं ज्या विषयावर अनेक ठिकाणीं लिहिलें आहे त्यावरच पुनः येथें विवेचन करून पुनरुक्तिदोषास पात्र होण्याचें कारण काय असा प्रश्न कोणाच्याही मनांत उद्भवेल. त्यास उत्तर येवढेंच कीं आम्हांस येथें जें विवेचन करावयाचें आहे तें पुनरुक्तिदोषास पात्र होणारें नसून बहुतांशीं नवीन असेंच आहे. आजपर्यंत इतक्या विद्वानांची तर्कशक्ति व शोधक बुद्धि जरी पंतकाव्यांचे रचनाकाल ठरविण्यांत खर्च पडली असली तरी अजून पुष्कळच बाबी अनिर्णीत व संशयास्पद अशा राहिल्या आहेत. सर्व काव्यांचे रचनाकाल ठरविण्याचा एक धोरणी, पद्धतशीर व सर्वमान्य होण्या-

जोगा प्रयत्न अजून कोणींही केलेला नाहीं. पांगारकरांनीं आपल्या मताप्रमाणें पंतकाव्याचा रचनाक्रम ठरविला आहे खरा; परंतु महत्त्वाच्या सर्व काव्यांचे रचनाकाळ त्यांनीं नक्की ठरवलेले नाहींत. व त्यांच्या लिहिण्यांत कांहीं ठिकाणीं संदिग्धपणा राहिला असून कोठें कोठें विसंगतीही झाली आहे. काव्यसंग्रहाच्या संपादकांपैकीं नारायण चिंतामण केळकर व रा. बाळकृष्ण अनंत भिडे यांच्या अमदानींत जीं पंतांचीं काव्यें छापून निघालीं त्यांच्या रचनाकालाविषयीं टीपांतून व प्रस्तावनांतून त्या दोघां संपादकांनीं विवेचन केलें आहे. परंतु हा प्रयत्न थोड्याशाच पंतकवितेविषयीं झाला आहे. शिवाय मुख्य गोष्ट म्हणजे त्यांनीं ठरविलेले पुष्कळसे कालनिर्णय चुकीचे ठरले आहेत. पराडकरांच्या आवृत्तीच्या उपोद्घातांत जें विवेचन आलें आहे तेंही असेंच त्रुटित व असंपूर्ण आहे. हें सर्व सांगण्याचा हेतु इतकाच कीं पंतकाव्यांच्या रचनाकालाविषयीं निर्णयात्मक असें विवेचन करण्यास अद्यापि पुष्कळ वाव आहे, ही गोष्ट स्पष्ट व्हावी. वर उल्लेखिलेल्या विद्वानांनीं केलेले सर्व प्रयत्न टाकाऊ आहेत असा आमच्या म्हणण्याचा भावार्थ नाहीं. त्यांचे प्रयत्न बहुमोल आहेत व त्यांच्या निर्णयाचा आधार घेण्याचा सुप्रसंग पुढील विवेचनांत पुष्कळच वेळां येणार आहे. विशेषतः पांगारकरांनीं आपल्या पुस्तकांत पंतांच्या काव्यरचनेचा अनुक्रम ठरवून जो एक सांगाडा तयार केला आहे तो त्यांच्यानंतर पंतकाव्यावर लिहिणाऱ्या लेखकांचा मूलाधार किंवा पायाच होऊन राहिला आहे. तेव्हां या पांगारकरप्रभृति पूर्वसूरींची कृतज्ञता शिरीं वागवूनच प्रस्तुत लेखक हें विवेचन करण्यास प्रवृत्त होत आहे, हें येथें विनम्रपणें निवेदन करणें अवश्य वाटतें.

४. कालानुक्रमानें पंतकाव्यांची संगति लावण्याच्या या प्रयत्नास साधनें कोणचीं व तीं कितपत प्रमाणांत उपलब्ध आहेत याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें अवश्य आहे सुदैवानें इतर कोणत्याही जुन्या मराठी कवीपेक्षां पंतांच्या संबंधींचे विश्वसनीय आधार जास्त उपलब्ध आहेत व त्यामुळेंच अशा तऱ्हेचा, कवीच्या आयुष्यांतील घटनांचा आराखडा आंखणें शक्य झालें आहे. नाहींतर कवि होऊन गेला कधीं याचाच पत्ता लागणें दुर्घट व्हावें इतकी कालाची अनिश्चितता असल्यास त्याचें चरित्र व त्याच्या ग्रंथकर्तृत्वाचा इतिहास सुतराम् दुष्प्राप्य म्हणून त्याविषयींचें कुतूहल दाबून टाकून स्वस्थ बसणेंच भाग येतें

असो. तेव्हां पंतांच्या काव्यांचा अनुक्रम ठरविण्यास उपयोगी अशीं कोणकोणतीं साधनें उपलब्ध आहेत यांचें थोडकेंसें निदर्शन येथें करणें उचित होईल.

( १ ) प्रमाणांमध्यें अग्रगण्य व अप्रतिहत असें प्रमाण म्हणजे प्रत्यक्ष प्रमाण होय. रचनाकालाचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे तो रचनाकालच स्वतः ग्रंथकारानें नमूद केलेला अस्तित्वांत असणें हें होय. हें प्रमाण पंतकाव्यांच्या संबंधांत उपलब्ध नाहीं हें उघडच आहे. तें असतें तर रचनाकाल ठरविण्यासाठीं एवढाले प्रबंध लिहिण्याची काडीमात्र जरूरी पडली नसती. पंतांनीं फक्त आपल्या प्रह्लादविजय नामक एका लहान काव्यावर लेखनकाल दिला आहे; बाकी कोठेंही तसा उल्लेख त्यांनीं केलेला नाहीं. पंतांनीं स्वतःच्या वाचनाकरितां इतरांचे जे अजमासें पन्नास ग्रंथ लिहून घेतलेले आहेत त्यांपैकीं बऱ्याच ग्रंथांवर त्यांनीं लेखनकालाचा निर्देश केला आहे, परंतु स्वरचित ग्रंथांवर मात्र चुकूनसुद्धां काळाचा उल्लेख केलेला नाहीं; असें कां याचा विचार करणें जरा बोधप्रद आहे. दुसऱ्याचे ग्रंथ उतरून घेणें म्हणजे केवळ विचारशून्य हस्तश्रमाचें काम होय. एकदां ग्रंथ लिहावयास घेतला कीं थोड्याच दिवसांत सपाटयासरशीं कोणीही तें काम उरकून टाकील अर्थात् त्याच्यावर लेखनकाल घालून ठेवणें अत्यंत सोपें व सहज असतें. कारण त्यांत लेखनाचीच गोष्ट काय ती मुख्य असते. परंतु ग्रंथ रचणें ही गोष्ट ग्रंथ नुसता लिहून काढण्याहून अत्यंत भिन्न आहे. लेखणींतून कागदावर शाई उतरविण्याचा तो प्रश्न नसून सर्व मानसिक शक्ति व अंतःकरणाच्या वृत्ति ओतून शब्दांचा चित्रपट निर्माण करण्याचें तें काम असतें. निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या कल्पना सुचतात, भिन्न भिन्न वेळीं भिन्न विभाग रचले जातात, एकदां रचलेलें बाद होऊन नवाच रचनाप्रकार त्या जागीं येतो, वारंवार खोडाखोडी कराव्या लागतात व शोध घालावे लागतात; अशा रीतीनें अनेकवार घोळला जात जात त्या ग्रंथास किंवा काव्यास कांहीं स्थिर स्वरूप प्राप्त होतें. हें स्वरूप प्रथम एका कच्च्या प्रतीच्या रूपांत कवि आपल्या दृष्टींसमोर सामग्र्यानें आणतो व त्यांतील दोष दुरुस्त करून त्याला शेवटचा उजळा दिल्यानंतर पक्की प्रत होऊन त्या ग्रंथाला कायमचें स्वरूप प्राप्त होतें. अशा स्थितींत कोणच्या दिवसाचा व कोणच्या कालाचा रचनाकाल म्हणून कवि पोथींत उल्लेख करणार ? केवळ शेवटच्या प्रतीच्या लेखनकालाचाच उल्लेख करावा तर लेखनकालालाच जास्त महत्व देऊन वाचकांचा गैरसमज केल्याप्रमाणें होणार नाहीं काय ? तर अशा

अवस्थत, ग्रंथकर्ते स्वतः लेखनकाल लिहून ठेवीत नसत या गोष्टीचें सहज स्पष्टीकरण होण्याजोगें आहे. शिवाय आमच्या पूर्वकालीन कवींचा विनीत भाव लक्षांत घेतला असतांही कालाचा उल्लेख न करण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीचें आणखी एक गमक सांपडण्याजोगें आहे. तेव्हां इतरत्र कालनिर्देश करण्याचा पंतांचा प्रघात असतां स्वतःच्या ग्रंथांच्याच बाबतींत, विशेषतः मोठमोठ्या ग्रंथांच्या बाबतींत, त्यांनीं तो प्रघात कां अनुसरला नाहीं याचें कारण वरील विवेचनावरून लक्षांत येईल.

( २ ) पंतकाव्यांच्या कालनिर्णयाचें दुसरें अप्रत्यक्ष परंतु महत्त्वाचें साधन म्हणजे त्यांचीं काव्येंच होत. त्यांच्या काव्यांत प्रकट झालेले विचार व भावना, त्यांच्या काव्यांत होत गेलेली रचनाकौशल्याची परिणति, भाषेची परिणति, वगैरे गोष्टींवरून काव्यांचा कांहीं एक क्रम बसविणें शक्य होतें. काव्याच्या अंतरंगावरून कवीच्या अंतरंगाची, थोडीबहुत व अस्पष्ट कां होईना, पण पारख करतां येते व त्यावरून कवीच्या मनःस्थितीचा आणि केव्हां केव्हां वयोमानाचाही अंदाज करतां येतो. कालिदासाच्या प्रतिभेचें रघुवंश हें कुमारसंभवानंतरचें फल होय असा तर्क करणारा विवेचक तर्कटी ठरण्याचें भय नको; त्याप्रमाणेंच पंतांचें मंत्रभागवत कृष्णविजयाच्या नंतरचें आहे असें म्हणणारा चिकित्सक केवळ असंबद्धप्रलापी ठरण्याचा संभव नाहीं.

( ३ ) पंतांच्या काव्यांतूनच त्यांच्या रचनाकालाविषयीं आणखी एक प्रकारचें प्रमाण आढळतें. तें म्हणजे त्यांनीं काव्यांतून जागजागीं स्वतःविषयीं व स्वसंबंधी गणगोताविषयीं काढलेले उद्गार होत. पंत ब्रह्मोत्तरखंडामध्यें स्वतःस ' नवीन कवि ' म्हणवून घेतात, कृष्णविजयामध्यें ' काका शिशु ' म्हणून स्वतःस उल्लेखितात, त्याचप्रमाणें केकावलीमध्यें—

कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली
पुरःसरगदासवें झगडतां तनू भागली ।

असा वयोवस्थानिदर्शक आर्तोद्गार काढतात. अशा उद्गारांवरून अर्थातच त्या त्या काव्यांच्या रचनाकालाविषयीं खात्रीलायक अनुमानें काढतां येतात; इतकेंच नव्हे. तर अशा उल्लेखांवरून त्यांच्या चरित्राविषयींही बरीच माहिती जमवितां येते.

( ४ ) आणखी एक साधन फक्त पंतांच्याच बाबतींत सुदैवानें उपलब्ध आहे, तें म्हणजे त्यांच्या हस्ताक्षराच्या नमुन्याचें होय. वयोमानाप्रमाणें मनुष्याच्या

अक्षरामध्यें फरक पडत जातो, हा सामान्य नियम आहे; व चाळीस वर्षांच्या दीर्घ अवकाशामधलें पंतांचें वेळोवेळचें अक्षर आज उपलब्ध आहे. तथापि एक दृष्टींनी या अक्षराच्या नमुन्यांचा कालनिर्णयाचे कामीं जितका उपयोग व्हावासें वाटतें तितका उपयोग अनेक कारणांस्तव होऊं शकत नाहीं. त्यांतील प्रमुख कारणें येणेंप्रमाणें सांगतां येतील.—

१. सर्वांत मुख्य गोष्ट ही कीं, काव्याच्या पोथीचा लेखनकाल तोच काव्याच्या रचनेचाही काल होय असें कोणत्याच कवीच्याबद्दल विश्वासानें सांगतां येत नाहीं; त्याचप्रमाणें तें पंतांच्या बाबतींतही सांगतां येणार नाहीं. एकाद्या काव्याची पक्की प्रत तें काव्य रचल्यानंतर कित्येक वर्षांनींही झाली असण्याचा संभव आहे. असें जरी असलें तथापि हस्ताक्षरावरून जर लेखनकाल अजमावतां आला तर तो एका बाबतींत मात्र हटकून उपयोगी पडण्याजोगा आहे. लेखनकाल जो ठरेल त्याच्या पूर्वी किती वर्षें ग्रंथ रचला हें जरी त्यावरून ठरवितां आलें नाहीं तरी त्या कालानंतर मात्र तो ग्रंथ रचला गेला नाहीं येवढी गोष्ट ठाम निश्चित झाल्यासारखी होईल.

२. अक्षराच्या बाबतींतली दुसरी उणीव म्हणजे अक्षरावरून वयोमानाविषयीं किंवा अवस्थेविषयीं बिनचूक अनुमानें सदैव काढतां येत नाहींत ही होय. पुष्कळ वेळां घाईमुळें, शरीराच्या व मनाच्या अस्वस्थतेमुळें, अक्षरामध्यें फरक पडतो. इतकेंच काय परंतु आळसलेल्या स्थितींत लिहिल्यामुळें, वेडेवाकडें बसल्यामुळें, शाई व टाक बदलल्यामुळें अशा अनेक आनुषंगिक कारणांनीं अक्षरामध्यें अतोनात फरक पडत असतो. तेव्हां अक्षरावरून कालनिदर्शक अनुमान निदान पंतांच्या बाबतींत तरी अगदीं जपूनच काढावें लागतें.

३. अनेक काव्यें पंतांच्या हस्ताक्षरांत उपलब्ध नाहींत. अशा काव्यांच्या परलिखित प्रती शुद्धतेच्या दृष्टीनें प्रमाण असल्या तरी हस्ताक्षरावरून निघणाऱ्या अनुमानाच्या दृष्टीनें त्या केवळ निरुपयोगी आहेत.

४. पंतलिखित काव्यांमध्यें देखील परलिखित भाग कमीअधिक प्रमाणांत बहुतेक सर्वत्र आढळून येतो.

५. खुद्द पंतांच्या हस्ताक्षराविषयींच वाद होण्याचा कित्येक ठिकाणीं प्रसंग येतो. नुकतेंच रा. रामकृष्णपंत पराडकरांनीं 'भक्तमयूर केकावलि' म्हणून

पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत सबंध आर्याकेकावलीच्या पोथीच्या छायाचित्राचा ठसा छापलेला आहे. त्या सबंध काव्याच्या हस्ताक्षरावर नजर टाकल्यास त्यांत अक्षरांचीं दोन वळणें उघड दिसून येतात. त्यांतील एक पंतांचें असून दुसरें त्यांचें नसावें असें वाटतें. परंतु पराडकरांचें म्हणणें, दोन्ही वळणें निराळीं असलीं तरी तीं पंतांचींच आहेत, असें आहे. असा मतभेद बऱ्याच काव्यांच्या बाबतींत होण्याजोगा असल्यामुळें त्यांचें हस्ताक्षर कालनिर्णयाच्या बाबतींत निरुपयोगी ठरतें.

हस्ताक्षराच्या संबंधांत अशा तऱ्हेच्या व याच्याही पेक्षां किचकट भानगडी उपस्थित होत असल्यामुळें त्याचा कालनिर्णयास फारसा उपयोग होण्याजोगा नाहीं. तथापि जो कांहीं थोडासा उपयोग होण्याजोगा आहे तो करून घेतलेला आहे हें पुढील विवेचन वाचतांना लक्षांत येईलच.

( ५ ) वर निर्दिष्ट केलेलीं एका तऱ्हेनें आभ्यंतर साधनें झालीं. बाह्य साधनांपैकीं पंतकाव्यांच्या बाबतींत एकच उपलब्ध आहे. तें म्हणजे पत्रव्यवहार होय. पंतांचें मित्रमंडळ बरेंच मोठें होतें व या मित्रांबरोबर त्यांचा पत्रव्यवहारही हमेशा चालू असे. या पत्रव्यवहाराविषयीं माहिती मिळवून, तो संपादन करून, उजेडांत आणण्याचें सर्व श्रेय पांगारकर यांना आहे. विठोबादादा चातुर्मासे व त्यांचे चिरंजीव भैराळबोवा, पंढरपूरचे पाध्ये, कराडचे सदाशिव पाध्ये, महिपतीबावाचे पुत्र विठोबा ताहराबादकर या सर्व मंडळींचा पंतांशीं झालेला व पंतांचा त्यांच्याशीं झालेला बराचसा पत्रव्यवहार त्यांनीं शोधून काढला व अलीकडच्या शिक्षित समाजास त्याची वर्दी दिली याबद्दल त्यांचे धन्यवाद गावे तितके थोडेच आहेत. तथापि एक गोष्ट मात्र त्यांनीं रास्त केली नाहीं. वरील पत्रव्यवहार जसा त्यांना उपलब्ध झाला तसाच तो प्रसिद्ध करून सर्व समाजाला उपलब्ध करून देण्याचें त्यांचें कर्तव्य होतें. तो सर्व जसाचा तसा प्रसिद्ध केला असता म्हणजे ज्याला त्याला त्याच्यावरून आपलीं अनुमानें काढण्यास मोकळीक झाली असती व त्यामुळें पंतचरित्रशोधनास पुष्कळच मदत झाली असती. परंतु पांगारकरांनीं थोडेसें दार किलकिलें केल्यासारखें करून कांहीं थोड्याशा पत्रांचे त्रोटक उतारे तेवढे आपल्या पंतचरित्रांत दाखल केले आहेत! असो. तूर्त तेवढ्या उताऱ्यांवरच तहान भागवून घेऊन प्रस्तुत लेखकास तेवढ्यावरच आपलीं अनुमानें बसविणें भाग पडलें आहे.

पंतांच्या काव्यांचा कालनिर्णय करण्यास हा पत्रव्यवहार फारच उपयोगी

पडला आहे. कालनिर्णयाच्या सर्व प्रयत्नांना केवळ आधारस्तंभ होऊन राहिलेला महाभारताचा काळ केवळ या पत्रव्यवहाराच्या साधनामुळेंच नक्की करतां आला आहे. पत्रव्यवहाराशिवाय कालनिर्णयाचीं बाह्य साधनें पंतकाव्यांच्या बाबतींत फारशीं उपलब्ध नाहींतच. इतरांनीं लिहून घेतलेल्या पंतकाव्यांच्या प्रतीवर असलेला लेखनशक किंवा असाच एखादा इतरांनीं केलेला उल्लेख याचा क्वचित् कालनिर्णयाचे कामीं उपयोग झालेला आहे. त्याचा सर्व खुलासा पुढील विवेचनांत यथास्थल येईलच.

[ १ ]

५. पंतांनीं नक्की कोणत्या वर्षी, कोणत्या मितीला, कविता करण्यास प्रारंभ केला व त्यांनीं अगदीं प्रथम रचिलेली कविता कोणची याचा निर्णय करणें आतां दुरापास्तच आहे. पोप कवीनें आपणाविषयीं असें म्हटलें आहे कीं,

I lisped in numbers and the numbers came

त्याप्रमाणें बाळपणींच पंतांच्या बोबड्या बोलांतून छंदोमय वाणी प्रकट झाली किंवा काय हें आतां आपणास कळण्याचा मार्ग राहिलेला नाहीं. अथवा, ते लंगोटी घालणारे बारा वर्षांचे बटु असतांना त्यांनीं केशव पाध्यांच्या घराच्या भिंतीवर वेडावाकडा श्लोक लिहून ठेवला होता व तो पाहूनच केशव पाध्यांच्या मनांत या भाकड्या मोरोविषयीं कुतूहल उत्पन्न होऊन त्यांनीं त्याला शिकविण्यास प्रारंभ केला, अशी जी त्यांच्या स्वत:विषयींच आख्यायिका आहे ( मो. च. पृ. १३,१४ ) ती कितपत खरी आहे याचा निकाल लावणेंही केवळ अशक्य आहे. कवित्वस्फूर्ति त्यांच्या अंगीं उपजतच होती; ती काव्य, नाटक, अलंकार इत्यादि कवित्वानुकूल विषयांच्या अध्ययनानें प्रज्वलित झाली व त्यानंतर लगेच ते काव्य करूं लागले असें साधारण मानानें म्हणतां येईल. कारण स्वत:च्या २२-२३ या वयाच्या सुमारास त्यांनीं 'कुशलवाख्यान' हें आपलें पहिलें काव्य लिहिलें असावें असें पुष्कळ प्रमाणांवरून वाटतें. या काव्याच्या रचनाकालाविषयीं काव्यसंग्रहकारांनीं बरींच प्रमाणें देऊन वरीलप्रमाणेंच निष्कर्ष काढला आहे. कुशलवोपाख्यान हेंच पंतांचें पहिलें काव्य व तें त्यांनीं शके १६७३-७४ च्या सुमारास म्हणजे पन्हाळगडावरून बारामतीस आण्याच्या पूर्वीं रचलें असावें असें वाटण्यास कारण होणारीं प्रमाणें पुढील होत. ' ( १ ) या काव्याची रचना व वर्णनशैली

यांत संस्कृत महाकाव्यग्रंथकाराचें अनुकरण जितकें स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतें तितकें इतरत्र येत नाहीं. ( २ ) दुसरा आधार भाषेचा. पंतांच्या इतर काव्यांच्या मानानें यांतील भाषा कमी सफाईदार दिसते. विशेषेंकरून या काव्यांतील यमकें पद्दाण्यासारखीं आहेत. पंतांच्या इतर काव्यांतील यमकांमध्यें निदान अंत्य अक्षर व उपांत्य स्वर इतकीं तरी जुळतात. उपान्त्य स्वरांत भेद कोठेंही आढळत नाहीं. परंतु प्रस्तुत काव्यांत पुढील यमकें आढळतात:—पुसे-वसे-१.१६; खिंचो-बंधो ४.५५; नातें-तींतें ४.८६; काननीं-ऐकुनी ४ ८८; पावनी-मुनी ४.८९; कसें-दिसे ९-११; शिरें-करें १०-१; निरता-विजिता १३.३० इ. इ. ( ३ ) तिसरा आधार मंगलाचरणाचा. यांत रामायणाचा कर्ता वाल्मीकि किंवा महाभारताचा व्यास यास वंदन मुळींच नाहीं. तेव्हां रामायण, भारत, भागवत व पुराणें लक्ष्यपूर्वक वाचण्याच्या पूर्वी व आपल्या काव्यशक्तीचा ओघ तिकडे वळविण्याच्या पूर्वी हें काव्य रचिलें असलें पाहिजे.'* ( ४ ) प्रथमच रचना करूं लागलेल्या नवशिक्या कवीला पांडित्याचें प्रदर्शन करण्याची सहजच हौस असते. त्याप्रमाणें या काव्यांत अनेक चित्राविचित्र वृत्तांची योजना करून कवीनें आपलें पांडित्य प्रकट केलें आहे. पंतांनीं श्लोकबद्ध काव्यें पुष्कळच रचलीं. पण इतकीं अनेकविध, प्रसिद्ध अप्रसिद्ध, वृत्तें त्यांनीं सारारामायण खेरीज करून कोणत्याही एका काव्यांत योजिलेलीं नाहींत. ( ५ ) ओबडधोबड भाषा. कोठें अति लांब सामासिक पदें तर कोठें अतिशय सोप्या एकेरी शब्दांची योजना अशा प्रकारांमुळें कवीचा नवशिकेपणा स्पष्ट प्रतीत होतो. भाषेमध्यें सफाई व स्वाभाविक रचनेचा ओघ दिसून येत नाहीं. (६) प्रस्तुत काव्यांत सीतात्यागाचा प्रसंग वर्णिला आहे. त्याच्यावर रघुवंशातील १४ व्या सर्गाची

* हीं पहिलीं तीन प्रमाणें काव्यसंग्रहकारांनीं दिलेलीं थोड्याशा संक्षेपानें येथे दाखल केलीं आहेत. पहा, काव्यसंग्रह ५३; मोरोपंतकृत स्फुट काव्यें भाग ३, पृ २४—२५. काव्यसंग्रहकारांनीं एकंदर चार प्रमाणें दिलीं आहेत. त्यांचें अवशिष्ट प्रमाण, ' पंतांनीं आपलीं बाकीचीं मोठीं काव्यें इतर ओळखीच्या माणसांनीं सांगितल्यावरून लिहिलेलीं आहेत. तसें हें काव्य लिहिलेलें नाहीं व यांत इतर कोणाचा उल्लेखही केलेला नाहीं. तेव्हां हें काव्य आपल्या कवित्वशक्तीचा प्रत्यय येण्यापूर्वी पंतांनीं लिहिलेलें दिसतें. ' अशा स्वरूपाचें आहे. तें सयुक्तिक न वाटल्यामुळें येथें दाखल केलें नाहीं.

दाट छाया पडलेली दिसते. कित्येक श्लोक तर अगदीं उघड उघड रघुवंशांतील श्लोकांवरून उतरलेले का. सं. कारांनीं दाखविले आहेत. उदाहरणार्थ अ० २ श्लोक २, १८; अ. ४ श्लो. ५१-६३; अ. ५ श्लो. ६, ९, १०, १८ हे रघुवंशाच्या १४ व्या सर्गांतील त्या त्या वर्णनाशीं ताडून पहावे. शिवाय रघूच्या इतर सर्गांतील कल्पनांशींही या काव्यांतील वर्णनाचें साम्य आढळतें. आतां रघुवंश शके १६७२ च्या मार्गशीर्षांत पंतांनीं लिहून घेतला; व त्याच वेळेस त्यांचें सूक्ष्म वाचनही केलें असलें पाहिजे. रघुवंशांतील कल्पना डोळ्यांपुढें ताज्या असतांनाच कुशलवोपाख्यान हें काव्य लिहिलेलें दिसतें. अर्थात् १६७३-७४ हें साल या काव्याच्या रचनेचें ठरतें.

६. पंतांनीं कुशलवचरित लिहिलें त्या सुमारासच साररामायण किंवा त्याचा कांहीं भाग तरी रचला असावा कीं काय असा संशय उत्पन्न होतो. असा संशय वाटण्याचें कारण येवढेंच कीं नाना तऱ्हेच्या अपरिचित व श्रुतिदुःखद अशा वृत्तांची या काव्यांतही योजना केलेली असून रघुवंशांतील तिसऱ्या व दहाव्या सर्गांतील वर्णनाची छटा यांतही कित्येक ठिकाणीं दिसून येते. ( पहा. साररामायण, बालकांड, ६. १३, १५; ७. ११, १४, १९ इ० ) तथापि इतर अनेक दृष्टींनीं विचार करतां साररामायणाचें स्थान हें नसून, १६८२-१६८८ यापुढें वर्णिलेल्या श्लोकरचनाकाळांतीलच असावें असें वाटतें. यास्तव तेथेंच या रामायणासंबंधीं विशेष विवेचन केलें आहे.

७. पन्हाळगडीं गुरुगृहीं असतांनाच पंतांनीं आपला ' ब्रह्मोत्तरखंड ' हा ग्रंथ लिहून पुरा केला असावा. हा ग्रंथ लिहिण्याला त्यांचा गुरुपुत्र व गुरुबंधु सदाशिव पाध्ये यानें ' आज्ञा केली ' होती. सदाशिव पाध्यांनीं इतर ग्रंथ रचण्यास प्रेरणा केली ती ' निरोप पाठवून ' परोक्ष रीतीनें केली असा उल्लेख सांपडतो. तसें या काव्यांत म्हटलेलें नाहीं; उलट ' सखु सदाशिववदनें आज्ञा केली ' असे पंतांचे शब्द आहेत. यावरून व ' गुरुपदरजःप्लुतें भालें ' याही शब्दांवरून ब्रह्मोत्तरखंड गुरु व गुरुपुत्र यांच्या समक्ष पन्हाळगडींच रचलें गेलें असें दिसतें. शिवाय शके १६७८ च्या आश्विनामध्यें वाणीभूषण हा छन्दःशास्त्रग्रंथ पंतांनीं स्वगृहीं पन्हाळगडीं लिहून घेतल्याचा उल्लेख केला आहे. यावरून १६७८ पर्यंत पंत गडावरच होते हें सिद्ध आहे. व ब्रह्मोत्तरखंडाचा काल १६७८ पुढें मुळींच नेतां येण्याजोगा नसल्यानें तो गडावरच

१६७५—१६७६ च्या सुमारास रचलें गेलें असें मानणें भाग येतें. वडिलांना भेटून १२ वर्षें होत आल्यामुळें पुढें शास्त्रोक्त भेटीचा प्रसंग येईल या भीतीनें पंत १६७५ सालीं बारामतीस आले व तेथें आल्यावर शिवोपासक यजमानाची मर्जी आपल्या तरुण कविमित्रानें संपादन करावी म्हणून सदाशिव पाध्यानें पंतांना पत्र-द्वारें प्रश्नोत्तरखंड रचण्याविषयीं प्रेरणा केली, असें जें पांगारकरांनीं वर्णन केलें आहे तें सर्व कल्पनामय दिसतें. त्यास प्रत्यक्ष आधार तर कांहीं नाहींच परंतु तें संभवनीयही दिसत नाहीं, हें वरील प्रमाणांवरून लक्षांत येईल. सदाशिव पाध्यानें ' पत्र पाठवून पंतांस प्रश्नोत्तर खंड लिहिण्यास विनंती केली ' असें ते लिहितात तर मग पत्राचा थोडासा तरी उतारा कां देत नाहींत? प्रश्नोत्तरखंडाच्या रचनेचा प्रसंग कल्पनेनें त्यांनीं मोठा मनोरम वर्णन केला आहे.परंतु त्यांत फारसा सत्यांश दिसत नाहीं. ( मो. च. पृ. १९६ ).

पंतांनीं प्रश्नोत्तरखंड अगदीं प्रारंभीं रचलें असावें हें सिद्ध करणें फारसें कठीण नाहीं. प्रश्नोत्तरखंडाच्या उपसंहारांत त्यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत.

श्रीशिवकथा यथामति लिहिली हे रामनंदनें बाळें । २२. ७५.
शिवकीर्तिग्रंथ ललित रचिला भावेंकरूनि आर्यांहीं ।
करुणा करुनि सकृत् तरि वाचावा हा समूळ आर्यांहीं ॥ ७८ ॥
विनवितसें साधूंतें आणिकहि देवूनि हाक विनवीन ।
कीं द्या आशी,' शुचि हो सयश सेवूनि हा कवि नवीन ' ॥ ८० ॥

पंत स्वतःचा ' रामनंदन बाळ ' म्हणून उल्लेख करतात व 'कृपा करून एकदां तरी हा ग्रंथ आर्यांनीं वाचावा,' ' मी आज ही विनवणी करीत आहे व पुढेंही आणखी करीन; तरी या नवीन कवीला आशीर्वाद असावा ' असे नम्र उद्गार काढतात. अल्पवयस्क विद्यार्थ्यास व होतकरू लेखकास साजेशा अशा या उद्गारां-वरून पंतांचें हें पहिलेंच ( अर्थात् कुशलवाख्यानानंतरचें ) काव्य असावें असें स्पष्ट दिसतें. या काव्याची रचना सोपी व सरळ आहे. त्यांत खरें तेज, कल्पना-विलास व सहृदय अलंकारांची गर्दी वगैरे मोरोपंती आर्येचे विशेष फारसे दिसून येत नाहींत. यामुळें हें काव्य पंतांच्या प्राथमिक अवस्थेंतीलच होय याविषयीं संदेह रहात नाहीं.

८. प्रश्नोत्तरखंड लिहून झाल्यानंतर किंबहुना तो लिहीत असतांनाच पंतांनीं श्रीकृष्णविजयास सुरवात केली असावी असें वाटतें. अर्थात् ही सर्व रचना

अजूनपर्यंत पन्हाळगडींच होत होती. नंतर १६७८ पासून १६८०-८१ पर्यंतच्या दोनतीन वर्षांत केव्हां तरी ते पन्हाळगड उर्फ पराशर क्षेत्र येथून निघून बारामतीस कायमचें वास्तव्य करण्याकरितां आले असें दिसतें. शके १६७८ च्या भाद्रपद आश्विनामध्यें पंतांनीं छंदःशास्त्र व वाणीभूषण स्वगृहीं म्हणजे पन्हाळगडीं लिहून घेतल्याचा उल्लेख आहे. पुढें १६८० मध्यें बारामतींत एक ग्रंथ लिहून घेतला असून १६८२ मध्येंही बारामतींत पंचदशी लिहून समाप्त केल्याचा उल्लेख आहे. तथापि १६८२ मध्यें राघवपांडवीय काव्य 'पराशरक्षेत्रां' त लिहून घेतल्याचा उल्लेख मध्येंच सांपडतो यावरून बारामतीस आल्यावरही पंत पन्हाळ्यास मधून मधून ये जा करीत असत असें दिसतें. या काळांतल्या त्यांच्या ग्रंथरचनेकडे पाहतां कृष्णविजय पूर्वार्ध त्यांनीं शके १६७७ पासून १६८० पर्यंत लिहिला असावा, त्यानंतर प्रल्हादविजय तर त्यांनीं शके १६८० पौष शु॥ ८ रोजीं लिहून संपविल्याचा खुद्द स्वलिखित पोथींतच उल्लेख केला आहे. विनायकमाहात्म्य म्हणून पंतांचें एक गणेशजन्माच्या कथेवर लिहिलेलें सुंदर प्रकरण आहे. त्यांत

> कनककशिपुच्या भ्याले बहु पाहुनि घातका, परि समोर ।
> प्रल्हाद न भी, हर्षे, फार घनें चातकापरिस मोर ॥

अशी सरतेशेवटची आर्या आहे. कथेशीं कांहीं संबंध नसतांना केवळ अनाहूत रीतीनें यांत प्रल्हादाचा उल्लेख केला आहे यावरून हें प्रकरणही प्रल्हादविजयाच्या सुमारासच रचलें असावें असें वाटतें.

मदालसाचरित्र, हरिश्चंद्राख्यान व देवीमाहात्म्य उर्फ सप्तशती हीं मार्कंडेय पुराणांतील कथांच्या आधारानें लिहिलेलीं प्रकरणें पंतांनीं बारामतींत येऊन स्थिरस्थावर झाल्यावर कांहीं वर्षांनीं लिहिलीं असावींत. म्हणजे यांचा रचनाकाल सुमारें १६८२-८३ इतक्या बेतांतला असावा. यांपैकीं मदालसाचरित्र 'श्रीमद्गुरुपुत्रींहीं आज्ञा केली निरोप पाठवुनी' म्हणून रचिलें आहे. गुरुपुत्रांना निरोप पाठवावा लागला यावरून ते पंतांना समक्ष भेटण्याजोग्या स्थितींत नव्हते, अर्थात् पंत यावेळीं बारामतीचे कायमचे रहिवासी झाले होते असें स्पष्ट दिसतें. वरील तीन्ही कथानकें सोपीं व सुंदर असून मदालसाचरित्र व हरिश्चंद्राख्यान हीं तर काव्यदृष्ट्या फारच चांगलीं वठलीं आहेत. तथापि त्यांचा रचनाकाळ फारसा पुढें मात्र नेतां येत नाहीं. कारण यांतील काव्य उक्त

दर्जाचें असलें तरी तें मुळाला धरून रचलेलें आहे. कल्पनेच्या भरार्‍या, घडा-मोडींचीं वर्णनें व आवेशाचा तेजस्वीपणा यांत एकंदरीनें फारसा दिसून येत नाहीं. शिवाय अजूनपर्यंत भारत-रामायण-भागवतांत पंतांचें चित्त पूर्णपणें गुंगून गेलें नसून इतर फुटकळ कथांचें वर्णन करण्याची प्रवृत्ति त्यांना होत असे असेंही या काव्यांवरून दिसतें. यावरूनही या काव्यांचा रचनाकाल पूर्ववयांतलाच असावा या अनुमानास बळकटी येते.

९. याप्रमाणें स्थूलमानानें १६७४ ते १६८३ पर्यंतच्या दहा वर्षांतील पंतांच्या काव्यरचनेचा आराखडा आहे. या अवकाशांत थोड्याशा श्लोकरचने-खेरीज करून बाकी मुख्यतः गीति व आर्यागीति या छंदःशास्त्रोक्त मात्रा-वृत्तांना त्यांनीं हातांशीं धरलें होतें. कृष्णविजय पूर्वार्ध व प्रल्हादविजय यांत आर्यागीतीला स्थान मिळालें होतें तर ब्रह्मोत्तरखंड, मदालसाचरित्र, सप्तशती, हरिश्चंद्राख्यान इ० काव्यांतून गीति प्रकट झालेली होती. पंतांच्या प्रवृत्तीचा विचार करतां दुसरी एक गोष्ट येथें अवश्य नमूद करण्याजोगी आहे. या नवशिकेपणाच्या काळांतलीं एक कृष्णविजय खेरीज करून बाकीचीं सर्व काव्यें स्कंद, मार्कंडेय, विष्णु वगैरे पुराणांतलीं आहेत; भारत, रामायण भागवतांतलें कथानक एकही नाहीं. याच्या उलट पंतांची पुढची काव्यरचना पाहिली तर ती, एक तर अगदीं स्वतंत्र, किंवा भारत, रामायण, भागवत यांवर आधारलेली अशी दिसते. आर्याकेकावलि, नामरसायन वगैरे भक्तिपर खंडकाव्यें, त्याचप्रमाणें अनेक देवतांचीं, क्षेत्रांचीं, नद्यांचीं स्तोत्रें व काशीयात्रा प्रकरणें ही सर्व स्वतंत्र काव्यरचना पुढच्याच वयांत झाली आहे. परंतु स्कंद, मार्कंडेय इत्यादि अवांतर पुराणांवरची रचना पुढील वयांत नांवाला देखील सांपडत नाहीं. पंतांच्या प्रवृत्तीच्या दृष्टीनें हा प्रकार लक्षांत ठेवण्याजोगा आहे. भागवतवाचनाचा दृढ परिणाम पंतांच्या मनावर पूर्ववयांतच होऊन त्यांचें हृदय जरी भक्तिरसपूर्ण बनून गेलें होतें तथापि भारत, रामायण, भागवत यांनीं पूर्णपणें चित्त आकृष्ट होऊन दुसरीकडे पहाण्याची अगदीं सोय नाहीं अशी त्यांची स्थिति अजून झाली नव्हती. कृष्णविजयाची जरी रचना चालली होती तरी त्याबरोबरच इतर पुराणां-तील कथाभागांचाही ते आदर करीत होते. पुढें पुढें मात्र त्यांची दृष्टि केंद्रीभूत होऊन ती भारत, रामायण व भागवत या ग्रंथांवरच खिळून राहिली. श्रीकृष्ण-कथा व श्रीरामकथा यांच्या शिवाय त्यांना दुसरें कांहीं गोड लागेनासें झालें.

१०. आम्ही या कालांत गणलेल्या काव्यांपैकीं कृष्णविजयपूर्वार्धाविषयींच काय तो विशेष वाद होण्याजोगा आहे; तेव्हां त्याविषयीं जरा विस्तारानें विचार करूं. पंतांनीं कृष्णविजय लिहिण्याला आपल्या ग्रंथरचनेच्या अगदीं आरंभींच्या कालांत सुरवात केली असली पाहिजे असें म्हणण्याला बरींचशीं प्रमाणें आहेत.

( १ ) कृष्णविजयाच्या आरंभीं ते म्हणतात.—

निजसुखराशि शुकाचा । बोल वदे किति मयूर हा शिशु काचा ? । १. ८.

पंतांनीं आपल्यास येथें 'काचा शिशु' म्हणजे कच्चा, अननुभवी मुलगा असें म्हटलें आहे. हे उद्गार प्रश्नोत्तरखंडांतील 'रामनंदनें बाळें,' 'कवि नवीन' या उद्गारांशीं अतिशय साम्य पावतात. पंतांनीं आपल्यास दुसऱ्या कोणत्याही काव्यांत बाळ किंवा शिशु म्हणवून घेतलें नाहीं, इतकेंच नव्हे तर पुढें पुढें लिहिलेल्या काव्यांत आत्मविश्वासाचे व सात्विक अभिमानाचे उद्गार काढलेले वारंवार दिसून येतात. अर्थात् प्रश्नोत्तरखंड लिहिलें त्याच सुमारास कृष्णविजयासही सुरवात झाली असावी असें या उद्गारांवरून वाटतें.

( २ ) दुसरें प्रमाण पंतांच्या अंतःकरणप्रवृत्तीचें होय. प्रह्लादविजयाच्या अंतीं पुढील गोड श्लोक आहेत.

हरिपादयुगस्मरणप्रवणें भगवज्जनदिव्यकथाश्रवणें ।
चतुरें रसिकें समय क्रमणें सुख अन्य नसेचि भवभ्रमणें ॥ ४. ४९ ॥

श्रीमद्विष्णुपुराणसागरसुधा प्रह्लादजीची कथा
साधुश्रोत्रपथासि येउनि हरी संसाररोगव्यथा ।
केलें सेवन यास्तव क्षणभरी आम्हां न मानें प्रथा
हा काळव्यय चांगला इतरथा आयुष्य जातें वृथा ॥ ४. ५० ॥

हरिध्यानासक्त प्रकृतिविषयप्राप्तविकृती
कृती लक्ष्मीरामाकृतिभव मयूरेश सुकृती ।
तया दे हे वाणी प्रभु कमळपाणी, बुधमनीं
असो पीयूषाची लहरि भवसंतापशमनीं ॥ ४. ५१ ॥

या श्लोकांमध्यें पंतांनीं आपला भगवद्गुणगानाचा संकल्प व आपल्या अंतःकरणाचा झालेला प्रेममय भाव वाचकांपुढें मोठ्या विश्वासानें प्रकट केला आहे. पंतांच्या या 'हरिध्यानासक्त' झालेल्या व 'इतरथा आयुष्य जातें वृथा' असें

---

* का. सं. प्रतींत 'पृथा' असा पाठ आहे तो अशुद्ध दिसतो.

मानणाऱ्या अंत:करणवृत्तींत श्रीमद्भागवताच्या दृढावलोकनाचें प्रतिबिंब अगदीं उघड दिसतें आहे. भागवत, विशेषत: दशमस्कंध, त्यांच्या वाचनांत येऊन त्यांतलीं तत्वें त्यांच्या मनांत भिनलीं नसतीं तर अशा तऱ्हेचे उद्गार त्यांच्या तोंडून निघणें अशक्य होतें. ज्या ग्रंथांतील तत्वांचें इतकें दृढ अवलोकन होऊन तीं तत्वें त्यांच्या मनांत व आचरणांतही भिनून गेलीं होतीं त्या ग्रंथावर प्राकृत काव्य करण्यासही त्यांनीं पूर्वीच आरंभ केलेला असला पाहिजे असें ओघानेंच अनुमान होतें आणि पंतांसारख्या सात्विक वृत्तीच्या रसिकास दशमस्कंधाची अलौकिक प्रेममयता तेव्हांच पटावी व त्यानें दशमस्कंधावर टीका लिहिण्यास प्रारंभींच सुरवात करावी हें अगदीं स्वाभाविक होय. असा कोणता कवि त्यांच्या वेळेपर्यंत मराठींत झाला होता कीं ज्यानें दशमावर व श्री-कृष्णलीलेवर यत्किंचितही कविता लिहिली नव्हती ? कविजनांनीं अखंड लूट करण्याचें तें प्रेमाचें, रसाचें व भक्तीचें भांडारच होतें. तेव्हां गुरुपुत्रांच्या सांगण्यावरून ब्रह्मोत्तरखंडासारखीं काव्यें रचीत असतांना त्यांचें खरें लक्ष दशमस्कंधांत गुंतून राहिलें असून त्यावर ते रचना करीत असावे हें अत्यंत संभवनीय दिसतें. पूर्वीच्या भगवद्भक्तांनीं व कवींनीं घालून दिलेलें उदाहरण त्यांच्यापुढें होतेंच. भगवद्‌गुणगानांत झालेला ' हा कालव्यय चांगला, इतरथा आयुष्य जातें वृथा ' असें स्पष्ट सांगत असतांना त्यांनीं स्वतः आयुष्याचीं तीन चार वर्षें वृथा घालविलीं असतील अशी क्षणभरही कल्पना करितां येत नाहीं. त्यांनीं याच काळांत लिहिलेलीं ब्रह्मोत्तरखंडादि काव्यें कांहींशीं त्यांच्या भगवत्कथासेवनाच्या संकल्पांत अंतर्भूत होऊं शकतील हें खरें. तथापि तीं सर्व शिवकथापर आहेत; व मुख्य गोष्ट म्हणजे पंतांच्या काव्यरचनेची गति लक्षांत घेतली असतां तीं सर्व एक दीड वर्षांत आटपून जाण्याजोगीं आहेत. वर दिलेले प्रल्हादविजयांतील श्लोक १६८० च्या अखेरचे आहेत. व पंतांनीं काव्यरचनेस सुरवात १६७४–७५ च्या सुमारास केली हें बहुधा सर्वमान्य आहे. तेव्हां या ५।६ वर्षांच्या अवकाशांतून वर्ष दीड वर्षाची वासलात लावली तरी तीन चार वर्षे पंतांनीं फुकट घालविल्याचा आरोप शिल्लकच राहतो. तेव्हां या काळांत पंतांनीं कृष्णविजय पूर्वार्ध लिहिला असला पाहिजे, या अनुमानासच उलट बळकटी येते. कृष्णविजय पूर्वार्धाचें काठिन्य, व त्यांतील दीर्घ यमकरचनेचे प्रयास हे लक्षांत घेतले असतां पंतांस तो रचण्यास दोन अडीच वर्षे सहज लागलीं

असतील व आणखीही किरकोळ काव्ये कदाचित् या अवधींत त्यांनीं रचलीं असतील.

( ३ ) पंतांच्या सर्व काव्यग्रंथांत कृष्णविजय हा कांहीं दृष्टींनीं अगदीं अपूर्व व विलक्षण असा ग्रंथ आहे. पंतांचे इतर सर्व ग्रंथ, त्यांचें येवढें थोरलें महाभारत सुद्धां, अगदीं सुश्लिष्ट, बांधीव व एका घाटणीचें काव्य आहे असें स्पष्ट दिसतें. प्रश्नोत्तरखंड, मंत्ररामायण, मंत्रभागवत, हरिवंश इत्यादि त्यांचे ग्रंथही असेच अखंड, एका धोरणांत रचलेले आहेत. कृष्णविजय हें काव्य मात्र अशा तऱ्हेचें नाहीं. एकमेकांशीं अत्यंत विसदृश असे रचनेचे चार थर कृष्णविजयामध्यें दिसून येतात व ते सर्व एकाच कालीं, एकाच सपाट्यांत रचले गेले असावे असें मानणें जवळ जवळ अशक्य होतें. पहिला थर म्हणजे कृष्णविजयाचा सर्व पूर्वार्ध होय. हा आर्यागीति वृत्तांत रचलेला असून तो फार क्लिष्ट, लांब लांब यमकांनीं खचलेला, दूरान्वय, अलंकारांची अप्रशस्त गर्दी वगैरे रसहानिकर दोषांनीं व्याप्त, असा आहे. त्यांतही प्रेमळपणा व सौंदर्य नाहीं असें नाहीं. पण तें वरील गोष्टींनीं बरेंचसें आच्छादित झालेलें आहे. दुसरा थर म्हणजे उत्तरार्धाचे आर्यागीति वृत्तांतच रचलेले ५० ते ५४ अध्याय होत. या अध्यायांत मागील एकुणपन्नास अध्यायांतील रचनासरणीचा मागमूस सुद्धां उरलेला नाहीं. येथें लांब लांब यमकांचा आग्रह अगदीं नाहींसा झालेला असून रचना सरळ, सोपी व साधी अशी उतरली आहे. यापुढील तिसरा थर म्हणजे अ० ५५ ते ७९ पर्यंतचा होय. हा सर्व अक्षरगणवृत्तांत म्हणजे श्लोकांत रचलेला असून यांतील मुख्य वृत्त शार्दूलविक्रीडित हें आहे. हा भाग काव्यदृष्टीनें फार उच्च दर्जाचा वठला असून यांतील वर्णनशैली सफाईदार व डौलदार अशी साधलेली आहे. यापुढील चौथा व शेवटचा भाग ८० ते ९० या अकरा अध्यायांचा होय. हा पंतांच्या नेहमींच्या आर्या उर्फ गीति वृत्तांत रचलेला असून अतिशयच बहारीचा वठला आहे. पंतांची काव्यशक्ति, सहृदयता व प्रेमळपणा परमोत्कर्षास गेलेला पहावयाचा असेल तर तो येथें उत्कृष्ट रीतीनें दृष्टीस पडेल. याच्यामध्यें गुण कोणकोणचे आहेत यांचें सविस्तर वर्णन करतांच येणार नाहीं. रसिकांना डोलावयास लावणाऱ्या उत्तम काव्यांत जे गुण असावे लागतात ते सर्व यांत आहेत येवढेंच फक्त सांगणें शक्य आहे.

तेव्हां अशा विसदृश गुणांचे निरनिराळे भाग असलेलें कृष्णविजय काव्य एका कालीं, एका सपाट्यांत लिहिलें गेलें असेल असें मानणें अशक्य होतें. आतां पंतांच्या

प्रल्हादविजयाची रचना सरळ, सोपी व दीर्घयमकरहित अशी आहे. तेव्हां पंतांनीं प्रथम अतिसरळ व प्रसादयुक्त असा प्रल्हादविजय लिहिला व त्यानंतर अति-क्लिष्ट व दीर्घ यमकांनीं युक्त असा कृष्णविजयाचा पूर्वार्ध ( १-४९ ) लिहिला आणि मग प्रल्हादविजयाशीं पुष्कळच साम्य पावणारे कृष्णविजयाचे ५० ते ५४ अध्याय लिहिले अशी कल्पना ग्रंथकाराच्या लेखनशैलीची परिणति कस-कशी होत जाते याचें मार्मिक ज्ञान असणाऱ्या कोणाही विवेचकास करावीशी वाटणार नाहीं. कोणाही ग्रंथकाराची परिणति कठिनतेकडून सुगमतेकडे व कृत्रिमतेपासून सहजसाध्य सौंदर्याकडे होत असते असा साधारण अनुभव आहे. तेव्हां पंतांनीं प्रथम आर्यागीतीमध्यें कृष्णविजयास सुरवात केली व त्याचा पूर्वार्ध रचून संपविल्यानंतर प्रल्हादविजय लिहिला असें मानणें जास्त सयुक्तिक दिसतें. व वर दिलेल्या प्रमाणांवरूनही तेंच सिद्ध होत आहे. पंतांनीं प्रथम शके १६७७-७८ च्या सुमारास कृष्णविजय लिहिण्यास सुरवात केली असावी व १६८० च्या सुमारास त्याचा पूर्वार्ध लिहून पुरा केला असावा. हा पूर्वार्ध जरा जास्त क्लिष्ट झाला असें त्यांस त्या वेळेस दिसून आलें असावें म्हणून ही क्लिष्टता, व क्लिष्टतेला कारण होणारे दीर्घ यमकें, अलंकारांची गर्दी, कृत्रिम रचना वगैरे विशेष सोडून देऊन आर्यागीतीमध्यें सरळ, बालबोध रचना आपल्यास साधते कीं नाहीं हें आजमावण्याकरितां त्यांनीं प्रल्हादविजय १६८० मध्यें लिहून पाहिला असावा. प्रल्हादविजय हें अगदीं लहान म्हणजे २४० आर्यागीतींचें सुबोध व सामा-न्यतः चांगल्यापैकीं काव्य आहे. प्रल्हादविजय लिहून बराच काळ लोटल्यानंतर पंतांनीं कृष्णविजयाच्या उत्तरार्धास सुरवात केली असावी व ५०-५४ हे आर्या-गीतिंतील अध्याय लिहिले असावेत असें पुढें दाखविलेंच आहे. (परिच्छेद १२पहा).

( ४ ) पंतकाव्यांच्या वृत्तरचनेकडेही आपणास यावेळीं थोडेसें लक्ष पुरविलें पाहिजे. कृष्णविजयाच्या निरनिराळ्या विभागांचे रचनाकाल ठरविण्याला त्याचा बराच उपयोग होण्याजोगा आहे. व एकंदरीनें पंतांच्या सर्व काव्यांचे रचनाकाल आजमावण्यास देखील त्यांचीं वृत्तें हें एक गमक उपयोगीं पडणार आहे. पंतांनीं नानाविध वृत्तांत विपुल काव्यरचना केली आहे. ते आपल्या स्फूर्तीप्रमाणें, स्वतः-च्या नैसर्गिक प्रवृत्तीस अनुसरून कविता करीत असत. अमक्या अमक्या वृत्तांत अमक्या नमुन्याप्रमाणेंच काव्यरचना केली पाहिजे असा निर्बंध त्यांच्या काळीं नव्हता. व त्यांनीं स्वतः अशा तऱ्हेचा कोणताही निर्बंध मानला असल्याचें दिसत

नाहीं. संस्कृत साहित्यशास्त्रकारांचे काव्यरचनेसंबंधाचे नियम व संस्कृत वाङ्मयांत सर्वमान्य असलेल्या रूढि यांना त्यांनीं धाब्यावर बसविलें आहे. त्यांनीं आपलीं कांहीं काव्यें आपले आप्त, मित्र, यजमान इत्यादिकांच्या सूचनेवरून लिहिलीं असल्याचें दिसतें हें खरें. तथापि या सूचनांचा आदर, त्यांनीं सांगितलेल्या कथानकावर काव्य करण्यापुरताच पंतांनीं केला. काव्याची अंतर्गत रचना, त्यांतील वृत्तें इत्यादिकांच्या बाबतींत ते स्वतःच्या मनःप्रवृत्तीस अनुसरूनच वागले हें त्यांच्या काव्यांवरूनच उघड दिसतें. अशी स्थिति असल्यामुळें त्यांच्या वृत्तरचनेवरून स्वभावतः जीं अनुमानें निघतील तीं इतर उपलब्ध प्रमाणांशीं विरुद्ध नसल्यास बरींच विश्वसनीय ठरण्याचा संभव आहे. अशा अनुमानांपैकीं एक व्यापक अनुमान म्हणजे सारख्या वृत्तांतील काव्यें त्यांनीं एकाच कालखंडांत लिहिलीं असावींत हें होय. एका प्रकारच्या वृत्तरचनेशीं कवीचें तादात्म्य झालें म्हणजे त्याच वृत्तांत सारखी रचना करीत जाणें त्याला सुलभ वाटेल व त्या कालांत त्याची काव्यरचना सर्वस्वीं त्याच वृत्तांत होईल. मानवी प्रकृतींत सवईचा जोर केवढा असतो याचा विचार केल्यास वरील अनुमानाची सत्यता तेव्हांच पटेल. कृष्णविजय अ. ५५–७९ यांतील श्लोकबद्ध रचना पंतांनीं ज्या कालांत केली त्याच कालांत त्यांनीं आपलीं इतर श्लोकबद्ध प्रकरणेंही रचलीं असावीं असें सामान्यतः म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाय कृष्णविजयाचा आर्यागीतिवृत्तात्मक भाग प्रल्हादविजयाच्या आगेंमागें केव्हां तरी रचला असला पाहिजे हा तर्कही अंशतः वृत्तसाम्यावरूनच बसविलेला होय. आणखीही कांहीं गोष्टी त्यांच्या वृत्तरचनेच्या इतिहासावरून कळून येतात हें पुढील विवेचनावरून दिसून येईलच.

पंतांच्या इतकी नानाविध वृत्तांत रचना केलेला कवि आजपर्यंत कोणीही झालेला नाहीं. खुद्द मराठीची ओवी व अभंग हीं परंपरागत वृत्तें, संस्कृत छंदःशास्त्रांत सांगितलेलीं बहुतेक सर्व अक्षरगणवृत्तें व मात्रावृत्तें, दोहा हे हिंदुस्थानी वृत्त व साकी, सवाई, घनाक्षरी वगैरे देशी छंद, गझल इ० फारशी चाली, या सर्वांत पंतांनीं रचना केली आहे. आपल्या विद्यार्थिदशेच्या शेवटीं लिहिलेलें कुशलवाख्यान हेंच त्यांचें पहिलें काव्य होय असें वर प्रतिपादन केलेंच आहे. लहान मुलाला ज्याप्रमाणें एकादी चमत्कारिक वस्तु सांपडली कीं ती ज्याला

त्याला दाखविल्याशिवाय चैन पडत नाहीं त्याचप्रमाणें पंतांनीं आपल्या नवसंपादित छंदःशास्त्राच्या ज्ञानाचें प्रदर्शन या काव्यांत मांडलें आहे. इतर अनेक वृत्तांबरोबरच छंदःशास्त्रोक्त पांचही प्रकारच्या आर्यावृत्तांचीही या काव्यांत पंतांनीं योजना केली आहे; ( पहा, पूर्वार्ध पृ. १४१ ). हें काव्य लिहिल्यावर पुढील काव्यें लिहिण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यांच्या विचक्षण बुद्धीस दिसून आलें कीं मात्रावृत्तें उर्फ आर्या या विपुल व शीघ्र रचनेस जशा उपयुक्त होण्याजोग्या आहेत तसे श्लोक उपयोगीं पडण्याजोगे नाहींत. पांची आर्यावृत्तांमध्यें देखील दोन्ही अर्धें सारखीं असलेलीं गीति व आर्यागीति हीं वृत्तें यमकरचनेस विशेष अनुकूल असल्यामुळें त्यांना जास्त पसंत पडलीं. एक अर्ध लांब व दुसरें त्याच्या मानानें आखूड असल्यास त्यांत यमकरचना चांगली साधणार नाहीं व शोभणारही नाहीं. तेव्हां गीति व आर्यागीति या दोहोंत त्यांनीं यापुढें रचना करण्याचा संकल्प केला. कृष्णविजय अ० १-५४ व प्रह्लादविजय हीं काव्यें आर्यागीतींत रचलीं गेलीं आणि ब्रह्मोत्तर खंड, सप्तशती, हरिश्चंद्राख्यान, मदालसाख्यान इ० काव्यें गीतिवृत्तांत तयार झालीं. गीति व आर्यागीति या दोघींची ही स्पर्धा उपयुक्त सर्व काव्यें रचून होईपर्यंत म्हणजे १६८२-८३ पर्यंत चालली असावी. पुढें आर्यागीति या झटापटींत मागें पडली व गीतीनेंच पंतांच्या मनावर पूर्णपणें पगडा बसवला. यानंतर ' आर्यागीतिमुक्तामाला ' नामक एका कहानशा रामायणाशिवाय पंतांनीं त्या वृत्तांत कोणचीही रचना केली नाहीं. तेव्हां या वृत्तरचनेच्या इतिहासावरूनही कृष्णविजयपूर्वार्ध पंतांनीं अगदीं प्रारंभीं लिहिला असावा असेंच दिसून येतें.

११. तेव्हां ( १ ) कृष्णविजयाच्या आरंभीं ' काचा शिशु ' ( कच्चा पोर ) म्हणून स्वतःचा केलेला उल्लेख, ( २ ) प्रल्हादविजयांतील उल्लेखावरून १६८० पूर्वींच हरिध्यानासक्त व भगवद्गुणगानाव्यतिरिक्त गेलेला काळ व्यर्थ मानणारी अशी पंतांची दिसून येणारी मनोवृत्ति; ( ३ ) कृष्णविजयाच्या रचनेचे चार विभाग व त्यांपैकीं अ० १–४९ हा विभाग प्रल्हादविजयाच्या पूर्वींच लिहिला असला पाहिजे असें त्याच्या रचनाशैलीवरून निघणारें अनुमान; व ( ४ ) पंतांच्या वृत्तरचनेच्या इतिहासांत आर्यागीतीचें प्रारंभींच दिसून येणारें स्थान;— या चार प्रमाणांवरून कृष्णविजयाचा पूर्वार्ध प्रल्हादविजयाच्या अगोदर रचून झालेला असला पाहिजे असें जवळ जवळ निश्चयानें म्हणतां येतें.

[ २ ]

१२. कृष्णविजयपूर्वार्धाच्या शेवटीं पुढें दिल्याप्रमाणें ग्रंथसमाप्तिदर्शक उल्लेख आहे.

रामकृष्णचरणीं समर्पित, ग्रंथ हो रसिकचित्त तर्पित ।
न प्रमादभवदोष राहवू, सत्प्रमोदनयनोद वाहवू ॥
समाप्तश्चायं श्रीमत्कृष्णविजयः । श्रीरामकृष्णार्पणमस्तु ।
श्रीराम जयराम जयजयराम ॥
कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मनावानुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ॥
शुभं भवतु । श्रीरामचंद्रः शरणं श्रीरस्तु ॥

( कृ. वि. पराडकरी आवृत्ति पृ. १८३ )

कोणत्याही ग्रंथाच्या शेवटीं केला तरच शोभेल असा ग्रंथसमाप्तीचा व समर्पणाचा उल्लेख येथें पंतांनीं केला आहे. त्यांनीं आपल्या इतर कोणत्याही ग्रंथांत केवल ग्रंथाचा एकादा भाग समाप्त झाला म्हणून अशा तऱ्हेचा मजकूर कोठेंही लिहिलेला नाहीं. येथें मात्र ' समाप्तश्चायं श्रीमत्कृष्णविजयः । ' असें ते स्पष्टच म्हणतात. एकादा ग्रंथ काय किंवा इतर कोणतेंही कर्म काय, तें संपूर्ण झालें म्हणजेच कृष्णार्पण होऊन ' कायेन वाचा ' म्हावयाचें असतें, हा परिपाठ सर्व आर्यधर्मीयांना परिचित असाच आहे. यावरून अर्थात् हें उघड दिसतें कीं दशमस्कंधाचे १-४९ अध्याय मराठींत उतरल्यावर 'सज्जनप्रार्थना' रूप उपसंहार लिहून तेथेंच पंतांनीं प्रथम ग्रंथसमाप्ति केली होती. या सज्जनप्रार्थनेंत त्यांनीं—

अभय दिधलें आहे, वाहे शुचिप्रतिभाझरा

असें म्हटलें आहे. यावरून हाच ग्रंथ पुढें चालविण्याचा त्यांचा त्यावेळीं हेतु होता असेंच कांहीं अनुमान निघत नाहीं. कारण शुचिप्रतिभेचा झरा प्रस्तुत ग्रंथ संपूर्ण झाला तरी इतर ग्रंथ रचतांना त्यांना उपयोगीं पडणारा होताच. तेव्हां शके १६८० सालीं त्यांनीं दशमाचे ४९ अध्याय लिहून तेथेंच ग्रंथ पुरा केला होता ही गोष्ट निश्चित होय. हा पुरा केलेला ४९ अध्यायी ग्रंथ बराच काळपर्यंत तसाच राहिला असावा. हा ग्रंथ आपण पूर्ण केलेला आहे अशी पंतांची भावना बराच वेळ कायम राहिली असली पाहिजे. नाहींतर त्यांनीं उपसंहारादाखल

लिहिलेली सज्जनप्रार्थना व कृष्णार्पणाचा उल्लेख मोडून लगेच पुढील अध्यायास प्रारंभ केला असता.

तेव्हां कृष्णविजयपूर्वार्धं लिहून झाल्यानंतर बऱ्याच अवकाशानें म्हणजे ३।४ वर्षांनीं उत्तरार्ध रचण्याचें काम पंतांनीं हातीं घेतलें असावें. साहजिकपणेंच, पूर्वींचे ४९ अध्याय ज्या वृत्तांत रचलेले होते त्याच वृत्तांत त्यांनीं पुढील रचनेस प्रारंभ केला. पण याप्रमाणें पूर्वीच्याच आर्यागीति वृत्तांत ५ अध्याय रचल्यानंतर त्यांना त्या बोजड वृत्ताचा कंटाळा आला. तें वृत्त म्हटलें असतां कानाला गोड लागत नाहीं, हीही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली असावी. तेव्हां तें वृत्त सोडून त्यावेळीं त्यांच्या मनांत विशेष भरलेल्या शार्दूलविक्रीडितादि श्लोकवृत्तांत त्यांनीं ५५ व्या अध्यायापासून पुढें रचना करण्यास सुरवात केली. अर्थात् ही ५५ व्या अध्यायापासूनची श्लोकबद्ध रचना ५४ व्या अध्यायानंतर लागोपाठ सुरू झाली. ५४ व ५५ या अध्यायांमध्यें कांहीं खंड पडला नाहीं, हें पोथींतील दिसून येणाऱ्या विशेषावरून मागें दर्शविलेंच आहे. ( पहा पृ. १५७ ).

१३. कृष्णविजयाचे ५५ ते ७९ हे विविधश्लोकबद्ध अध्याय ज्या कालांत पंतांनीं रचून पुरे केले तोच पंतांच्या **श्लोकबद्ध रचनेचा कालखंड** होय. भक्तभूषण, सुदामचरित्र, भृगुचरित्र, कृष्णामाहात्म्य इत्यादि अनेक श्लोकबद्ध प्रकरणें, निंदकपंचक, बाल व अयोध्या येवढीं दोनच कांडें रचून अपूर्ण राहिलेलें साररामायण उर्फ वृत्तरत्नमयरामायण व पांगारकरांनीं अगदीं प्रारंभींच्या काव्यांत ढकललेलें भस्मासुराख्यान हीं सर्व काव्यें याच कालांतलीं होत. वृत्तरचनेच्या, भाषासरणीच्या वगैरे साम्यावरून हीं काव्यें एकाच कालखंडांतलीं होत असें ठरतें. हा काल शके १६८३ ते १६८८ पर्यंतचा, म्हणजे काव्यरचनेच्या दृष्टीनें पूर्वावस्थेचा व उमेदवारीचाच; परंतु सांसारिक आयुष्यक्रमाच्या दृष्टीनें पंतांच्या प्रौढ वयाचा व संसारसुखाच्या मध्याह्नीचा काल होय. याच कालांतील त्यांच्या काव्यामध्यें पत्नीप्रेम, मित्रप्रेम, अतिथिसत्कार वगैरे गृहस्थाश्रमास शोभविणारे गुण उत्कर्षास गेलेले दृष्टीस पडतात; आणि याच कालांतील त्यांची श्लोकरचनाही प्रौढ, भरदार व पुष्ट अशी झाली आहे. या कालांतील सर्वच काव्यें काव्यगुणांत एका तोलाचीं आहेत असें नाहीं. कृष्णविजय, भक्तभूषण इ. कांहीं उत्कृष्ट आहेत, तर भृगुचरित्रादि कांहीं सामान्य आहेत. काव्यें एकाच कालांत रचलेलीं असलीं, त्यांचीं वृत्तें

सारखीं असलीं म्हणजे काव्यसौंदर्यांतही तीं सारखींच ठरतील असें नाहीं. याच्या उलट कवित्वगुणांत एकाच तोलाचीं काव्यें असलीं म्हणजे तीं एकाच कालीं रचलीं असलीं पाहिजेत असेंही म्हणतां येणार नाहीं. नाहीं तर प्रश्नोत्तरखंड व हरिविजय हीं दोन्हीं सामान्य दर्जाचीं काव्यें एकाच वेळीं रचलीं असें म्हणण्याचा प्रसंग येईल. रचनेचें सौंदर्य व काव्यमाधुरी ही तात्कालिक स्फूर्तीवर बहुतांशीं अवलंबून असते. एकाच काव्यांत एक पद्य उत्कृष्ट असेल तर त्याच्याच पुढचें दुसरें पद्य अगदीं नीरस असल्याचें आढळून येईल. असो.

१४. येथें **साररामायण** उर्फ **वृत्तरत्नमयरामायण** व **त्रुटितरामायण** या दोन रामायणांविषयीं थोडासा खुलासा करणें उचित होईल. पंतरचित रामायणसमूहांत किंबहुना पंतांच्या अखिल काव्यसंग्रहांत हीं दोन काव्यें कांहीं दृष्टींनीं अपूर्व आहेत. एकतर हीं दोन्हीं रामायणें अपूर्ण आहेत, नुसतीं अपूर्ण आहेत इतकेंच नव्हे तर कवीनें बुद्ध्याहून अपुरीं ठेवलेलीं अशीं आहेत. पंतांनीं असा प्रकार आपल्या दुसऱ्या कोणत्याही काव्याचा केलेला आढळत नाहीं. एका कृष्णविजयाखेरीज त्यांचीं सर्व काव्यें एकधोरणी व एका घाटणीचीं आहेत; व कृष्णविजयाच्या रचनेंत कित्येक प्रसंगीं खंड पडला असला व भिन्न वृत्तादिकांचा अवलंब करावा लागला असला तरी तें काव्य तडीस नेऊन सोडल्याखेरीज ते राहिले नाहींत. परंतु उपर्युक्त दोन रामायणांच्या बाबतींत मात्र त्यांनीं कधीं न केलेला प्रकार केला आहे. साररामायण अयोध्याकांडाच्या अखेरीपर्यंत लिहून पत्राच्या मध्यावरच सर्ग पुरा करून तेथें स्वहस्तानें ग्रंथसंख्याही त्यांनीं लिहून ठेविली आहे. यावरून तें काव्य येथेंच अर्धवट स्थितींत मुद्दाम होऊन त्यांनीं पूर्ण केलें असें उघड दिसतें. त्रुटित रामायणाचीं फक्त पांचच पत्रें उपलब्ध आहेत. त्याच्या पांचव्या पत्रावर शेवटपर्यंत मजकूर लिहिलेला आहे; तथापि त्या रामायणास त्यांनीं स्वतः नांवही दिलेलें नाहीं व साररामायणांतील कित्येक श्लोक या रामायणांत तसेच्या तसेच पुनः उद्धृत केलेले आहेत, यावरून हें रामायणही त्यांनीं शेवटास लावलें असावें असें वाटत नाहीं. एका काव्यांतले कित्येक श्लोक दुसऱ्या काव्यांत उतरणें हा देखील प्रकार पंतांनीं मोठा अजबच केला आहे. असें त्यांनीं दुसऱ्या कोठेंही केलें असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं.

साररामायण सर्व श्लोकबद्ध असून संस्कृत महाकाव्यांची घाटणी त्यांत पुष्कळशी

अवलंबलेली आहे. म्हणजे संस्कृत काव्यांतली सर्गरचना पंतांनीं अवलंबिलेली असून सर्गांतले सर्व श्लोक एकाच वृत्तांत रचून समाप्तीचा श्लोक तेवढा भिन्न वृत्तांत घालावयाचा या प्रकाराचेंही अनुकरण केलें आहे. तथापि सर्ग अगदीं लहान लहान म्हणजे १५।२० श्लोकांचे केले असून असे सर्ग बालकांडांत २१ व अयोध्या कांडांत ११ इतके आहेत. हें रामायण साधें, प्रेमळ व प्रसाद-युक्त असलें व काव्याच्या दृष्टीनें चांगल्यापैकीं असलें तरी अगदीं उत्कृष्टांत गणना करण्याजोगें नाहीं. रामायणाची कथा सरळ, सुरेख रीतीनें यांत सांगितली आहे येवढेंच. या काव्याचा मोठा विशेष म्हणजे त्यांतील अद्‌भुत वृत्तवैचित्र्य होय. पिंगलमुनिप्रणीत छंदःशास्त्रांतील व वृत्तरत्नाकारांतील अप्रसिद्ध, कोना-कोपऱ्यांतलीं वृत्तें काढून त्यांत रचना करावयाची असा चंग बांधूनच हें काव्य पंतांनीं लिहिलें कीं काय असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. बालकाण्डाच्या १९, २० व २१ या सर्गांत अनुक्रमें वैतालीय, मात्रासमक व सममात्रक असे मात्रा-वृत्तांचे तीन भेद प्रथित केले असून या तिहींतले सर्व पोटभेद एकेका पद्यांत उदाहरणादाखल रचून दाखविले आहेत. १ वैतालीय, औपच्छंदसिक, आपा-तलिका, दक्षिणांतिका, उदीच्यवृत्ति, प्राच्यवृत्ति, प्रवृत्तक, अपरांतिका, चारु-हासिनी; २ अचलधृति, मात्रासमक, विश्लोक, वानवासिका, चित्रा, उपचित्रा, पादाकुलक; ३ शिखा, खजा, अनङ्गक्रीडा, अतिरुचिरा; याप्रमाणें या तीन सर्गांतील वृत्तांची यादी असून ती वृत्तरत्नाकारांतील 'वैतालीय' 'मात्रा-समक' वगैरे प्रकरणांत वर्णिलेल्या वृत्तभेदांस तंतोतंत अनुसरून आहे. वैतालीय, मात्रासमक हीं नांवें बहुश्रुत मराठी वाचकांच्या कानावरूनही कधीं गेलीं नसतील; व वर दाखल केलेले त्यांचे पोटभेद तर छंदःशास्त्राचें मुद्दाम अध्ययन न केलेल्या चांगल्या संस्कृतज्ञासही माहीत असणें संभवनीय दिसत नाहीं. अशींच अत्यंत अप्रसिद्ध व विचित्र छंदःशास्त्रोक्त वृत्तें या काव्यांत सर्वत्र उपयोजिलीं असून ४६५ पद्यसंख्या असलेल्या या काव्यांत वरील पोटभेदांसकट एकंदर ६७ वृत्तें उपयोगांत आणिलीं आहेत, असें गणना करतां दिसून येतें.

वृत्तरचनेच्या बाबतींत प्रस्तुत काव्यास किती कृत्रिमता आलेली आहे, याची थोडीशी तरी कल्पना यावी म्हणून हा वर विस्तार केला आहे. छंदःशास्त्र-ज्ञानाचें बेसुमार प्रदर्शन करण्याऱ्या या प्रवृत्तीवरून पंतांनीं हें आपल्या पूर्व वयांत श्लोकरचनेच्या काळांतच, म्हणजे १६८३-१६८८ या अवकाशांत लिहिलें

असावें असें वाटतें. पंतांची नेहमींची काव्यरचना अप्रतिहत वेगवान व धो धो वाहणारी अशी आहे. अशा नैसर्गिक प्रवृत्तीस जागोजाग बंधन करणारे छोटे छोटे सर्ग व अप्रसिद्ध अशा वृत्तांतली कृत्रिम रचना यांचा पंतांस लवकरच कंटाळा आला असावा. म्हणून त्यांनीं हें काव्य मध्येंच अपुरें ठेवलें असावें. पुढें लवकरच आर्येकडे त्यांची प्रवृत्ति होऊन आर्यावृत्तांत मंत्ररामायण रचण्याची त्यांना स्फूर्ति झाली; तेव्हां हें 'वृत्तरत्नमय' रामायण आर्यारचनेच्या एकसारख्या फोंफावत जाणाऱ्या प्रवाहापुढें कृत्रिम पल्वलाप्रमाणें तिरस्कृत होऊन कायमचें कोपऱ्यांत दडून बसलें असावें. पंतांनीं इतरांस त्याची प्रत करून घेऊं न देतां बुद्धिपुरःसर तें अप्रसिद्धच ठेवलें असावें व अष्टोत्तरशत रामायणांत त्याची गणनाही केली नसावी असें वाटतें. नाहीं तर हें पूर्ववयांतील असून व काव्यदृष्ट्या बरें वठलें असून त्याच्या प्रती इतरत्र उपलब्ध झाल्याखेरीज राहत्या ना. मंत्ररामायण उत्तम तऱ्हेने रचून पंतांनीं पूर्ण केलें; त्याच्या गुणांमुळें त्याचा प्रसारही होऊन सर्वत्र बोलबाला झाला; व त्यानंतर पंतांनीं महाभारताचें प्रचंड कार्य अंगावर घेतलें. तेव्हां अपुरें राहिलेलें साररामायण बिचारें पंतांच्या दप्तरांत तसेंच पडून राहिलें असें दिसतें. पांगारकरांनीं याचा शोध लावला तोंपर्यंत हें अज्ञात होतें व पराडकरांची पंतकाव्यांची आवृत्ति प्रसिद्ध होईपर्यंत अप्रसिद्धच होतें. याच्या पोथींतील पंतांचें अक्षर पूर्वकालीन आहे; शिवाय वर वर्णिलेले वृत्तरचनेचे कृत्रिम प्रकार कवीनें केले आहेत यावरून हें पंतांनीं पूर्ववयांतच रचलेलें होतें याविषयीं शंका रहात नाहीं.

वरील विवेचनावरून पांगारकरांनीं आपल्या पुस्तकांत या रामायणाविषयीं जे उद्गार काढले आहेत ( मो. च. पृ. ४७८–७९ ) ते किती अत्युक्तिपूर्ण आहेत याची साक्ष पटेल. ' हें संपूर्ण सांपडल्यास पंतांच्या १०८ रामायणांत यासच पहिलें स्थान द्यावें लागेल, इतकेंच काय पण पंतांची केकावलि जशी जगन्मान्य होऊन बसली आहे तसेंच हें ' छंदोरामायण ' ही जगन्मान्य होऊन बसल्याखेरीज राहणार नाहीं. पंतांच्या कवित्वाचा उत्कर्ष जसा केकावलींत झाला आहे तसा तो या छंदोरामायणांतही झाला आहे. १०८ रामायणांपैकीं हें शेवटचें रामायण असावें. व यानंतर पंतांनीं केकावलीकडेच आपलें चित्त वळविलें असावें. ' असें पांगारकरांचें एकंदरीनें म्हणणें आहे ! केकावलींत योजिलेलें सुप्रसिद्ध पृथ्वीवृत्त याचा या साररामायणांत मागमूसही नाहीं. व त्यांतील कल्पनाचम-

स्फूर्ति, निरुत्तर कोटिक्रम, भव्यता, यांचाही या रामायणांत फारसा पत्ता लागत नाहीं हें येथें वाचकांनीं लक्षांत ठेवावें ! असो.

' त्रुटित ' रामायणाविषयीं निश्चित किंवा निदान संभवनीय असें कांहींच विधान करितां येत नाहीं.

[ ३ ]

१५. यापुढील तिसरा कालखंड १६८८ ते १६९४ पर्यंतचा सहा वर्षांचा होय. या कालांतील रचनेचा मुख्य विशेष म्हणजे आर्यावृत्तानें पूर्णपणें प्रस्थापित झालेलें प्राबल्य हा होय. पंतांनीं आपल्या लाडक्या आर्यावृत्ताला पुनः हातांशीं घेतलें व यानंतर पुन: केव्हांही त्यांनीं आर्येचा यत्किंचितही अव्हेर केला नाहीं. या काळाच्या प्रारंभींच बहुधा पंतांनीं सीतागीत, सावित्रीगीत व रुक्मिणीगीत हीं रचलीं असावींत, असें त्यांच्या रचनाशैलीवरून वाटतें. तथापि या कालांतील मुख्य रचना म्हणजे कृष्णविजय अ. ८०–९०, मंत्ररामायण ( मराठी ), आर्यामुक्तामाला, आर्याकेकावलि, नाममाहात्म्य ( नामार्या ), संशयरत्नावलि, नामसुधाचषक, नामरसायन इत्यादि सुंदर परमेश्वरस्तोत्रें व भीष्मभक्तिभाग्य, नारदाभ्युदय, अवतारमाला इत्यादि अतिशय प्रेमळ व मोहक भागवती स्तोत्रें हीं होय. या सर्व रचनेंत प्रेमळपणाची, भक्तिरसाची कमाल झालेली दिसून येते व आर्याग्रथनकौशल्यही उत्कर्षास पोचलेलें आढळतें.

आतां वर उल्लेखिलेलीं सर्व काव्यें अजमासें १६८८–१६९४ याच कालांत झालीं असावीं असें जें वर म्हटलें आहे तें केवळ हम करेसो कायदा या न्यायानें म्हटलेलें नाहीं. बऱ्याचशा प्रमाणांवरून हाच रचनाकाल जास्त संभवनीय दिसतो म्हणून तसें वर प्रतिपादन केलें आहे. या कालांतील मुख्य काव्य म्हणजे **मंत्ररामायण** होय, व त्याच्याच रचनाकालाविषयीं विशेष वाद होण्याजोगा आहे. कृष्णविजय बहुतेक रचून झाल्यानंतर त्याचे शेवटचे आर्यारचित ८० ते ९० अध्याय रचिले जात असतांना मंत्ररामायण रचून तयार झालें असें उपलब्ध प्रमाणांचा साधकबाधक दृष्टींनीं विचार केला असतां दिसून येतें. कृष्णविजयाचे ८० ते ९० अध्याय, मंत्ररामायण आणि वर उल्लेखिलेलीं अनेक लहान लहान प्रकरणें एकाच कालखंडांत रचून तयार झालीं. मग यापैकीं मंत्ररामायण अगोदर रचून मग कृष्णविजय ( ८०–९० ) लिहिलेला असो किंवा पूर्वीपासून रचीत आणलेला कृष्णविजय अगोदर संपवून मगच मंत्ररामायणास आरंभ केलेला असो

किंवा कृष्णविजय ( ८०-९० ) व मंत्ररामायण हीं एकाच वेळीं जोडीनें लिहिलीं गेलीं असोत.

१६. मंत्ररामायण हें कृष्णविजयास प्रारंभ करण्याच्याही अगोदर, ' ग्रंथकर्तृत्वाचा पहिला भर ' संपल्याबरोबर पंतांनीं लिहिलेलें मोठें सुप्रसिद्ध काव्य होय असें पांगारकरांचें मत आहे, व त्यास अनुसरून त्यांनीं आपलें मंत्ररामायणावरील प्रकरण ' ग्रंथकर्तृत्वाचा पहिला भर ' या प्रकरणानंतर व कृष्णविजयावरील प्रकरणाच्या अगोदर लिहिलें आहे. परंतु हें आपलें मत त्यांनीं प्रमाणांसह प्रतिपादन केलेलें कोठेंही दिसत नाहीं. त्यांच्या ग्रंथांत पसरलेल्या उल्लेखांचा मागोवा घेतला असतां दोन प्रमाणांवर त्यांची भिस्त असल्याचें दिसतें. पहिलें प्रमाण : ' पुराणांतील लहान मोठया कथा मराठींत आणण्याचा प्रयत्न सफल होतो असें पाहून पंतांनीं मोठी उडी घेण्याचा विचार केला, व त्यांची पहिली उडी त्यांच्या उपास्य देवतेच्या कथानकावर पडली. व त्यांचें मंत्ररामायण जन्मास आलें. ' ( मो. च. पृ. २३३ ) असें त्यांनीं कथन केलें आहे. म्हणजे पंत हे श्रीरामाचे उपासक असल्याकारणानें त्यांनीं रामाचें चरित्रच प्रथम काव्यरूपानें मराठींत उतरलें असा पांगारकरांच्या म्हणण्याचा आशय आहे. पण हें प्रमाण अगदींच निर्बल आहे असें थोडा विचार केला असतां दिसून येईल.

पंत हे रामोपासक होते हें सुप्रसिद्धच आहे. परंतु ही रामोपासना त्यांस केव्हांपासून लागली ही गोष्ट अगदीं अनिश्चित आहे. त्यांची रामोपासना कुलपरंपरागत खास नव्हती. कारण त्यांचें कुलदैवत रामचंद्र हें नसून सोनारीचा भैरवदेव हें होय असें पांगारकरांच्या चरित्रावरूनच कळून येतें. (मो. च. पृ. १). त्यांनीं रामाची उपासना आपले गुरु केशव पाध्ये यांच्या उदाहरणावरून उचलली असावी असा एक पांगारकरांचा तर्क आहे. (मो.च.पृ १८) परंतु दोनशे वर्षांपूर्वीं होऊन गेलेल्या एका अप्रसिद्ध गृहस्थाविषयीं कोणीतरी सांगितलेल्या दंतकथेवर विश्वसून हा तर्क केलेला असल्यामुळें तो जितपत खरा तितपत खोटाही ठरण्याचा संभव आहे. पंतांचे गुरु रामोपासक होते ' असें पन्हाळगडावर पांगारकरांनीं ऐकिलें ' होतें. या ऐकीव माहितिवरून व केशव पाध्यांनीं रामनवमीस एक ग्रंथ लिहून संपविल्याचा त्यांना दाखला मिळाल्यावरून केशव पाध्ये रामोपासक होते व पंतांनीं रामोपासना त्यांच्यापासून घेतली असे तर्कांचे मनोरे पांगारकरांनीं उभारले आहेत ! पुढें पृ. १०२ वर पंतांच्या रामोपासनेविषयीं आणखी निराळीच माहिती दिली

आहे ! नगरच्या एका निपुत्रिक रामभक्तास दृष्टान्त झाल्यावरून त्यानें आपल्या-जवळील रामपंचायतनाच्या मूर्ति पंतांस आणून दिल्या; तेव्हां ' भगवान् राम आपल्या घरीं चालून आले हा आपल्यावर थोर अनुग्रह झाला ' असें त्यांना वाटून त्यांची रामभक्ति दृढ झाली अशी हकीकत तेथें दिली आहे. हीही दंत-कथाच आहे. हिच्यांत सत्याचा अंश असण्याचा संभव आहे; परंतु ही गोष्ट केव्हां घडून आली हे समजण्याचा कांहींच मार्ग नसल्यामुळें कालनिर्णयास ती सर्वथा निरुपयोगी आहे. तेव्हां पंत केव्हांपासून रामोपासक बनले याचा देखील नीट छडा लागलेला नसतांना त्या रामोपासनेमुळें पंतांनीं मंत्ररामायण पहिल्या-प्रथम लिहिण्यास घेतलें असा निराधार तर्क पांगारकरांनीं केला आहे.

बरें, राम हें पहिल्यापासूनच पंतांचें उपास्य होतें व त्यामुळें ' पहिली उडी ' त्यांची उपास्यदेवतेच्याच कथानकावर पडली असावी असें क्षणभर मानून चालूं. आपल्या कवित्वशक्तीची चांचपणी पाहण्याकरितां पंतांनीं प्रथम थोडींशीं किरकोळ आख्यानें लिहिलीं व नंतर रामायण लिहिण्यास घेतलें असा पांगारकरांच्या लिहि-ण्याचा रोख आहे. पण कवित्वाचा अजमास पाहण्याकरितां व सराव होण्याक-रितां त्यांनीं प्रथम लिहिलेलीं प्रकरणें कितीशीं असावींत ? अशीं हीं ग्रंथकर्तृत्वाच्या पहिल्या भरांतलीं काव्यें ११ असल्याचें पांगारकरांनीं दर्शविलें असून त्यांची पद्य-संख्या ३६९० म्हणजे खुद्द मंत्ररामायणाच्या जवळ जवळ दुप्पट आहे ! म्हणजे आपल्या उपास्यदेवतेवर काव्य करण्यास उत्सुक असलेले पंत पहिलीं पांच सहा वर्षें नुसतीं सराव करण्यांत घालवितात; व केवळ सराव होण्याकरितां ३७०० कविता लिहून ज्या मुख्य उद्देशाकरितां येवढा सराव केला तें रामचरिताचें गायन अवघ्या १९०० आर्यांत आटपून टाकतात असें पांगारकरांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे ! सारांश काव्य करण्याचा प्रयत्न सफल होतो कीं नाहीं हें पाहण्या-करितां पंतांनी लहान मोठीं ११ काव्यें केलीं व नंतर आपल्या ' उपास्यदेवतेच्या कथानकावर पहिली उडी ' घातली या दोन्ही पांगारकरांच्या कल्पना निराधार आहेत. पंतांचें उपास्यदैवत पहिल्यापासून रामचंद्र हेंच होतें असें निश्चयानें म्हणतां यणार नाहीं व रामचरित्रावर काव्य लिहिण्यास ते प्रारंभापासून उत्सुक होते असें तर मुळीच दिसत नाहीं. शिवाय उपास्यदैवत अमुक एक असलें म्हणजे त्याच्यावरच काव्य करण्यास कवीनें पहिल्याप्रथम सरसावलें पाहिजे असा नियम मुळींच घालून देतां येण्याजोगा नाहीं.

१७. पांगारकरांचा दुसरा आधार म्हणजे नामरसायनांतील उल्लेख होय. ' दशमस्कंधांतील दिव्य कृष्णकथा मी नूतन लिहिल्या आहेत ' असें या काव्यांत पंतांनीं रामभक्त जो मारुति त्याला निवेदन केलें आहे. याच काव्यांत मंत्र-रामायणाचा व इतर कांहीं काव्यांचाही उल्लेख आहे. त्या सर्वांमध्यें फक्त कृष्ण-कथांचाच ' नूतन लिहिल्या ' म्हणून उल्लेख केला आहे यावरून कृष्णविजय हें नामरसायनाच्या अगोदर नुकतेंच लिहिलेलें काव्य असून मंत्ररामायणादि इतर काव्यें त्याच्या पूर्वींच लिहिलेलीं असलीं पाहिजेत असा पांगारकरांचा व इतरां-चाही ग्रह झालेला आहे. आतां नामरसायनांतील काव्यांचे उल्लेख काय आहेत तें आपण पाहूं. हे उल्लेख महत्त्वाचे असल्यामुळें येथें समग्र दाखल केले आहेत.

> यावें, दर्शन द्यावें, बोलावें, डोलवूनि डोलावें ।
> वाटे स्व **मंत्ररामायण** निज नाटक तुम्हींच तोलावें ॥ ६६ ॥
> श्रीमद्भागवत श्रीदशमस्कंधांत दिव्य **कृष्णकथा** ।
> त्या नूतन लिहिल्या मीं, वाचूं ऐका रुचेल कर्णपथा ॥ १०४ ॥
> **प्रल्हादविजय** नाम ग्रंथ पहा नगचि मणिगणीं खचिला ॥ १०५ ॥
> जैमिनिकृताश्वमेधस्थित **कुशलवचरित** वर्णिलें आहे ।
> वा, हे रीति पहावी, मज तों वाटे सुधानदी वाहे ॥ १०६ ॥
> वाचोन **मंत्ररामायण** आधीं मीच, मग तुम्हीं वाचा ।
> वाचा वाचाया बहु झड घाली, ग्रंथ सत्य नांवाचा ॥ १०७ ॥
> **संशयरत्नावलि, सत्सत्कृति, केकावली, चषक,** आर्या ।
> त्वां ऐकावे ग्रंथ, प्रेमें घ्याव्याचि **रामनामार्या** ॥ १०८ ॥
> **आर्यामुक्तामाला** दावीन परंतु जरि न मागाल ।
> लागाल प्रभुकंठीं घालूं, फुगवाल कीं रमा गाल ॥ १०९ ॥
> तुमच्या पदप्रसादें सद्गुरुनें जें असेल पढवीलें ।
> तें बा तुम्हांसि दावीन **नामरसायन** जपोनि कढवीलें ॥ ११० ॥

यांतील पहिला मंत्ररामायणाचा उल्लेख पंतांनीं प्रेमभरांत हनूमन्नाटकाशीं तुलना करण्याकरितां केलेला आहे तो सोडल्यास आर्या १०४ ते ११० पर्यंत त्यांनीं आपल्या पूर्वरचित काव्यांचे एकामागून एक उल्लेख केलेले आहेत असें दिसून येतें. ह्या वेळपर्यंत पंतांनीं रचलेल्या सर्वच काव्यांचे उल्लेख यांत आलेले नाहींत; शिवाय जे उल्लेख केले आहेत ते देखील रचनाकालाच्याच अनुक्रमानें केले आहेत.

अशेही ठाम म्हणतां येत नाहीं. तरी कांहींसा तसा प्रकार असावा असें म्हणण्यास जागा आहे. कृष्णविजयाचा येथें पहिल्यानें उल्लेख केला आहे. कृष्णविजयाच्या रचनेस पंतांनीं अगदीं प्रारंभींच सुरवात केली होती हें वर दाखविलेंच आहे. व कृष्णविजयाच्या पूर्वार्ध लिहून झाल्यानंतर प्रल्हादविजय लिहिला हेंही मागेंच दर्शविलें आहे. तेव्हां या काव्यांचे नामरसायनांतील उल्लेख आम्ही ठरविलेल्या काळास अनुरूप असेच आहेत एक कुशलवचरिताचाच कायतो अपवाद दिसून येतो.परंतु त्यानंतर उल्लेखिलेलीं मंत्ररामायण, संशयरत्नावलि, साधुसत्कृति इत्यादि काव्यें आम्ही ठरविलेल्या रचनाकालाच्या अनुक्रमानेंच वरील यादींत आलीं आहेत हें सहज लक्षांत येईल. तेव्हां नामरसायनांतील उल्लेख जर कोणास पोषक होत असेल तर तो मंत्ररामायण कृष्णविजयानंतर लिहिलें याच अनुमानास पोषक होत आहे हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल.

हें सर्व खरें, परंतु ' कृष्णकथा त्या नूतन लिहिल्या मी ' असें पंत स्वतःच म्हणतात त्याची वाट काय ! असा प्रश्न अर्थातच कोणाच्याही मनांत उद्भवेल . या पंतांच्या उद्गाराचीही उपपत्ति समाधानकारक रीतीनें लागत नाहीं असें नाहीं. पहिली गोष्ट म्हणजे या उद्गाराचा अर्थ ' कृष्णविजय मी नुकताच लिहून संपविला आहे ' असा जो सर्वांनीं केला आहे तोच यथार्थ आहे असें म्हणवत नाहीं. पंत येथें आपल्या काव्याची अघळपघळ स्तुति करीत असून लाडीगोडीनें हनुमंतापाशीं आपला वशिला लावण्याचा प्रयत्न करीत आहेत. कुशलवचरिताची त्यांनीं ' सुधानदी वाहे ' असें म्हणून प्रशंसा केली आहे, प्रल्हादविजयाचें तर ' रत्नसमूहांनीं खचलेला पर्वत ' असें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन केलें आहे. अशीच कांहीं तरी कृष्णविजयाची उत्कृष्टता किंवा अपूर्वता पंतांना दाखवावयाची आहे. नुसतें ' कृष्णविजय मी नुकताच रचला ' असें म्हणण्यांत काय स्तुति किंवा स्वारस्य आहे ? ' शुकाचार्यांनीं पूर्वींच दशमस्कंधांत दिव्य कृष्णकथा वर्णिल्या होत्या खऱ्या. परंतु त्या काय आतां जुनाट झाल्या आहेत. त्याच मी अगदीं नव्यानें लिहिल्या आहेत; पहा तर खऱ्या ? ' अशा तऱ्हेनें आपल्या ग्रंथाचें अपूर्वत्व मारुतीच्या नजरेस आणून देण्याचा पंतांचा हेतु आहे. '(जुन्या कवींच्या मानानें) मी हा अगदीं कोरा ग्रंथ रचला आहे' असें सांगून हें एक आपलें ' सर्टिफिकेट ' मारुतिरायापाशीं पंत मोठ्या लाघवीपणानें दाखल करीत आहेत. अर्थात् जुन्या कवींनीं ज्या कृष्णकथा लिहिल्या आहेत त्यांच्या अपेक्षेनें नवीन, असा अर्थ

'नूतन ' शब्दांत अभिप्रेत आहे. ' ग्रंथ नुकताच रचला आहे ' एवढेंच सांगण्याचा पंतांचा अभिप्राय नाहीं ' नूतन लिहिल्या ' असं म्हणण्यांत शब्दशः अर्थास प्राधान्य नसून त्यांत अर्थवादाचा, गौरवाचा व लाडीगोडीचाच प्रकार विशेष आहे हें काव्यांचें मर्म जाणणाऱ्यांच्या लक्षांत येऊ नये ही आश्चर्याची गोष्ट होय !

पांगारकरादिकांच्या म्हणण्याप्रमाणें ' कृष्णविजय मी नुकताच लिहून संपविला आहे ' असा काव्यशून्य अर्थ जरी मान्य केला तरी त्यांत कांहीं हानि आहे असें नाहीं. कारण खरोखर कृष्णविजय पंतांनीं नुकताच लिहून संपविला होता. कृष्णविजयाचे भिन्न विभाग भिन्न भिन्न कालीं रचले गेले असें मागें प्रतिपादन केलेंच आहे आणि त्याचे ८० ते ९० अध्याय नामरसायनाच्याच कालांत लिहिले गेले असावेत असेंही वर निर्दिष्ट केलेंच आहे. तेव्हां कृष्णविजयाचा शेष भाग पंतांनीं त्यावेळेस नुकताच लिहून संपविला असल्यामुळें ' कृष्णकथा नूतन लिहिल्या ' हें म्हणणें साध्या अर्थानें देखील युक्तच ठरतें. नूतन लिहिल्या याचा अर्थ अथपासून इतिपर्यंत सर्व ग्रंथ मी नुकताच लिहिला असा करण्याची मुळींच जरूरी नाहीं.

१८. कृष्णविजयाचे भिन्न भिन्न विभाग एकमेकांशीं इतके विसदृश आहेत कीं ते एका सपाट्यानें रचले गेले असें मानणें केवळ अशक्य आहे. हें आम्हांस पुनः पुनः सांगावेंसे वाटतें याचें कारण तें काव्य जसजसें जास्त वाचावें तसतसें त्यांतील विभागांचें परस्परवैलक्षण्य मनावर अधिकाधिक ठसत जातें हें होय. पंतांचीं बाकीचीं सर्व काव्यें एकसंधी, एका धाटणीचीं व एका भाषापद्धतीचीं आहेत असें असतां कृष्णविजयाच्या रचनेंत ठळकपणें दिसून येणाऱ्या विजोडपणाकडे व विस्कळीतपणाकडे कोणाही काव्यमर्मज्ञाचें अजून कसें लक्ष गेलें नाहीं याचें मोठें आश्चर्य वाटलें. असो.

१९. ' कृष्णविजय बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून पंतांनीं रचिला. व त्याच्यासारख्या पंडितानें सुद्धां हा फार कठीण झाला असा अभिप्राय दिल्यावरून पंतांनीं मंत्रभागवत लिहिलें. ' अशी आख्यायिका पांगारकरांनीं आपल्या पुस्तकांत नमूद केली आहे. ( मो. च. पृ. २५५–२५६ ). ही आख्यायिका खरी असल्याचेंही त्यांचें मत झालें असून त्याविषयीं त्यांनीं कांहीं प्रमाणेंही दाखल केलीं आहेत. कृष्णविजय पूर्वार्धाच्या अखेरीस सज्जनप्रार्थनेंत

श्रीमद्भागवतामृतोदधि तुम्हीं, अर्थज्ञ ते मेघसे

असें सज्जनांस उद्देशून पंत म्हणतात. त्याचप्रमाणें समग्र कृष्णविजयाच्या शेवटीं

कीर्ति श्रीपतिचीच सज्जन सदा सप्रेम आकर्णिती
सर्वस्तुत्य कवींद्र शौरिचरितें अत्यादरें वर्णिती ।
' गावें नित्य मुकुंदसद्यश यथाबुद्धि त्यजूनि त्रपा '
ऐसें सांगति, पाजिती हितसुधा विद्वत्सभा सुप्रपा ॥
ते आज्ञा स्वशिरीं धरूनि भगवद्भक्तप्रिया सत्कथा
श्रीरामात्मज साधुशिष्य वदला सोडूनि सर्व व्यथा।
हें मानेल निजप्रसादमुखरच्छात्रोक्त साधुव्रजा
जैसें शिक्षितकीरभाषण रुचे कीं जे वदे स्वप्रजा ॥

कृ. वि. ५०. ४२, ४३.

असे त्यांनीं उद्गार काढले आहेत. " या उद्गारांवरूनही पंतांनीं प्रकृत ग्रंथ कोणा विद्वान् संताच्या प्रेरणेनें लिहिला हेंच सिद्ध होतें. आता येथें बाबांचें नांव नाहीं हें खरें, पण एकंदर प्रकारावरून बाबांचीच 'आज्ञा स्वशिरीं धरून' पंतांनीं प्रकृत ग्रंथ लिहिला असें मला निभ्रांत वाटतें." ( मो. च. पृ. २५६ ) असें पांगारकरांचें म्हणणें आहे. येवढ्या शा तेवढ्याशा गोष्टीवरून मनास वाटतील तसे तर्क करण्याचा मोह कांहीं संशोधकास पडत असतो. पांगारकरांचीही येथें अशीच स्थिति झाली आहे असें म्हणणें भाग पडतें.

भगवद्भक्तांना, सज्जनांना व रसिकांना उद्देशून पंतांनीं आपल्या बहुतेक काव्यांच्या शेवटीं अनेक आदराचे उद्गार काढले आहेत ' भगवद्भक्तांच्या आज्ञेनेंच मी हें लिहीत आहें, ' ' माझ्या लिहिण्यानें रसिक व भगवद्भक्त प्रसन्न होतील, ' 'साधूंनीच मला कविता करण्यास प्रेरणा केली आहे' अशा तऱ्हेचे सामान्य भगवद्भक्तास व रसिकांस उद्देशून त्यांनीं ठिकठिकाणीं कृतज्ञतेचे उद्गार काढले आहेत. अशापैकीं कांहीं उद्गार नमुन्यादाखल खालीं दिले आहेत.

ऐका सज्जन हो! भवद्वच खरें, आश्चर्य म्यां पाहिलें
वाल्मीकिप्रभृतिस्ववंदिनिकरीं दीना मला वाहिलें । आदि. १८.१०४.

येथें ' सज्जन हो, तुमचें सांगणें खरें झालें ' असा सज्जनांच्या सांगण्याचा उल्लेख केला आहे. पुढील भक्तभूषणांतील उद्गार तर अगदीं कृष्णविजयांतील उद्गारांसारखेच आहेत.

नव्हे नवल तें जगीं, नवल हें मयूरद्विजा
दिली सुकविता पहा सदय साधुंनीं हे निजा ॥१०५

**संतांचें संतांतें**, गंगेचें तोय जेंवि गंगेतें ।
ज्यां अर्पिलें, वराया सुख, कल्पशतींहि जें न भंगे तें ॥ १०९
केलें मला अलंकृत शुद्ध स्वयशें करूनि **संतांनीं** ।
जैसें श्रीमातपितर स्वविभूषण अर्पिती स्वसंतानीं ॥ ११०

त्याचप्रमाणें भीष्मभक्तिभाग्यांत—

**भगवद्भक्तानुज्ञा** कीं गाव्या सत्कथा यथामति तें । भी. भ. ७

अशा भगवद्भक्ताच्या अनुज्ञेचा उल्लेख केला आहे. संतांनीं सांगितल्यावरूनच श्री परमेश्वराचें यश गात आहें अशा तऱ्हेचे स्पष्ट उल्लेख पंतांनीं मंत्रभागवतांत व हरिवंशांतही केले आहेत.

भक्तार्ह्यें राम आज्ञा करि मज पहिली त्या जशी नारदास्यें ।
मं. भा. उपसंहार ५.

श्रीहरिहरभक्त रसिक म्हणति ' यथाबुद्धि पुण्य यश गावें ' ।
यास्तव भक्त मयूरें गावुनि लिहिलें तयां नमुनि भावें ॥ हरिवंश ५.६५.
रसिक विष्णुभक्तांहीं हें शिशुभाषणपरि परिसावें ।
दोष निवारुनि गुण घेउनियां स्वमुखानें नाचावें ॥ पृथु. ८८.
श्रीहरिहरभक्त म्हणति ' हेंचि बरें कलियुगीं दुजें न शिकें ' ॥
म. खं. १६.२०.

यांपैकीं मंत्रभागवतांतलि उल्लेखही बाबा पाध्यांना उद्देशून आहे असें कित्येकांचें मत आहे हें खरें. परंतु इतर ठिकाणचे उल्लेख कोणा विशिष्ट व्यक्तीस उद्देशून मुळींच केलेले नाहींत, त्यांच्याविषयीं तर तशी शंका देखील घेण्यास जागा नाहीं; तेव्हां अशा तऱ्हेचे उल्लेख कोणा विशिष्ट व्यक्तीस उद्देशून पंत करीत असत ही कल्पनाच मुळीं निराधार आहे. हरिकथा गाव्या, भगवद्यशोगान करावें, असें शुकसनकादिकांपासून सर्व भगवद्भक्त एकसारखे म्हणत आले आहेत व या प्राचीन अर्वाचीन सर्व संतांच्या उपदेशामुळेंच ' मुकुंदसद्यश गाव्या ' ची पंतांस स्फूर्ति झाली असल्यामुळें त्यांनीं तसे जागोजाग उद्गार काढले यांत कांहींच विशेष नाहीं. प्रत्यक्ष श्रीराम आपल्याजवळ येऊन आपल्या कानांत उपदेशामृत ओतीत आहेत असा जर त्यांस विश्वास वाटत असे तर संत सज्जन आपल्याला प्रत्यक्ष आज्ञा करीत आहेत असा त्यांस भास व्हावा व तसें त्यांनीं वर्णन करावें हें अगदीं स्वाभाविक आहे. यांत

विशिष्ट व्यक्तीला उद्देशून त्यांनीं हे उद्गार काढले असें वाटण्याजोगें कांहींच नाहीं. शिवाय वरच्या कृष्णविजयामधील उद्गारांत तर ' विद्वत्सभा ' व ' साधु-सभा ' या शब्दांवरून हा उल्लेख कोणा एकाच व्यक्तीस लागू नसून सर्व विद्वन्मंडलाविषयीं व साधुवृंदाविषयीं केला आहे हें अगदीं उघड होतें. त्यांतून बाबा पाध्ये हे पंतांहून लहान होते व ते पंतांस वडील, पूज्य मानीत असत. तेव्हां त्यांच्यासंबंधानें पंत स्वतःस ' साधुशिष्य,' ' निजप्रसादमुखरच्छात्र ( त्यांच्या प्रसादानें बोलका झालेला विद्यार्थी ) ' म्हणवून घेतील हें सुतराम् अशक्य होय. तेव्हां येथील उल्लेख कोणा एका व्यक्तीस उद्देशून आहे असें क्षणभर मानलें तरी तो बाबा पाध्यांस मुळींच लागू होत नाहीं.

स्वतःस अत्यंत पूज्य अशा व्यक्तींचाही पंत काव्यांत एकवचनानेंच सरसकट उल्लेख करीत असत. अनेकवचनी उल्लेख त्यांनीं फारच क्वचित् केले आहेत. विठोबादादा चातुर्मासे, अनंत पाध्ये ( बाबांचे वडील ), बाबूजी नाईक या पूज्य व मान्य व्यक्तींविषयींचे पुढील उल्लेख पहा—

श्रीमान् बाबूराय प्रभु ज्याचें शोभलें यशें गात्र । स्वर्गारोहण.२.३५
केवळ भक्तिरसमय श्रीमदनंताख्य जो उपाध्याय । ३८
बहुशोभाप्रद झाला श्रीविठ्ठल भक्तराय कवनानें । ४०

तेव्हां बाबा पाध्यांविषयीं ते बहुवचनानें उल्लेख करतील हें शक्य दिसत नाहीं. शिवाय या कल्पनेच्या मुळावर मूळे कुठाररूप आक्षेप हा कीं बाबांनीं जर कृष्णविजय रचण्यास सांगितलें होतें तर तसा स्पष्ट उल्लेख करण्यास पंतांना कोणी बंदी केली होती ? जेथें जेथें इतरांच्या सांगण्यावरून काव्य लिहिलें तेथें तेथें पंत तसा स्पष्ट उल्लेख करण्यास कधींही चुकत नाहींत. प्रश्नोत्तरखंड, मदालसाख्यान व कृष्णमाहात्म्य हीं काव्यें सदाशिव पाध्यांचा सांगण्यावरून व हरिवंश पांडुरंगरायांच्या सांगण्यावरून लिहिला हें सर्व पंतांनीं जेथल्या तेथें स्पष्टपणें सांगून टाकलें आहे. आपल्याशीं संबंध असलेल्या जितक्या व्यक्तींचा नामनिर्देश पंतांनीं केला आहे तितका दुसऱ्या कोणत्याही कवीनें केला नसेल. आपल्या गांवचे शिंपी, तेली, तांबोळी, खाटीक यांचा सुद्धां ज्यानें अत्यंत स्नेहार्द्रतेनें उल्लेख करून त्यांना तारण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना केली तो ' परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यम् ' अशा कोटींतला साधुपुरुष, बाबा पाध्यांसारख्या

विवक्षित लेखाचा उल्लेख करणें आवश्यक असतां, तो करण्यास कचरेल असें असें मनातही आणितां येत नाहीं.

शिवाय कृष्णविजय ज्या वेळीं रचला गेला त्यावरून पहातांही बाबा पाध्ये यांनीं सुचविल्यावरून तो लिहिला असावा असें दिसत नाहीं. शके १६८० पर्यंत कृष्णविजयाचा पूर्वार्ध बहुधा रचून सुद्धां झाला होता. बाबा पाध्ये यांचे वडील अनंत पाध्ये हे १६८० नंतर, त्यांचें वतन बुडाल्यामुळें ( मो. च. पृ. ११० ), पंढरीस सहकुटुंब राहाण्यास आले. त्यापूर्वी त्यांची व पंतांची ओळख देखील असावी असें दिसत नाहीं. व बाबा त्या वेळीं बरेच लहान असावे. त्यांनीं पंतांस त्या वेळीं काव्य करण्यास सांगणें शक्य दिसत नाहीं.

कृष्णविजयांतील सामान्य सज्जनांस उद्देशून काढलेल्या उद्गारांविषयीं वर जी चर्चा केली आहे तीच मंत्रभागवतांतील उद्गारांसही लागू पडते.

भक्तास्यें राम आज्ञा करि मज, पहिली त्या जशी नारदास्यें ।

हा मंत्रभागवताच्या उपसंहारांतील उल्लेखही बाबा पाध्यांस अनुलक्षून आहे असा श्री. पराडकर व पोतदार यांनीं गैरसमज करून घेतला आहे. ( पराडकरी आवृत्ति मं. भा. उपोद्घात पृ. १२. ) खरें पाहिलें तर येथेंही कोणा विशिष्ट व्यक्तीला उद्देशून पंतांनीं लिहिलें नसून ' मागें रामानें नारदाच्या मुखानें जशी व्यासास आज्ञा केली तशीच आतां तो मला भगवद्भक्तांच्या मुखांतून आज्ञा करीत आहे ' असें त्यांनीं नेहमींच्या पद्धतीस अनुसरून म्हटलें आहे. असें असूनही कोणा तरी व्यक्तीचा उल्लेख येथें गर्भित आहे असें आग्रहपूर्वक म्हणावयाचेंच असेल तरी ती व्यक्ति बाबा पाध्ये नव्हेत हें खास आहे. बाबा पाध्ये भगवद्भक्त म्हणून कधीं प्रसिद्ध होते असें दिसत नाहीं; ते पंडित होते ' आज्ञा करि ' या शब्दप्रयोगावरून व नारदाची उपमा दिली आहे त्यावरून सदोदित हरिकीर्तन करणारे परम भगवद्भक्त विठोबादादा हेच ' मनापुढें येतात; ' बाबा पाध्ये येत नाहींत.

आतां लोकप्रवादाचा जो आधार वरील विद्वद्वर्यांनीं आपल्या कल्पनांच्या बोलाऱ्यास घेतला आहे तोही फारसा बळकट आहे असें दिसत नाहीं. पंत व पाध्ये हे मित्र होते, ज्याही होते येवढी सामग्री मिळाल्यावर मग लोकप्रवादाला आपल्या कल्पनातंतूंचें जाळें विणण्यास काय उशीर ! बाबा पाध्ये संस्कृताचे अभिमानी होते व संस्कृत काव्यें रचण्यास त्यांनीं पंतांस विनंती केली

होती येवढी गोष्ट मात्र त्यांच्या पत्रव्यवहारावरून दिसून येते. पंतांस मराठींत काव्यें करण्याविषयीं त्यांनीं आग्रह केला असेल असें दिसत नाहीं. तेव्हां कृष्णविजय व मंत्रभागवत हीं दोन्ही काव्यें कोणाच्या सांगीवरून पंतांनीं लिहिलीं नसून स्वतःच्या प्रेरणेनेंच रचलीं ही गोष्ट निर्विवाद होय.

२०. कृष्णविजय मंत्ररामायणानंतर रचला व तो पाध्यांच्या आग्रहावरून रचला या पांगारकरांच्या दोन्ही कल्पनांचें निरसन केलें. आतां मंत्ररामायणच कृष्णविजया ( अ. १—७९ ) नंतर रचलें असावें असें म्हणण्याला काय प्रमाणें मिळतात तें पाहूं.—

( १ ) महाभारत आदिपर्वाच्या अंतीं ' वाल्मीकिप्रभृति स्वबंदिनिकरीं दीना मला वाहिलें ' असें पंत म्हणतात. येथें वाल्मीकीचाच प्रामुख्यानें उल्लेख केला आहे यावरून महाभारतास आरंभ केला त्यावेळीं रामायण नुकतेंच ताजें रचून झालें होतें असें दिसतें. अर्थात् कृष्णविजय अगोदर लिहिला असून रामायणानंतर लगेच पंतांनीं भारत हातीं घेतलें हे उघड होतें. आतां येथें संस्कृत मंत्ररामायणच कशावरून पंतांना अभिप्रेत नसेल अशी शंका कोणी घेतल्यास तिचेंही निराकरण त्याच श्लोकाच्या पुढील चरणावरून होण्याजोगें आहे.

केलें प्राकृत काव्य ईश्वरपदीं भक्तरसें वाहिलें ।

यावरून ज्या काव्यामुळें वाल्मीकिप्रभृति स्तुतिपाठकांच्या सदरांत पंतांना जागा मिळाली तें काव्य प्राकृतच होतें, संस्कृत नव्हतें असें स्पष्ट दिसतें.

( २ ) दुसरें प्रमाण रचनाशैली व वृत्तें यांचें होय. या बाबतींत मंत्ररामायणाचें कृष्णविजय अ० ८०—९० यांशीं साम्य उघड उघड दिसून येतें.दोघांचेंही वृत्त आर्या असून मधून मधून लांब समास घालून प्रौढ रचना करण्याची प्रवृत्ति दोहोंतही दिसून येते. मंत्ररामायणांत ओजोगुण जरा जास्त दिसून येतो याचें कारण त्यांत वीररसाचें प्राचुर्य आहे हेंच होय. तेव्हां या रचनासाम्यावरून कृष्णविजय अ. ८०—९० व मंत्ररामायण हीं काव्यें एकाच कालखंडांत रचलीं गेलीं व अर्थातच बाकीचा कृष्णविजय अगोदर रचला गेला हें सिद्ध होतें.

मंत्ररामायणानंतर कृष्णविजय रचला असें पांगारकर म्हणतात. मंत्ररामायणांत इतकी सुंदर साधलेली आर्येची भट्टी टाकून देऊन पंत पुनः आर्यागीतिसारखें बोजड वृत्त हातीं घेतील ही कल्पनाच दुःसह वाटते. नानातऱ्हेच्या छंदांचा अनुभव घेऊन पाहून मंत्ररामायणकालीं पंतांची प्रीति सर्वगुणसंपन्न आर्येवर स्थिर

झाली होती व तींत अत्यंत सुंदर व सफाईदार अशी रचना त्यांस साधत चालली होती. ही सफाईची आर्यारचना सोडून पुनः ते कृष्णविजयातील आर्यागीतीकडे व विविध श्लोकांकडे वळले असें म्हणणें म्हणजे चांगलें चालायला येत असलेला मुलगा पुनः अडखळत, धडपडत चालूं लागला असें म्हणण्यासारखेंच आहे.

( ३ ) तिसरें प्रमाण मंत्रांचें. पंतांच्या वृत्तरचनेविषयीं ज्याप्रमाणें आजपर्यंत बारकाईनें कोणी विचार केला नव्हता त्याप्रमाणेंच त्यांच्या मंत्रांवरून काय अनुमानें निघतात इकडेही पंतकाव्यमर्मज्ञांचें अद्याप लक्ष गेलेलें दिसत नाहीं. पंतांनीं मंत्रांची रचना प्रथम मंत्ररामायणांत केली, हें मंत्रांविषयीं गौरवपूर्ण व अभिमानाचे असे जे त्यांनीं त्या ग्रंथांत सर्वत्र उद्गार काढले आहेत त्यावरून अगदीं स्पष्ट दिसतें. मंत्ररामायणाच्या उपोद्घाताच्या ४२० आर्यांपैकीं १३ आर्या मंत्रांची समजूत देण्यांत व त्यांचें महत्त्व वर्णन करण्यांत गेल्या आहेत. शिवाय प्रत्येक कांडाच्या अंतीं

मंत्राः षडत्र विज्ञेया बालकांडेऽमृतप्रदाः ।
विलोकनीयाः सततं दोषज्ञैर्दोषवर्जितैः ॥
दिङ्मंत्रा संत्यत्र । साधूनां स्वर्वृक्षाः ।

अशा तऱ्हेचे प्रौढीचे व संतुष्टतेचे उद्गार काढले आहेत. कहान मुलाला एखादी नवी चीज गवसली म्हणजे प्रथम प्रथम त्याला जशी त्याची अपूर्वाई वाटते तशी पंतांची येथें स्थिति झाली आहे. मंत्रांच्या हौसेचा अगदीं पहिला भर मंत्ररामायणांत दिसून येतो तो पुढें कमी झाला आहे. तथापि मंत्रांविषयींची त्यांची प्रीति कधींच समूळ नाहींशी झाली नाहीं. मंत्ररामायणानंतर त्यांनीं जीं मोठीं काव्यें लिहिलीं त्यांपैकीं एका हरिवंशाखेरीज इतर सर्वांत त्यांनीं मंत्रांची योजना केली आहे. संस्कृत मंत्ररामायण, महाभारत, मंत्रभागवत हे सर्व ग्रंथ मंत्ररूपी सूत्रानें अनुस्यूत झालेले आहेत. शिवाय बालमंत्ररामायण, रम्यमंत्ररामायण, मंत्रमयभागवत इत्यादि अनेक लहान मंत्रमय काव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत. तेव्हां मंत्ररामायणापासून हरिवंशाच्या रचनाकालापर्यंत तरी निदान मंत्राविषयींची प्रीति पंतांच्या हृदयांत जागृत होती. कृष्णविजय जर मंत्ररामायणाच्या नंतर लिहिला असता तर त्यांत कोणत्या तरी मंत्राची योजना पंतांनीं केली असती असें पंतांच्या मनःप्रवृत्तीवरून निश्चयानें म्हणता येतें. तसें ज्याअर्थीं झालेलें दिसत नाहीं, त्याअर्थीं कृष्णविजय मंत्ररामायणाच्या पूर्वी म्हणजे मंत्र-

त्यांनेस सुरवात होण्याच्या पूर्वीच्या काळीं किहिका असला पाहिजे हें उघड आहे.

( ४ ) मंत्ररामायणांतलि आत्मविश्वासाचे व धिटाईचे उद्गारही मंत्ररामायणाचें पश्चात्कालिकत्वच सिद्ध करतात.

१. निजमुखराशि शुकाचा बोल वदे किती मयूर हा शिशु काचा ।कृ.वि १.८.

२. नसे तादृक् चेतोहर गुण जरी साधु तरि या
वरू चूडारत्नीकृतविधुहि जैसा धुतरिया ।
कृ. वि. सज्जनप्रार्थना २.

हे कृष्णविजयामधलि नम्रपणाचे उद्गार कोणीकडे व

जसे होती देव प्रमुदित शचीनायकवर्नी
तसे सारज्ञातें बुधजन मयूरेशकवनीं । मं. रा. उपसंहार. १२.

हे मंत्ररामायणांतलि धिटाईचे व आत्मप्रत्ययाचे उद्गार कोणीकडे !

२१. या १६८८ ते १६९४ च्या कालविभागांत आम्ही आर्याकेकावलि, संशयरत्नावलि, चषक इ० काव्यांचा समावेश केला आहे. या काव्यांविषयीं, विशेषतः आर्याकेकावली विषयीं, रा रामकृष्णपंत पराडकर यांनीं आपल्या 'भक्तमयूरकेकावलि' नामक नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत कांहीं महत्वाचे विचार प्रदर्शित केले आहेत. त्यांचा येथें थोडक्यांत परामर्श घेण्याचें योजिलें आहे. प्रथम आर्याकेकावलि या काव्याचें अंतःस्वरूप वाचकांपुढें मांडून त्यावरून पराडकरांनीं काय अनुमानें काढलीं आहेत तीं थोडक्यांत देऊं; व त्यानंतर पराडकरांच्या अनुमानांविषयीं थोडासा साधकबाधक विचार करूं.

आर्याकेकावलि हा शरणागत, अनन्यगतिक भक्तानें अत्यंत करुणस्वरानें केलेला श्रीरामचंद्राचा धांवा आहे. प्रथम भवसागरांत बुडत असलेल्यांचा उद्धार करण्याचा रामचंद्राच्या नेहमींचा परिपाठ वर्णन केला असून ' धांव, समर्था सदया, भवपंकामाजि बुडतसे गाय ' अशी त्याची करुणा भाकली आहे. ( आर्या १–२३ )." रावणानें पीडिलेले देव, त्याचप्रमाणें सुग्रीव, बिभीषण, इत्यादिकांस तूं तारिलेंस ( २४–३५ ) म्हणून तुला मी तापोपशमार्थ शरण आलों आहें; तेव्हां खळांनीं गांजिलेल्या माझें संकट निवारण कर व मला जीवदान दे (३६-५७); क्षुद्र लोकांस नमनें करून मी श्रमी झालों आहे,तर मला तूं कुरवाळून आपल्या जवळ घे; मी अत्यंत दीन हीन आहें, अपराधी आहें, तर माझा उद्धार कर; 'बहु गोड गुण तुझे ते ऐकावे आदरें स्वयें गावे'या वेगळे माझें कांहीं

मनोरथ नाहींत(५७-१११);—याप्रमाणे कवीनें रामाची प्रार्थना केली असून प्रस्तुत काव्याचा हाच भाग करुणरसपूर्ण व हृदयद्रावक आहे. याच भागांत कवीनें स्वतःच्या संकटग्रस्त स्थितीस अनुलक्षून ठिकठिकाणीं उद्गार काढले असून त्यांतील कांहीं महत्त्वाचे उद्गार पुढीलप्रमाणें आहेत.

रक्षोभीतिपासुनि गाधिजमख रक्षिला जसा राया ।
हो सिद्ध तसा संकट मज दीनाचें हि आज साराया ॥ ३४ ॥
अन्याय लेश नसतां गांजिति उद्वृत्त हें तुलाचि कळो ।
किकळोनि सांगतों तुज या दुःखें न मन आमचें विकळो ॥ ४८ ॥
कळिमाजि क्षुद्र नृप प्रजेसि देती धनार्थ बहुताप ।
पापप्रसक्त लोभी न पाहती धर्म माय कीं बाप ॥ ४९ ॥
खळ जे हे सत्पीडक त्यांची तुज काय राघवा ! भांड ? ।
त्वद्दास तव समक्षचि गांजिति येणें कसी न ये चाड ? ॥ ५१ ॥
श्रीरामचंद्र ! राघव ! रघुवीर ! असेंचि आळवीन तुला ।
संकट वारुनि घडवीं माज्या हातूनि या महाक्रतुला ॥ ५४ ॥
प्रमदांत पावुनीयां श्रम दांत क्षुद्र विचकती कीं जे ।
त्यांची तशाच लोकीं सेवा तुजला न जाणतां कीजे ॥ ६५ ॥
दुर्व्यसनी धर्मरहित निरक्षर क्षुद्र त्यांसि मी नमनें ।
करुनि श्रमीच जालों, आलों तुज शरण आज दीनमनें ॥ ६६ ॥

याशिवाय 'परंतु मन आटोपेना रामा ' ५; 'अपराध फार केले,' १०;'गतभय हा शीघ्र करीं ' ३५; 'तुजविण कवणा तापोपशमार्थ रतूं ? ' ३६; ' दास परानें हा अपराधावीण दंडिला राज्या !' ४२; ' बा जीवदान दे, गा ' ४५; ' या संकटाबरोबर वारीं लोकेषणादि अनिवार्ये ' ५६; ' आळ निवारुनि मातें कुरवाळीं. ७१;' या परमसंकटीं मज आपद्ग्रस्तासि नको विसरूं ' ८६;' बाधा हरणार एक तूं दक्ष ' ८७; ' मी विकळ जाहलों बहु ' ८८; तनुनिर्वाहापुरता संग धरुनिही' अनर्थ मज घडला ' ९५; हे कवीचे स्वस्थितिसूचक उद्गारही लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. नुसती ' संकट निवारण कर ' अशी विनवणी तर अनेकवार केली आहे-

यानंतर लक्ष्मण, भरत, सीता व मारुति यांना रामापाशीं स्वतःविषयीं रदबदली करण्याची कवीनें विनंती केली असून ( आर्या ११४-१२८ ) त्यापुढें संतांच्या प्रभावाचें छोटेंसें वर्णन केलें आहे ( १२८-१३५ ). अखेरीस पंढरी

पूरच्या पांडुरंगाच्या ध्यानाचें सुंदर, कोटिक्रमयुक्त वर्णन असून काव्यसमाप्ति झाली आहे. ( ११६–१७४ ). हा शेवटला भाग अतिशय प्रसन्न मनानें लिहि-लेला दिसत असून तो संकट निवारण झाल्यावर पंढरीस गेल्यावेळीं पांडुरंगा-समक्ष लिहिलेला दिसतो.

वादविषयक काव्याचें स्वरूप याप्रमाणें दिग्दर्शित केलें. पंतांनीं अंतःकरणाच्या तळमळीसरशीं स्वतःविषयीं जे उद्गार काढले आहेत ते मुद्दाम विस्तारानें नमूद केले आहेत आतां पराडकरांनीं यावर तर्क चालवून पंतचरित्रावर काय नवा प्रकाश पाडला आहे तें आपण पाहूं पराडकरांनीं आपलें म्हणणें विस्कळीतपणानें व संशयात्मक भाषेंत मांडलें आहे. तथापि त्यांच्या म्हणण्यांतील तथ्यांश निश्चित स्वरूपांत खालीलप्रमाणें सांगतां येईल.

१. आर्या केकावलींतील पंतांच्या स्वविषयक उद्गारांवरून पंतांवर त्या वेळीं कांहीं तरी मोठें प्राणहारक संकट आलें होतें; शिवाय तें लौकिकाची हानि करणारें असें असून कोणा तरी क्षुद्र परंतु उच्चपदस्थ व्यक्तीकडून आलेलें होतें.

२. पंतकालीन राजकीय उलाढालींकडे लक्ष दिलें असतां कोल्हापुरच्या राज्यांत पन्हाळगडावरच पंतांवर असला कांहीं तरी कहर गुदरला असणें शक्य आहे.

३. कोल्हापूरचा राजा संभाजी शके १६८२ मध्यें वारला. तेव्हांपासून १६९४ पर्यंत त्याची क्रूर स्त्री जिजाबाई व दासीपुत्र येसाजी यांची अत्यंत अंदाधुंदीची, बालिशपणाची व जुलमाची कारकीर्द चालू होती असें इतिहासांत नमूद आहे या अवकाशांतच केव्हां तरी पंतांवर हें संकट गुदरलें असावें. विशे-षतः पंतांनीं लिहून घेतलेल्या ग्रंथांत १६८३ ते १६८७ पर्यंतचा एकही ग्रंथ नाहीं यावरून या सालांच्या दरम्यान तो प्रसंग आला असावा. अर्थात् या काला-पर्यंत पंतांचें मुख्य वास्तव्य पन्हाळगडींच असलें पाहिजे.

४. बाबूजी नाइकाचें व कोल्हापूरदरबारचें सख्य नसावें. व ' ज्याचे वडील बाबूजीकडे आहेत तोच हा आपलेकडे नोकरीस असलेला बाबूजीचा गुप्त हेर मोरोबा असा खोटा आळ पंतांवर येऊन त्यांना उपसर्ग पोंचला असावा.' पन्हाळगडावरच्या स्त्रीराज्यांत पंतांना विषप्रयोगही झाला असावा असें अनंत व सदाशिव पाध्ये यांच्या पत्रांतील शरीरास्वास्थ्यसूचक कांहीं शब्दांवरून वाटतें.

५. सदाशिव पाध्ये यांच्या पंतांना आलेल्या एका पत्रावरून त्यांची तीन वर्षे एकमेकांना वार्ता नसावी असें दिसून येतें. या सन्मित्रांना परस्परांची दादपुसही

असल्याचा हा तीन वर्षांचा काळ पंतांच्या संकटाचाच असावा. ( याशिवाय सदा-शिव पाध्यांची इतर पत्रें अनंत पाध्ये व बिठोबादादा यांच्या पत्रांतील कांहीं उल्लेख याचाही पंतांच्या संकटाशीं दूरान्वित व संशयित संबंध पराडकरांनीं कल्पनेनें काढिला आहे. पंतांची व सिद्धेश्वरमहाराजांची भेट, पन्हाळगडावरची पराशरऋषींची गुहा वगैरे गोष्टींचाही पंतांच्या संकटाशीं संबंध पोचत असावा अशीही एक शंका प्रदर्शित केली आहे. असा निवळ कल्पनेचा खेळ त्यांनीं बराच मांडला आहे. )

६. या संकटाच्या आंचीनें आर्याकेकावलीच तेवढी निर्माण झाली असें नसून संशयरत्नावलि, साधुसत्कार, चषक, रामनामार्या, वाङ्मनःप्रार्थना, महद्विज्ञापना, गुरुस्तुतिमुक्तांजलि, विठ्ठलस्तुति, पंचवटीरामस्तोत्र वगैरे बरींच प्रकरणें त्याच संकटामुळे निघालेले कवीचे हुंदके असावेत असें वाटतें.

याप्रमाणें पराडकरांच्या विस्कळीत प्रतिपादनाचा कलमवार सारांश आहे. याच्याविषयीं थोडासा साधकबाधक विचार करून हें प्रकरण येथें संपवून टाकूं.

२२. प्रथमतःच हे कबूल केलें पाहिजे, कीं सर्व भगवद्भक्तांस सामान्य असी जी आर्तता व शरणागति तिच्यामुळेंच केवळ आर्याकेकावलींतील सर्व तळमळीचे उद्गार निघालेले दिसत नाहींत. ' पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥ ' हा तुकारामबोवांचा उद्गार सर्वसामान्य आर्ततेचा होय. परंतु केकावलींतील वर दाखल केलेले अनेक उद्गार पाहिल्यास ते अशा साधारण आर्ततेचे नसून कांहीं विशिष्ट अशा संकटाचे द्योतक आहेत, हें स्पष्ट दिसतें. कोणीही हें काव्य वाचल्यास ही गोष्ट त्याच्या सहज लक्षांत येण्याजोगी आहे. त्याप्रमाणें पांगारकरांच्या ही गोष्ट लक्षांत आलीही होती. तथापि ' बा, जीवदान दे ! गा ' इ० उद्गारांवरून त्यावेळीं पंतांच्या जीवावरचें एकादें दुखणें गेलें होतें कीं काय येवढाच संशय प्रकट करून ते थांबले आहेत. परंतु पराड-करांनीं इतर वारंवार येणाऱ्या उद्गारांना योग्य महत्व देऊन पंतांवर ' क्षुद्र नृप, ' ' सत्पीडक खल ' अशांचा रोष होऊन त्यांजवर कांहीं तरी भयंकर आळ आलेला होता अशी मुख्य कल्पना केली आहे. व ' जीवदान देगा ' इ. शरीरबाधादर्शक उद्गारांची संगति लावण्यासाठीं विषप्रयोगाची कल्पना लढवून तिची मुख्य कल्प-नेला पुस्ती जोडली आहे.

पराडकरांनीं एकादा आधार किंवा पुरावा नवीन शोधून काढून त्याच्या जोरा-वर आपलें म्हणणें सिद्ध केलें आहे असें नसून केवळ तर्काच्या जोरावर आर्या-

केकावलींतील संकटाचा करवीर दरबारच्या राजकीय स्थितीशीं संबंध जोडून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न करण्याच्या भरांत कित्येक अगदीं असंभाव्य तर्क त्यांनीं केले आहेत.

आर्याकेकावलींतील संकट करवीरदरबारची त्यावेळची राजधानी पन्हाळा येथें येसाजीच्या जुलमी कारकीर्दींतच पंतांवर आलेलें असणें शक्य आहे, येवढ्या-पुरतें पराडकरांचें म्हणणें कांहींसें सयुक्तिक दिसतें. कारण दुसऱ्या कोणत्याही दिशेनें त्यांजवर तशा तऱ्हेचें संकट येण्याची शक्यता दिसत नाहीं. शिवाय हें संकट पूर्ववयांत आलेलें असल्यामुळें तें पन्हाळगडीं आलें असल्याची शक्यता कबूल करणें भाग आहे. हेंच संकट उत्तर वयांत म्ह० भारतरचनाप्रारंभानंतर आलेलें असतें तर तें पन्हाळगडीं गुदरलें असण्याची मुळींच शक्यता नाहीं असें म्हणतां आलें असतें. अस्तु; तेव्हां त्यांच्या म्हणण्यांत येवढाच काय तो मान्य करण्याजोगा भाग आहे. तें संकट कां आलें, कोणाकडून आलें व त्याचें स्वरूप काय होतें याविषयीं त्यांनीं केलेल्या कल्पना निराधार आहेत.

मोरोपंत बाबूजीचा हेर असावा अशा संशयानें पंतांवर कांहींतरी तोहमत गुदरली असावी ही पराडकरांची कल्पना अगदीं पोकळ आहे. अगोदर बाबूजी नाइकाचें व कोल्हापूरदरबारचें वांकडें होतें ही गोष्ट त्यांस मुळींच सिद्ध करतां आलेली नाहीं. व पंतांसारख्या बाळपणापासून पन्हाळ्यासच असलेल्या, सच्चरित्र, भगवद्भक्तींत व विद्याभ्यासांत पूर्णपणें रंगलेल्या, मनुष्यावर अशा राजकारणी गुन्ह्याचा आळ येईल ही गोष्ट कोणासच पटण्याजोगी नाहीं. येसाजीच्या कुण-बिणींकडून त्यांस विषप्रयोग झाला असावा हा तर्क तर अगदींच विलक्षण आहे. पंतांची प्रकृति बिघडली असल्याचे उल्लेख कांहीं पत्रांतून आढळत हें खरें आहे. परंतु तीं पत्रें पंत बारामतीस असल्यावेळचीं आहेत व त्यांस विषप्रयोगाचा नुसता वासही येण्याजोगा नाहीं.

आतां पराडकरांच्या मुख्य कल्पनेस देखील विरुद्ध जाणाऱ्या कांहीं गोष्टींचा उल्लेख करूं.—१. पंतांवर आलेलें संकट पन्हाळगडीं ते कारकुनी करीत असतां १६८३ ते १६८० च्या दरम्यान आलें असावें अशी त्यांची कल्पना आहे. पंत कारकुनी करीत होते हीही एक बिन बुडाची दंतकथाच आहे व ती पराड-करांनीं पांगारकरांपासून स्वीकारली आहे. असो. १६८०, ८२ व ८३ सालीं बारामतीस पंतांनीं ग्रंथ लिहून घेतल्याचा उल्लेख आहे यावरून या वर्षांमध्यें बरेच

दिवस ते बारामतीस राहण्यास येत असत असें दिसतें. अशा रीतीनें दरसाल कित्येक महिने परगांवीं जाऊन राहणारा हा कारकून मोठा तालेवारच म्हटला पाहिजे! पन्हाळगडावर पंतांना वतन नव्हतें, राजदरबारीं वशिला नव्हता, कांहीं नव्हतें. अशा स्थितींत सामान्य कारकुनाचा असला तालेवारपणा चालणें अशक्य होय. बरें कारकुनी न करतां ते नुसते पन्हाळ्यास होते असें म्हटलें तर त्यांस तेथें दुसरा आधार कसला होता व त्यांच्या निर्वाहाची व्यवस्था काय होती याचा उलगडा मुळींच होत नाहीं.

२. निदान १६८० पासून तरी पंतांचा बारामतीशीं संबंध येऊं लागला होता ही गोष्ट सिद्ध आहे. बारामतीशीं जितका संबंध अधिक तितका पन्हाळगडाशीं संबंध कमी होत गेला असला पाहिजे. अशा स्थितींत कांहीं भयंकर संकट पन्हाळगडीं त्यांच्यावर १६८३ नंतर येणें असंभवनीय वाटतें.

३. पराडकरांच्या म्हणण्याप्रमाणें सुमारें १६८५ पर्यंत पंतांचें पन्हाळगडीं वास्तव्य होतें. याप्रमाणें निम्यापेक्षां अधिक आयुष्य, व जाणतेपणींचीं १२–१५ वर्षे ज्या ठिकाणीं घालवलीं व कित्येक काव्येंही जेथें रचलीं तेथील त्यांच्या परिचित मंडळींपैकीं एकाचाही उल्लेख त्यांच्या काव्यांत कोठें आढळूं नये हा चमत्कार नव्हे काय? पन्हाळगडावरील व्यक्तींपैकीं फक्त केशव, गणेश व सदाशिव पाध्ये यांचा उल्लेख सांपडतो. परंतु या तिघांशींही त्यांचा परिचय विद्यार्थिदशेंतच झालेला होता. विद्यार्थिदशेंत ते पन्हाळगडीं होते व पाध्यांपाशीं विद्या शिकले हें सर्वसंमतच आहे. पण विद्यार्थिदशेनंतरचीं १२ वर्षे देखील जर त्यांनीं पन्हाळ्यास काढलीं होतीं तर त्या कालांतील कांहीं परिचित मंडळींचा, इतर शेंकडों व्यक्तींचा आपल्या काव्यांत उल्लेख करणाऱ्या पंतांच्या काव्यसमूहांत कोठें तरी उल्लेख सांपडावयास पाहिजे होता. त्याचप्रमाणें अर्थाअर्थीं कांहीं संबंध नसलेल्या अनेक व्यक्तींचा उल्लेख करणाऱ्या पंतांनीं येवढें प्राणहारक संकट ज्यांनीं आणलें त्या येसाजिप्रभृति करवीर दरबारच्या मंडळींचा आपल्या काव्यसमूहांत किंवा पत्रव्यवहारांत कोठेंही चुकूनसुद्धां उल्लेख केलेला आढळूं नये ही गोष्ट अगदीं चमत्कारिक दिसते व पराडकरांच्या तर्कांची इमारत बरीच डळमळीत करते.

पंतांवर आलेलें संकट कोठेंही, केव्हांही आलेलें असो तें अल्पकालिक होतें; त्याच्यामुळें त्यांच्या निरंतर चाललेल्या काव्यरचनेंत एखाद दुसऱ्या वर्षापेक्षां जास्त खंड पडला असण्याची शक्यता दिसत नाहीं. आम्ही निर्दिष्ट केलेले काव्यांचे

रचनाकाल बहुधा अंत:प्रमाणावरून स्वतंत्र रीतीनें ठरविले असल्यामुळें खुद्द आर्याकेकावलीखेरीज इतर महत्वाच्या काव्यांच्या रचनाकालावर या सर्व मानगर्डीचा कांहींच परिणाम होण्यासारखा नाहीं. खुद्द आर्याकेकावलीच्या रचनाकालासंबंधानें देखील पराडकर नक्की असें कांहींच म्हणत नाहींत. तथापि पंतांवरचें संकट १६८३ ते १६८७ च्या दरम्यान आलें असावें, अर्थात् आर्याकेकावलीची रचनाही याच अवधीच्या दरम्यान झाली असावी, असें त्यांचें म्हणणें दिसतें. परंतु जिजाबाई व येसाजी यांची कारकीर्द १६८१ पासून १६९४ पर्यंत चालू होती असें पराडकरांनीं दाखविलें आहे. व १६९४ नंतरही जिजाबाई मरण पावली तरी येसाजीचा कारभार चालू होताच. तेव्हां पंतांवर संकट करवीर दरबारकडून आलें असें मानावयाचेंच झालें तर तें १६९४ पर्यंत केव्हांही आलें असें मानलें तरी चालण्याजोगें आहे. १६८७ पूर्वींच तें आलें असलें पाहिजे, नंतर येणें शक्य नाहीं अशी मर्यादा घालण्याजोगा पुरावा कांहींच उपलब्ध नाहीं. पंतांचे बारामतांचे आश्रयदाते बाबूजी नाईक यांचा उल्लेख १६९४ नंतर आरंभिलेल्या महाभारतांतच सांपडतो, अगोदरच्या काव्यांत सांपडत नाहीं. पंतांना बाबूजी नाइकानें बारामतीस दिलेल्या घराचें दानपत्र देखील १६९९ चें आहे. तेव्हां १६८८ ते १६९४ या अवधीमध्यें पंतांची पन्हाळयास येजा होती व या अवधींतच पंतांवर उपर्युक्त संकट आलें असें कोणी म्हणूं लागल्यास त्यास प्रतिबंधक असा बिनतोड पुरावा कांहींच नाहीं. तेव्हां पराडकरांची संकटाची कल्पना मान्य करूनही तें संकट १६८८ ते १६९४ च्या दरम्यान आलें असावें, अर्थात् आर्याकेकावलि याच काळांत रचली गेली असावी असें मानल्यास आम्ही जो आर्याकेकावलीचा रचनाकाल ठरविला आहे त्यास मुळींच बाध येत नाहीं. तात्पर्य, इतर प्रमाणांवरून ठरविलेल्या रचनाकालास पराडकरांचे तर्क मुळींच बंधनकारक होऊं शकत नाहींत. पंतांवर संकट आलें होतें व तें करवीर दरबारकडून आलें होतें येवढें त्यांचे दोन मुख्याचे तर्क आहेत. मग तें संकट तुम्ही १६९४ पर्यंतच्या पंतांच्या आयुष्यांत कोठेंही बसवा. आर्याकेकावलींतील आर्तता ही केवळ तरुण व एकाद्या संकटानें बावरून गेलेल्या मनुष्याची आर्तता दिसत नाहीं. संसारांतले बरेचसे वाईटसाईट अनुभव घेऊन त्रस्त झालेल्या पोक्त मनुष्याचा अंत:करणाच्या तळापासून निघालेला तो आर्तोद्गार आहे व या दृष्टीनेंच १६८८ ते १६९४ हा जो त्याच्या रचनेचा काल आम्हीं ठरविला आहे तोच सयुक्तिक दिसतो.

पराडकरांचा खरा विरोध, वडिलांना भेटून १० वर्षे होत आलीं म्हणून १६७५ सालीं पंत पन्हाळगडाहून बारामतीस निघून आले व नंतर कायमचे बारामतींतच राहिले,–या पांगारकरांच्या कल्पनेस आहे. १६७५ नंतर किस्येक वर्षे पंतांचें मुख्य वास्तव्य पन्हाळयासच होतें व तेथेंच त्यांच्यावर प्राणघातक संकट गुदरलें असें पराडकरांचें प्रतिपादन आहे. अर्थात् दोघांमधील विरोध कालासंबंधीं नसून मुख्यतः वास्तव्यस्थलासंबंधीं आहे. तेव्हां आम्हीं स्वतंत्रपणें ठरविलेल्या काव्यांच्या रचनाकालावर या वादाचा कांहीं परिणाम होण्याचें कारण दिसत नाहीं. पराडकरांचें म्हणणें खरें ठरल्यास, १६८० पासून १६८५ पर्यंत पंतांनीं लिहिलेले ग्रंथ सामान्यतः बारामतीस लिहिले गेले असें सध्या मानलें जातें, ते पन्हाळगडावर लिहिले गेले असें मानावें लागेल येवढेंच काय तें. पंतांवर आलेलें संकट त्यांच्या ग्रंथकर्तृत्वाच्या दृष्टीनें तितकेसें महत्त्वाचें नसून खासगी आयुष्यक्रमाच्या दृष्टीनेंच महत्त्वाचें आहे. त्या संकटामुळें त्यांच्या खासगी आयुष्यांत क्रांति झाली असेल परंतु त्यांच्या ग्रंथकर्तृत्वाचा जो स्वाभाविक विकास होत होता त्याच्यावर या संकटाचा फार मोठा परिणाम झाला असेल असें मुळींच मानतां येत नाहीं. या संकटामुळें पंतांच्या वृत्तींत एकदम पालट झाला, त्यांची प्रापंचिक वृत्ति बदलून ती एकदम वैराग्ययुक्त व परमार्थप्रवण बनली असा जो पराडकरांच्या लिहिण्याचा रोख आहे तोही बरोबर दिसत नाहीं. त्यांची वृत्ति अगदीं लहानपणापासूनच 'हरिपादयुगस्मरणप्रवण' बनलेली होती हें त्यांच्या ब्रह्मोत्तरखंड, प्रह्लादविजय, कृष्णविजय इ० प्रारंभींच्या काव्यांतील उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. एकनाथांप्रमाणेंच ते जन्मतःच शुद्ध बुद्धीचे. पुण्यसंस्कारवान् भाविक होते. संकटांचे ठक्केठोणपे खाऊन मग अंगीं बाणलेलें त्यांचें वैराग्य नव्हतें. असो. ही गोष्ट उघड असून वाटेल तितक्या प्रमाणांनीं सिद्ध करतां येण्याजोगी आहे.

प्रह्लादविजय इ. सन १७५९ सालीं पंतांनीं लिहिला; पुढें त्याच वृत्तांतला कृष्णविजय लिहिण्यास घेऊन तो इ० स. १७६३ सालीं संपविला; कृष्णकथा तुकस्याच लिहिल्या असा उल्लेख असलेलें नामरसायनही इ० स० १७६३ (शके १६८५) सालीं लिहिलें;–अशी अनुमानपरंपरा बसवून काव्यसंग्रहकारांनीं नामरसायनाचा काळ १६८५ हा ठरविला आहे. ही अनुमानपरंपरा व हा काळ कसा चुकीचा आहे हें आमच्या आतांपर्यंतच्या प्रतिपादनावरून लक्षांत येईलच.

२३. याप्रमाणें १६८८ ते १६९४ पर्यंतच्या पंतांच्या रचनेचा विचार झाला–

या कालांत त्यांची सर्व रचना आर्यावृत्तांत झाली असून कृष्णविजय अ० ८०—९०, मंत्ररामायण, संशयरत्नावलि, साधुसत्कार, आर्याकेकावलि, नामसुधाचषक, नामार्या, आर्यामुक्तामाला, नामरसायन, मारुतिस्तुति, प्रश्नोत्तरमाला, सन्मनोरथराजि ही त्यांची या कालांतली मुख्य रचना होय. आणखी नारदाभ्युदय, भीष्मभक्तिभाग्य, अवतारमाला, गीतार्या हीं प्रकरणेंही याच सुमारास पंतांनीं लिहिलीं असावीं असें त्यांच्या रचनासरणीवरून वाटतें. रुक्मिणीगीत, सीतागीत व सावित्रीगीत हीं तीन अभंगांत रचलेलीं गोड गीतें या काळाच्या प्रारंभींच रचलेलीं असावीं. हीं तीन्ही गीतें साधारणपणें एकाच कालीं रचलेलीं आहेत व तीं मुलींबाळींकरितां, त्यांनीं म्हणावयाच्या ओंव्याच्या चालीवरच रचलीं आहेत. तथापि तीं ग्रंथकर्तृत्वाच्या पहिल्या भरांत रचलीं असावीं असें पांगारकरांनीं म्हटलें आहे तें बरोबर दिसत नाहीं. या गीतांची रचना अत्यंत गोड, सुललित व प्रेमळ झाली असून पंतांचें कौशल्य येथें बरेंच परिपक्क झालेलें दृष्टीस पडतें. यांच्यापैकीं रुक्मिणीगीतांतीलच वर्णन वाढवून पंतांनीं कृष्णविजयाचा ८३ वा अध्याय लिहिला आहे. तेव्हां प्रस्तुतच्या कालांतच पण कृष्णविजयाचे अ० ८०—९० लिहिण्याच्या पूर्वी ही गीतें लिहिलीं गेलीं असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

२४ नामरसायनांत ज्यांचा उल्लेख नाहीं अशीं भीष्मभक्तिभाग्य इत्यादि अनेक आर्यावृत्तांतील प्रकरणें सामान्यतः रचनेच्या धाटणीवरून आम्ही या काळांत समाविष्ट केलीं आहेत हें वरील नामावळी पाहिली असतां सहज दिसून येईल. तथापि या यादींतील एक दोन काव्यांचा इतर ठिकाणींही थोडाबहुत सुगावा लागतो व त्यावरून आम्ही ठरविलेल्या या रचनाकालासच बळकटी येते. यांपैकीं पहिलें काव्य म्हणजे पंतांच्या नियमक **गीतार्या** होत. या गीतार्यांचा उल्लेख इतर कांहीं काव्यांबरोबर पंतांनीं बिठोबादादांना पाठविलेल्या एका पत्रांत आला आहे. तो येणेंप्रमाणें:—' आपणास दशमपूर्वार्ध व गीतार्या पाठविल्या आहेत. भक्तिचंद्रिका पुस्तक श्रीमत्सकलवेदशास्त्रसंपन्न रा. बाबापाध्याय यांस पावतें करावें. श्रीद्रोणपर्व जयद्रथवधांत झालें. रात्रियुद्धाचा आरंभ आहे. आपल्या पुण्याशीर्वादें सिद्धीस गेल्यावर आधीं आपणाकडेच पाठवनि. मुक्तामाला तेथें बाबांजवळ असेल, केवळ गीर्वाणभाषाच आहे. ' या पत्रावर कालनिर्णायक अशी कांहीं मिति नाहीं, तथापि द्रोणपर्व जयद्रथवधांत झालें असल्याचा यांत उल्लेख आहे. श्री. शिवरामपंत परांजपे

यांनीं निर्विवादपणें ठरविलेल्या महाभारताच्या रचनाकाळास अनुसरून गणना केली असतां द्रोणपर्वाची रचना शके १७००—०१ च्या सुमारास झाली असावी असें निष्पन्न होतें. अर्थात् गीतार्या याच्या पूर्वीच रचून झाल्या होत्या हें उघड आहे. पंतांनीं भीष्मपर्व लिहितांना भगवद्गीता अजीबात गाळली आहे. त्यांनीं गीतेवर अगोदरच आर्या लिहिल्या असल्यामुळें भारतांत पुन: गीतेचा अनुवाद करून पुनरुक्ति केली नाहीं. असा यावरून तर्क बांधल्यास भीष्मपर्वाच्याही पूर्वी गीतार्यांचा काळ जाईल. एकंदरीनें महाभारताच्या नगारखाईच्या अगोदर म्हणजे १६९४ च्या पूर्वींच गीतार्या रचल्या असाव्या असें मानणें सर्वांत सयुक्तिक दिसतें. पांगारकरांनीं मात्र गीतार्यांच्या बाबतींत फार विलक्षण प्रकार केला आहे. पंतांनीं त्या शेवटीं शेवटीं रचल्या असें ठरवून अगदीं शेवटच्या प्रकरणांत केकावलीबरोबर त्यांची चर्चा केली आहे. ( मो. च. पृ. ४९९ ). भारतरचनाकाळीं विठोबादादांस लिहिलेल्या पंतांच्या स्वदस्तूरच्या पत्रांत गीतार्यांचा उल्लेख असून व तें पत्र खुद्द पांगारकरांनीं आपल्या मोरोपंतचरित्रांत (पृ. १२९) उद्धृत केलेलें असून, त्यांनींच कांहीं एक कारण न दाखवतां गीतार्यांस वीस बावीस वर्षे पुढें लोटावें हीं अत्यंत आश्चर्याची गोष्ट होय ! ' गीतेच्या भाषांतराचे पहिले सहा अध्याय मात्र पंतानें लिहिले; बाकीचे बारा अध्याय त्याचा पुतण्या आपा पराडकर म्हणून ब्रह्मावर्तीं रहात होता त्यानें केले. ' अशी एक आख्यायिका या गीतार्यांविषयीं हंसांनीं नमूद केली आहे. ( हंसकृत मोरोपंतांवरील निबंध, पृ. १०. ) ती खरी असावी असें दिसत नाहीं. विठोबादादांस लिहिलेल्या पत्रांत गीतार्यांचा उल्लेख केला आहे त्यावरून त्या वेळीं तो ग्रंथ संपूर्ण अस्तित्वांत असावा असें दिसतें. शिवाय १६९४ च्या अगोदर लिहिलेलें काव्य पुढें २० वर्षे हयात असतां पंत विनाकारण अपुरें ठेवतील असें मानतां येत नाहीं.

२५ ज्याच्या कालाविषयीं कांहीं घुटाळा लागतो असें दुसरें काव्य म्हणजे भीष्मभक्तिभाग्य हें होय. याच्यासंबंधानें पुढील आख्यायिका हंसकृत निबंधांत ( पृ. ७ ) नमूद केली आहे. ' एके समयीं भीष्माष्टमीचे सुमारास मोरोपंत नाशकास गेला होता तेथें श्री. नानासाहेब पेशवे यांची पत्नी व माधवराव बल्लाळ यांची मातोश्री गोपिकाबाई ह्या रहात होती. तिनें भीष्मभक्तीवर काव्य लिहिण्यास सांगितल्यावरून पंतानें भीष्मभक्तिभाग्य म्हणून एक प्रकरण भागवतांतील प्रथम:

स्कंधाचे आठवे ( ? ) अध्यायाचे आधारें रचून त्याचे शेवटीं असा लेख लिहिला आहे:—

> या प्रासूत स्वयं गौरी कीर्ति मेमेव सत्सुताम् ।
> या सद्व्रतनसंतश्रीः कल्पवल्लीव यार्थिनाम् ॥
> यस्याः स्नुषा रत्नगर्भा सपत्नी चामरावती ।
> तस्याः श्रीगोपिकादेव्याः किमपीदं कृते कृतम् ॥ '

हे दोन श्लोक भीष्मभक्तिभाग्याच्या आजपर्यंत छापलेल्या सर्व प्रतींत आढळतात. अर्थात् हा प्रत्यक्ष पंतांच्या हातच्याच श्लोकांचा आधार असल्यामुळे वर दिलेली हंसांच्या निबंधांतील आख्यायिकाही मुख्य मुद्याच्या गोष्टीपुरती खरी असावी असें वाटतें. म्हणजे गोपिकाबाईंच्या सूचनेवरून हें काव्य पंतांनीं लिहिलें असावें ही गोष्ट खरी दिसते. या श्लोकांत नानासाहेब स्वर्गवासी झाले असल्याचें सूचित केलें आहे. त्यावरून नानासाहेबांच्या मृत्यूनंतर रावसाहेबांच्या कारकीर्दीत हें काव्य रचिलें असावें असें दिसतें. गोपिकाबाई शके १६९० सालीं नाशिकास जाऊन राहिल्या व रावसाहेब कार्तिक शु॥ ११ शके १६९४ रोजीं वारले. तेव्हां गोपिकाबाई नाशकास असतां पंतांनीं त्यांच्याकरितां हें काव्य लिहिलें ही आख्यायिका लक्षांत घेतली म्हणजे १६९० ते १६९४ पर्यंत केव्हांतरी हें काव्य लिहिलें असलें पाहिजे असें निष्पन्न होतें. आम्ही वर भीष्मभक्तिभाग्य ज्या कालखंडांत घातलें आहे त्याच्याशीं हा काल तंतोतंत जुळतो हें तेव्हांच दिसून येईल.

परंतु पांगारकरांनीं या आख्यायिकेच्या सत्यतेविषयीं व वरील संस्कृत श्लोकांच्या प्रामाण्याविषयीं हरकत उपस्थित केली आहे. ' प्रस्तुत काव्याची मूळ पंतलिखित प्रत मला सांपडली आहे त्या प्रतींत हे दोन श्लोक नाहींत. तेव्हां ते प्रमाण मानतां येत नाहींत' असें त्याचें म्हणणें आहे. ' छापिल प्रतींतील पहिला श्लोक – यस्याः स्नुषा इ०—या श्लोकावरून प्रस्तुत काव्य पंतांनीं गोपिकाबाईच्या सांगण्यावरून शके १६८२–१६९४ च्या दरम्यान केव्हां तरी रचिलें होतें असें काव्येतिहाससंग्रह व काव्यसंग्रह या उभय मासिकाच्या संपादकांनीं लिहिलें आहे, पण पंतलिखित प्रतींत हे दोन्ही श्लोक नाहींत. ' (मो. च. ३८६). आतां येवढ्याशा मजकुरांत पांगारकरांचें शैथिल्य कसें प्रकट झालें आहे तें पहा. 'यस्याः स्नुषा रत्नगर्भा' हा श्लोक पहिला नसून दुसरा आहे. खुद्द पांगारकरांनीं

तो श्लोक आपल्या पुस्तकांत उतरतांना त्याच्यापुढें २ चा आकडा लिहिला आहे; तरी त्याला ते पहिला श्लोक समजत आहेत! पुढें, १६८२–१६९४ च्या दरम्यान हें काव्य लिहिलें असें काव्यसंग्रहकारांनीं म्हटलें नसतांना त्यांच्या माथ्यावर तें विधान बळेंच लादलें आहे! काव्यसंग्रहकारांनीं वस्तुतः आमच्याप्रमाणेच, म्हणजे, 'हें काव्य इ. स. १७६८–१७७० (शके १६९०–१६९२) या सालांच्या दरम्यान रचिलें असावें' असें मत प्रकट केलें आहे. असो. यानंतर मुख्य गोष्ट म्हणजे उपर्युक्त दोन संस्कृत श्लोकांसंबंधाची. हे श्लोक पांगारकरांस मिळालेल्या पंतलिखित प्रतींत नाहींत हें खरें तथापि पंतांनीं आपल्या काव्याची तेवढी एकच प्रत तयार केली होती असें जोंपर्यंत नक्की कोणास सांगतां येत नाहीं तोंपर्यंत ते श्लोक प्रक्षिप्त किंवा अप्रमाण म्हणून टाकून देणें धाष्ट्यांचें होणार आहे. वाचकांच्या सोयीकरितां पंत केव्हां केव्हां आपल्या काव्यांच्या एकाहून अधिक प्रती तयार करीत असत असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे. विशेषतः भीष्मभक्तिभाग्य काव्य गोपिकाबाईकडे पाठवून देतांना त्यांत हे दोन श्लोक रचून घातले असतील व इतर इष्टमित्रांकडे तेंच काव्य पाठवितांना त्यांतून हे श्लोक गाळले गेले असतील असें होणें अगदीं संभवनीय आहे. पंतांनीं हे श्लोक लिहिले नाहींत तर ते येथें आले तरी कसे याची उपपत्ति कांहींच लागत नाहीं. जे श्लोक खरोखर प्रक्षिप्त असतात ते कोणी कसे घुसडून दिले याचा उपपत्ति चटकन लावतां येते. पतिपुत्रहीन व राजैश्वर्यहीन झालेल्या गोपिकाबाईसाठीं मागाहून हे श्लोक कोणी तरी करून घातले असतील असें क्षणभरही मानतां येत नाहीं. तेव्हां सर्व बाजूंनीं विचार करतां आजपर्यंत सर्वत्र छापले गेलेले हे श्लोक पंतांचेच असावे व त्यांनीं हें काव्य गोपिकाबाईकरितां १६९० ते १६९३ च्या दरम्यान लिहिलें असावें असें मानणें सयुक्तिक दिसतें. अर्थात् गोपिकाबाई निमित्तमात्र झाली असली तरी मूळ स्फूर्ति पंतांचीच होती व तिच्याच हृद्य विलासामुळें हें काव्य इतकें अप्रतिम झालें आहे हें उघड आहे.

गोपिकाबाईचा प्रत्यक्ष केलेला नामनिर्देश पांगारकरांना अप्रमाण वाटत आहे; पण जेथें सवसामान्य भगवद्भक्तांस उद्देशून उल्लेख आहे तेथें कोणा तरी विशिष्ट व्यक्तीची सावली पडलेली असावी असा त्यांस भास होत आहे! "शिवाय सदर काव्य रचायलाही कोणी संतानें पंतांना सुचविलें होतें असें 'भगवद्भक्ताज्ञा कीं गाव्या सत्कथा यथामति तें, स्वीकारिलें स्वहित मतीं' या पंतोक्तीवरून

स्पष्ट दिसतें " ( मो. च. पृ. ३८६ ) असें ते म्हणतात. परंतु सामान्य भगवद्भक्तांना उद्देशून पंतांनीं वारंवार काढलेले उद्गार कोणा तरी विशिष्ट व्यक्तीस अनुलक्षून केलेले आहेत असें मानण्यांत पांगारकरप्रभृतींची कशी चूक होत आहे याचें विवेचन मागेंच केलें असल्यामुळें त्याविषयीं आतां येथें कांहीं लिहिण्याची जरूरी नाहीं.

[ ४ ]

२६. शके १६९४ पर्यंतच्या पंतांच्या काव्यरचनेचा विचार झाला. यानंतरचा १६९४ ते १७०३ हा दहा वर्षांचा काल म्हणजे महाभारत रचनेचा काल होय. त्यापूर्वींच्या १६८८-१६९४ या सहा सात वर्षांच्या कालांत आर्यावृत्तांत पुष्कळ रचना करून तें वृत्त पंतांनीं चांगलें घटवून तयार केलें होतें. प्रतिभेचा उल्लासही कृष्णविजय अ. ८०-९० व मंत्ररामायण यांत उत्कृष्ट रीतीनें दिसून आला होता. तेव्हां आपली पूर्वतयारी चांगली झाली आहे असें वाटून त्यांनीं पुढें महाभारताचें अवाढव्य काम हातीं घेतलें. महाभारतरचनेचा काल १६९३ ते १७०३ हा पांगारकरांनीं सांगितला आहे तो बहुतांशीं योग्य दिसतो ( मो. च. प्रस्तावना. ३४ ). तथापि याही बाबतींत त्यांनीं थोडीशी घरसोड केली आहेच. उपरिनिर्दिष्ट स्थळीं १६९३-१७०३ हा रचनाकाल सांगून पुढें एके ठिकाणीं 'मोरोपंतांचें भारत इ. स. १७७०-१७८० ( शके १६९२-१७०१ ) पर्यंत झालें असावें असें मी अन्य प्रसंगीं दाखविलेंच आहे' असें ते म्हणतात. यांत फारशी विसंगति दिसून येत नाहीं, परंतु पुढें पृ १८९ वर 'पंतांनीं......महाभारत ग्रंथ ७।८ वर्षांत रचला' असेंही तेच म्हणतात! असो. सर्व बाबींचा सांगोपांग विचार करून १६९४ च्या चातुर्मास्यांत महाभारतास आरंभ करून १७०५ च्या चातुर्मास्यांत पंतांनीं तें संपविलें असावें असें श्री. शिवराम महादेव परांजपे यांनीं ठरविलें असल्याकारणानें या बाबतींत आतां लिहिण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं.

त्याचप्रमाणें महाभारतांतील कर्णपर्व हेंच तेवढें पंतांनीं स्वतंत्र काव्यरूपानें अगोदर लिहिलें होतें व तें लोकांस आवडल्यामुळें मग प्रारंभापासून भारत लिहिण्यास पंतांनीं सुरवात केली असें जें विचित्र मत काव्येतिहाससंग्रहकारांनीं प्रचलित केलें होतें व काव्यसंग्रहकारांनीं पुष्कळसे आधार वगैरे दाखवून पुष्ट केलें होतें त्याचेंही समर्पक खंडन परांजपे यांनीं कायमचें करून टाकलें असल्यामुळें त्या

वादावर आतां कांहीं लिहिण्याची जरूरी राहिली नाहीं. पराडकरांच्या आवृत्तींतील आर्याभारताला परांजप्यांनीं लिहिलेला उपोद्घात फार सुंदर व मार्मिक असून उपर्युक्त दोन तीन बाबींचा त्यांत कायमचा निकाल लावला असल्याकारणानें तो महत्त्वाचा झाला आहे.

२७. महाभारतरचनाकालांत पंतांनीं इतर कविता फारशी लिहिली असावी असें वाटत नाहीं. महाभारतकालीन पत्रव्यवहारामध्यें गीतार्या, अमृतपान या काव्यांचा उल्लेख सांपडतो. यावरून भागवती प्रकरणांपैकीं कांहीं प्रकरणें व इतर कांहीं स्फुट प्रकरणें महाभारत रचीत असतांनाही लिहिलीं गेलीं असतील. अमृतमथन व वामनचरित हीं दोन उत्कृष्ट काव्यें जुळीं भावंडें आहेत. तीं एकाच काळीं लिहिलीं गेलीं असलीं पाहिजेत. या दोन्ही काव्यांच्या पोथ्या अगदीं एकसारख्या आहेत व त्यांतील पंतांचें अक्षर देखील अगदीं सारखें आहे यावरूनही त्यांचें एककालीनत्वच सिद्ध होतें. अमृतमथनाचा प्रसंग भारतांतही आदिपर्वांत वर्णन केला आहे. तेव्हां भारतांतील हे प्रसंग वर्णन करीत असतांना भागवतांतील याच प्रसंगांवरही आपण आख्यानें लिहावीं अशी बुद्धि पंतांना झाली असणें अगदींच असंभवनीय नाहीं. कसेंही असलें तरी मंत्रभागवत लिहिण्याच्या पूर्वीं हीं सर्व भागवती आख्यानें लिहून झालीं होतीं याविषयीं संशय रहात नाहीं. कारण बहुतेक ठिकाणीं या आख्यानांचेच तेवढे नेमके विषय मंत्रभागवतांत अजीबात गाळलेले किंवा अगदीं त्रोटकपणें वर्णिलेले आहेत. भक्तभूषणादि श्लोकबद्ध आख्यानें १६८२–१६८८ या काळांत लिहिलीं असावींत असें मागें निर्दिष्ट केलेंच आहे. ध्रुवचरित्रादि साकीबद्ध आख्यानें मात्र मंत्रभागवत लिहीत असतांना किंवा त्याच्याही नंतर लिहिलीं असावींत असें त्यांच्या रचनाशैलीवरून व मंत्रभागवतांतील संक्षेपविस्तारावर त्यांचा परिणाम झालेला दिसत नाहीं यावरून वाटतें. महाभारत अगदीं संपत आल्यावर म्हणजे १७०३–०४ सालीं भागवताकडे लक्ष वळवून पंतांनीं मंत्रभागवताच्या दशमस्कंधास आरंभ केला असण्याचा थोडासा संभव आहे. या विषयीं विशेष विवेचन पुढें येईलच.

[ ५ ]

२८. आतां पंतांच्या महाभारतोत्तरकालीन रचनेविषयीं विचार करावयाचा. शके १७०४ पासून पंतांच्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत, म्ह. १७१६ पर्यंतचा हा

काल होय. या कालांतील मुख्य रचना म्हणजे मंत्रभागवत, हरिवंश, संकीर्ण रामायणें हे मोठे ग्रंथ व मंत्रमय भागवत, मंत्रमय रामायण, कांहीं संतस्तवनपर प्रकरणें, देवांचीं स्तोत्रें, साकीबद्ध आख्यानें, काशीयात्रा प्रकरणें, श्लोककेकावलि, वगैरे स्फुट काव्यें, हीं होय. संकीर्ण रामायणें हें नांव, पंतांनीं अष्टोत्तरशत रामायणें रचण्याचा संकल्प केल्यानंतर जीं रामायणें रचलीं आणि जीं एकाच पोथींत एका पाठोपाठ एक अशा रीतीनें लिहून ठेवलेलीं आहेत त्या सर्व रामायणांना उद्देशून येथें योजिलें आहे. पराडकरी प्रतींतील सात व आठ या खंडांत जीं रामायणें छापलेलीं आहेत त्यांपैकीं १४ व्या मत्तमयूररामायणापासून ८३ व्या मंजुरामायणापर्यंतच्या सर्व रामायणांचा यांत समावेश होतो. हीं संकीर्ण रामायणें अनेकविध वृत्तांत रचलेलीं आहेत हें सुप्रसिद्धच आहे. शिवाय श्लोककेकावलि, गंगास्तव, वगैरे आर्येतर वृत्तांत रचलेलीं त्रोटक काव्येंही या कालांत क्वचित् आढळून येतात. येवढे अपवाद वगळले असतां या कालांतील बाकीचें सर्व काव्य आर्याग्रथित आहे.

या उत्तरकालीन काव्यांच्या रचनाक्रमाविषयीं विचार करूं लागतांच मंत्रभागवत, हरिवंश, काशीयात्रा प्रकरणें, संकीर्ण रामायणें व केकावलि असा क्रम उघड उघड दिसून येतो. मोरोपंतांच्या चरित्राचा व काव्यरचनेच्या विकासाचा विचार करतां हा क्रम जितका नैसर्गिक असल्याचें दिसून येतें तितकाच तो प्रमाणसिद्धही असल्यानें त्याच्याविषयीं वाद होण्यास जागाच नाहीं. पांगारकरांनीं हरिवंशाचा समाचार अगदीं अखेरच्या प्रकरणांत घेतला आहे. तथापि त्यांसही मंत्रभागवतानंतर परंतु रामायणांच्यापूर्वी हरिवंश रचला गेला हें मान्य आहे. असें 'ठळक गोष्टींची शकावलि' या सदराखालीं त्यांनीं काव्यांचे रचनाकाल दिलेले आहेत त्यांवरून दिसतें. ( मो. च. प्रस्तावना पृ. ३५ ).

२९. हरिवंशाच्या रचनाकालाविषयीं आजपर्यंत तिघांनीं तीन मतें प्रतिपादन केलीं आहेत पहिलें पांगारकरांचें मत पुढीलप्रमाणें आहे.'शके १७०७-१०, पांडुरंगराव नाईक यांच्या सांगण्यावरून व नाइकांच्या मुलांत विभक्तपणाचे तंटे चालले असतांना पंतांनीं घाईघाईनें हरिवंश लिहिला.'(मो.च.प्रस्तावना ३५). दुसरें मत काव्यसंग्रहकारांचें. ' पंतांनीं चातुर्मासे यांना शांतिपर्व चालू असतांना लिहिलेल्या एका पत्रांत ' श्रीमंतांजवळ हरिवंश होतो ऐसें आहे ' असा मजकूर आहे. यांतील ' हरिवंश होतो ' याचा अर्थ प्राकृत हरिवंशाची रचना होत आहे असा

असावा. हा अर्थ खरा असल्यास आर्याभारताच्या शांतिपर्वाच्या वेळीं ( शके १७०३ ) हरिवंशाची रचना चालू होती असें फलित होतें. पंत अनेक काव्यांचें काम एकदम चालवीत असत. आर्याभारत सुरू केल्यावर त्यांनीं प्रथम मंत्रभागवत त्याबरोबरच रचलें व मंत्रभागवतानंतर आर्याभारताबरोबरच हरिवंश रचिला. ' याप्रमाणें त्यांचें थोडक्यांत म्हणणें आहे. तिसरें मत पराडकरी आर्याभारताच्या उपोद्घातांत नमूद झालेलें श्री. परांजपे यांचें होय. ' आर्याभारत १७०४ च्या चातुर्मास्यांत समाप्त झालें. चातुर्मास्ये यांच्या मठांत त्यांनीं लिहून घेतलेली जी पोथी आहे ती १७०९ मध्यें लिहून घेतल्याचा उल्लेख आहे तेव्हां १७०४ व १७०९ या दोन सालांच्या दरम्यानच्या सुमारें पुऱ्या चार वर्षांच्या अवधीमध्यें हरिवंश रचिला गेला असावा असें दिसतें. ' असा हा तृतीय पंथ आहे. यांपैकीं आर्याभारत रचीत असतांना पंतांनीं हरिवंश रचला हें काव्यसंग्रहकारांचें मत त्याज्य होय. हें त्यांचें मत, पंत आर्याभारत वीस वर्षे ( शके १६८६ ते १७०६ ) रचीत होते हा त्यांचाच सिद्धांत गृहीत धरून त्यावर आधारलेलें दिसतें. कारण वीस वर्षांच्या अफाट कालामध्यें भारताखेरीज इतर काव्यें त्याच्याबरोबर रचण्यास सवड सांपडणें अगदीं शक्य आहे. परंतु आर्याभारताचा हा वीस वर्षांचा रचनाकाळ अगदीं चुकीचा ठरला असल्यामुळें आर्याभारताबरोबरच इतर अनेक मोठ्या काव्यांचीही रचना होत होती या अभिप्रायाची सयुक्तिकता सर्व नाहींशी झाली आहे. शिवाय ' श्रीमंतांजवळ हरिवंश होतो ऐसें आहे ' या उल्लेखाचा जो भलताच अर्थ का. सं. कारांनीं केला आहे तो केवळ हसूं येण्याजोगा आहे. पंत हे पुराणिक होते. तेव्हां श्रीमंतांजवळ सध्यां हरिवंश पुराणाचें वाचन चाललें आहे असें पंत सांगत आहेत. ' हरिवंश रचीत आहें ' असा अर्थ घ्यावयाचा तर पंत श्रीमंतांच्या पुढ्यांत बसून हरिवंश लिहीत असत असें मानावयाचें कीं काय ? पांडुरंगरायानें अनेकवार प्रेमानें विनंती केल्यावरून हरिवंश रचण्यास घेतला असें पंतांनीं स्वतः सांगितलें आहे. आर्याभारत लिहिलें जात असतांनाच पांडुरंगरायानें हरिवंश लिहिण्याविषयीं विनंती करणें व पंतांनीं ती मान्य करणें मुळींच संभवनीय दिसत नाहीं. हरिवंश हें महाभारताचें खिल अथवा पुरवणीपर्व होय. मुख्य ग्रंथ संपल्यावरच कोणीही झालें तरी पुरवणीचा भाग लिहिण्याविषयीं आग्रह करील व लेखकही मुख्य ग्रंथ संपल्यावरच पुरवणी लिहिण्यास हात घालील. तेव्हां सर्व बाजूंनीं विचार करतां आर्या-

भारत सुरू असतांच पंतांनीं हरिवंश लिहिला या काव्यसंग्रहकारांच्या कल्पनेंत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

बाकी राहिलेल्या पांगारकरांच्या व परांजप्यांच्या मतांत प्रत्येकीं थोडथोडें सत्य दिसून येतें. हरिवंश १७०९ मध्यें पूर्ण झाला ही एक गोष्ट निश्चित आहे. त्याचप्रमाणें हरिवंशास प्रारंभ महाभारतसमाप्तीनंतर म्हणजे १७०४ च्या चातुर्मास्यानंतर झाला असावा असेंही जवळ जवळ निश्चयानें म्हणतां येतें. महाभारतासारखा प्रचंड उद्योग हातांत असतांनाच हरिवंशाचें ओझें पंतांनीं अंगावर घेतलें असेल हें शक्य दिसत नाहीं. भारतरचनाकालांत पंतांनीं दुसरी कांहीं ही रचना केली नाहीं असें अर्थातच आमचें म्हणणें नाहीं. तथापि आर्याभारत रचून झाल्यावर, प्रथम स्वतःचा बेत नसतां, पांडुरंगरायांनीं बरेच वेळां आग्रह केल्यावरून पंतांनीं हरिवंश रचण्यास घेतला असावा असें प्रारंभींच्याच,

श्रीपांडुरंगरायें प्रेमें असकृत् करूनि सांगावें ।

भगवन्निदेश जाणुनि, सुयश यथाबुद्धि मग न कां गावें ? ॥ हरिवंश १. २.

या आर्येवरून दिसतें. अर्थात् १७०४ च्या चातुर्मास्यानंतर केव्हां तरी आरंभ करून १७०९ त हरिवंश संपूर्ण केला असावा असें दिसतें.

३०. तथापि हरिवंशाच्या रचनाकालाचा विचार त्याच्या एकट्यापुरताच करतां येत नाहीं. रचनाकालाच्या बाबतींत हरिवंश व मंत्रभागवत हीं जुळीं भावंडें आहेत. त्यांत मंत्रभागवत हें अगोदर जन्मलेलें व हरिवंश नंतर जन्मलेलें दिसतें. मंत्रभागवत हें हरिवंशाबरोबरच परंतु त्याच्या किंचित् अगोदर रचलें जात होतें असें म्हणण्यास खात्रीलायक प्रमाण म्हणजे,

श्रीमंत्रभागवत या नामानें ग्रंथ जो तयांत करी ।

निजचरितांचा संग्रह, कांहीं मेथेंहि करिल तोचि हरी ॥ हरिवंश १.९

ही हरिवंशांतीलच आर्या होय. यांतील ' करी ' हा वर्तमानकालवाचक प्रयोग लक्षांत ठेवण्याजोगा आहे. यावरून यावेळीं मंत्रभागवत, विशेषतः त्यांतील कृष्णचरितांचा संग्रह असलेला दशमस्कंध, नुकताच लिहिलेला होता, किंबहुना लिहिला जात होता असें स्पष्ट दिसतें.

मंत्रभागवताचा रचनाकाल आजमावण्यास दुसरें एक गमक आहे. पंतांनीं विठोबादादा चातुर्मासे यांचे पुत्र भैरावबावा यांना लिहिलेल्या दोन पत्रांत नवम, एकादश व द्वादश या स्कंधांचा उल्लेख केला आहे व तो पंतरचित मंत्रभागवता-

च्या स्कंधास अनुलक्षून आहे यांत शंका नाहीं. पैकीं दुसऱ्या पत्रांत हे स्कंध भैराळशेवाकडे पाठवीत असल्याचा उल्लेख असून त्यावर कार्तिक व॥ ७ बुधवार अशी मिति आहे. हा मिति व वाराचा योग शके १७०७ मध्यें येतो. यावरून १७०७ च्या कार्तिकाच्या पूर्वी द्वादशस्कंधापर्यंत सर्व मंत्रभागवत रचून झालें होतें हें सिद्ध होतें.

तेव्हां वरील विवेचनापासून पुढील गोष्टी निष्पन्न होतात.—( १ ) १७०४ च्या चातुर्मास्या ( सुमारें आश्विन ) पासून १७०७ च्या कार्तिकापर्यंतचीं ३ वर्षे म्हणजे मंत्रभागवताच्या रचनेचा काल होय. ( २ ) या कालांतच हरिवंशासही प्रारंभ झालेला असून त्याची थोडीबहुत रचना होत होती. ( ३ ) यानंतर सुमारें दोन वर्षांनीं म्हणजे १७०९ सालांत हरिवंश पूर्ण झाला असावा.

हरिवंश व मंत्रभागवत दोहोंमिळून एकंदर ९०००.आर्या आहे. १७०४ ते १७०९ या पांच वर्षांत ९००० आर्या म्हणजे सरासरीनें दिवसास ५ आर्या पडतात. शिवरामपंत परांजपे यांनीं आर्याभारताच्या उपोद्घातांत दिवसास ४।५ असेंच पंतांच्या रचनेचें प्रमाण ठरवलें आहे. तेव्हां वर ठरविलेला रचनाकाल त्या दृष्टीनें योग्यच ठरतो. परंतु ते १७०४ ते १७०९ हा अवधि एकट्या हरिवंशालाच देतात व मंत्रभागवताला अजीबात विचारांतच घेत नाहींत हें मात्र मुळींच मान्य होण्यासारखें नाहीं.

३१. आतां मंत्रभागवताच्या दशमस्कंधाच्या रचनाकालाविषयीं रा. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर यांनीं जो पक्षोपन्यास केला आहे त्याचा विचार करूं.

पंतांच्या कृष्णविजयाला 'बृहद्दशम' असें दुसरें नांव आहे. त्याला बृहत् म्हणजे मोठा दशम असें नांव पडण्याला त्याच्यापूर्वी कोणतातरी 'लघु'दशम अस्तित्वांत असला पाहिजे; तो लघुदशम म्हणजे अर्थात्‌च मंत्रभागवतांतील दशम होय; तेव्हां मंत्रभागवतांतील दशम हा अगोदर रचला गेला व त्याच्या अपेक्षेनें बृहत् ठरलेला कृष्णविजय नंतर रचला गेला;—असा समज अथवा भ्रम पूर्वी प्रचलित असे. परंतु पांगारकरांनीं या समजाचा निरास करून सबंध मंत्रभागवत कृष्णविजयानंतरच रचलें असें ठाम लिहिलें आहे. ( मो. च. पृ. २५४ ). तथापि याच्या नंतर देखील रामकृष्णपंत पराडकरांनीं 'कृष्णविजयाला बृहद्दशम हें नांव पडण्याला त्यापूर्वी रचलेला हा ( मंत्रभागवतांतील ) दशम त्याहून लघु होता, हें कारण झालें आहे,' ( केसरी १६ मे १९११ ) असें प्रतिपादन करून पांगार-

करांनीं निर्मूल ठरविलेला भ्रम पुनः उत्थापित करण्याचा प्रयत्न केलेला होता. परंतु यानंतर २६ मे १९१४ च्या केसरींत मंत्रभागवताच्या रचनाकालासंबंधीं जो लेख त्यांनीं लिहिला त्यांत मात्र मंत्रभागवत दशम कृष्णविजयाच्याही अगोदर लिहिला असें आत्यंतिक प्रतिपादन केलेलें आढळत नाहीं. व खरोखर असलें प्रतिपादन क्षणभरही टिकण्याजोगें नाहीं. भाषा, कल्पना, विचार, रचनाशैली इत्यादिकांवरून ग्रंथकाराची परिणति थोडीशी तरी अजमावतां येते या म्हणण्यांत जर कांहीं अर्थ असेल तर मंत्रभागवताचा कोणताही भाग कृष्णविजयाच्या अगोदर लिहिलेला नाहीं असें अगदीं निर्धास्त म्हणतां येईल.

३२. मंत्रभागवतांतील दशम कृष्णविजयाच्याही अगोदर लिहिला हें आत्यंतिक मत जरी रा. पराडकरांनीं सोडून दिलें असलें तरी सबंध मंत्रभागवतास आरंभ करण्याच्यापूर्वीं दशम स्कंध तेवढा लिहून पंतांनीं पूर्ण केला होता असें मात्र त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. पंतांनीं पहिल्या प्रथम मंत्रांत गोवलेला आर्याबद्ध दशमस्कंधच एक स्वतंत्र काव्य या नात्यानें रचून तयार केला व आपल्या हातचें सबंध भागवत असावें अशी इष्टमित्रांनीं सूचना केल्यावरून नंतर त्यांनीं १–९ व ११–१२ स्कंधांचे रूपुरत पूर्वीच्या दशमास जोडून मंत्रभागवत तयार केलें असा पराडकरांच्या म्हणण्याचा एकंदर इत्यर्थ आहे. त्यांच्या प्रतिपादनांतील मुद्दे दोन आहेत:—१. दशमस्कंध इतर सर्व स्कंध रचण्याच्या पूर्वी रचला; २. दशमस्कंध रचला तेव्हां सबंध भागवत मराठींत रचण्याचा पंतांचा बेत नव्हता; अर्थात् दशमस्कंध हाच 'भागवतमंत्रमुक्तामणिमाला' या नांवानें स्वतंत्र ग्रंथ म्हणून कांहीं दिवस अस्तित्वांत होता.

रा. पराडकर व त्यांची बाजू सजवून मांडणारे रा. दत्तो वामन पोतदार यांचीं प्रमाणें थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहेत. [ पहा, पराडकरी प्रत मं. भा. उपोद्घात पृ. ६–१२ ]. ( १ ) दशमस्कंधाचे [illegible] भिन्नत्व. दशमाच्या कागदाचा आकार इतर स्कंधांच्या पोथ्यांहून भिन्न आहे. शिवाय दशमाची पोथी जास्त जुनी आहे. (२) दशमाच्या पोथीचें अक्षर, लिहिण्याची पद्धत, समासाची रुंदी वगैरे सर्व बाकीच्या पोथींपेक्षां भिन्न आहे. ( ३ ) स्वतंत्र ग्रंथाला जोडावा त्याप्रमाणें दशमस्कंधाला उपोद्घात व उपसंहार जोडला आहे. ( ४ ) दशमस्कंधांतच फक्त १०८ ही मंत्रसंख्या साधण्यावर कटाक्ष ठेवला आहे. इतर स्कंधांतील मंत्रांना संख्येचें विशिष्ट बंधन नाहीं. ( ५ ) 'भागवतमंत्रमुक्तामणिमाला' हें स्वतंत्र

नांव दशमस्कंधाला दिलें आहे. यावरून दशमस्कंध स्वतंत्र ग्रंथ म्हणूनच लिहिला होता असें प्रतीत होतें. ( ६ ) चातुर्मास्ये बोवांच्या येथें जीं पंतांचीं पत्रें आहेत त्यांपैकीं दोन पत्रांत नवम, एकादश व द्वादश येवढ्याच स्कंधांचा क्रमानें उल्लेख आहे. दशमाचा नाहीं. ( ७ ) पंतांनीं मंत्रभागवताच्या तीन माळा कल्पिल्या आहेत. अशा अडनिड्या तीन माळा कल्पिण्याचें वस्तुतः कांहीं कारण दिसत नाहीं. तीन माळा कल्पिल्या आहेत यावरून दशमस्कंध प्रथम रचून त्याची एक माळ केली होती व मागून सबंध भागवत रचण्याची कल्पना आल्यावर १ ते ९ व ११ ते १२ अशा स्कंधांच्या दोन माळा आणखी बनविल्या असें दिसतें.

३३. पराडकर व पोतदार यांनीं हीं जीं प्रमाणें दिलीं आहेत तीं वस्तुस्थितीचें वर्णन या दृष्टीनें बहुधा यथार्थ आहेत. बहुधा असें म्हणण्याचें कारण त्यांनीं दिलेलें पहिलें प्रमाण त्यांनीं नीट विचार करून दाखल केलेलें दिसत नाहीं. दशमाची पोथी आकार, कागदाचा दर्जा इत्यादि बाबतींत भिन्न असून ती जास्त **जुनी** आहे हें त्यांचें म्हणणें खरें नसून दशमाची पोथी इतर स्कंधांच्या पोथीपेक्षां जास्त मळलेली व वापरलेली आहे इतकीच काय ती या संबंधांतील खरी गोष्ट आहे. **जुनेपणा** व फार वापरल्यामुळें आलेली **मलिनता** यांतील भेद या शोधकद्वयाच्या लक्षांत आलेला दिसत नाहीं. दशमस्कंध फार फार तर दहा वर्षे अगोदर लिहिला होता असें जरी मानलें तरी ज्या पोथ्या आज १४० वर्षे उत्तम शाबूत आहेत त्यांपैकीं कांहीं केवळ ८-१० वर्षांनीं जास्त जुन्या म्हणून अगदीं जीर्ण दिसूं लागाव्या ही गोष्ट अशक्य आहे. तात्पर्य, दशमाची पोथी **फार वापरल्यामुळें** जीर्ण व मलिन झालेली दिसत आहे, **अधिक जुनेपणामुळें नव्हे.** आणि दशमस्कंधाचीच पोथी जास्त कां वापरली जावी याचें कारणही अगदीं उघड आहे. तें कारण म्हणजे दशमाची अतोनात लोकप्रियता हेंच होय. जास्त लोकप्रिय विभाग जास्त मलिन व जीर्ण होण्याचा प्रकार पंतकाव्याच्या इतर पोथ्यांच्या बाबतींतही दिसून येतो. कृष्णविजयाचा ७९ ते ८८ अध्यायांचा भाग ( सुदामकथा, सुभद्राहरण, रुक्मिणीविवाह वगैरे ) इतर भागापेक्षां जास्त लोकप्रिय आहे; यामुळें कृष्णविजयामधलीं तेवढींच पत्रें अति मलिन झालेलीं दिसून येतात व त्यांपैकीं कांहीं तर गहाळही झालीं आहेत. असो. त्याच-

प्रमाणें पोथींचा आकार भिन्न असल्याचें विधान जें पोतदारांनीं केलें आहे तेंही यथार्थ दिसत नाहीं. पोथीच्या कडा अत्यंत जीर्ण झाल्या असल्या-कारणानें लांबी थोडी कमी असल्याचें दिसतें येवढेंच. अक्षरासंबंधीं व समास मंत्रांक वगैरे संबंधीं पोतदारांनीं जें लिहिलें आहे तें मात्र अगदीं खरें आहे. किंबहुना या मुद्याला जितकें महत्त्व द्यावयास पाहिजे होतें तितकें त्यांनीं दिलेलें नाहीं असेंच उलट म्हणावेंसें वाटतें. दशमाचें अक्षर व पोथीचा एकंदर देखावा उघड उघड महाभारतकालीन आहे. परंतु बाकीच्या मंत्रभागवताचें अक्षर अगदीं उत्तरकालीन म्हणजे रामायणकालीन आहे असें म्हणावें लागतें.

पंतलिखित पोथ्यांचा व पंतांच्या हस्ताक्षरांचा हा प्रश्न इतका घोटाळ्याचा व मति गुंग करून सोडणारा आहे कीं केवळ त्याचाच अभ्यास वर्ष सहा महिने करून त्य वर एक स्वतंत्र निबंध लिहितां येण्याजोगा आहे. तथापि सध्यां उप-स्थित झालेल्या प्रश्नाचें थोडक्यांत उद्घाटन करून त्याच्यापासून काय निष्पन्न होतें हें सांगितल्यास गैर होणार नाहीं. पंतलिखित पोथ्यांचा कागद दोन प्रका-रचा आहे. एक देशी व दुसरा परदेशी पोर्तुगीज. मंत्रभागवताची सर्व पोथी ( दशमासह ) परदेशी कागदावरच लिहिलेली आहे. साधारणपणें पाहतां आर्याभारत, मंत्रभागवत व संकीर्ण रामायणें इतके ग्रंथ पंतांनीं एकाच आकाराच्या पोथ्यांवर स्वतःच लिहिले आहेत. या सर्वांचा कागद पोर्तुगीज असून पोथ्यांची लांबी १२ इंच व रुंदी ४ इंचांपेक्षां थोडी जास्त अशी आहे. यांचा कागद सर्व अगदीं एकसारखाच आहे असें नाहीं. ठिकठिकाणीं कमी जास्त जाडीचा व भिन्न गर्भचिन्हांचा असा आहे. तथापि कागदाची लांबी-रुंदी सर्व पोथ्यांची सारखी असल्यामुळें या पोथ्या साधारणपणें एकाच तऱ्हेच्या आहेत, येवढें धरून चालण्यास हरकत नाहीं. परंतु या पोथ्यांच्या अक्षराकडे पाहिलें तर लिहिण्याच्या पद्धतीचे दोन निरनिराळे गट उघड दिसून येतात. आर्याभारत व मंत्रभागवताचा दशमस्कंध यांचें अक्षराच्या बाबतींत साम्य फारच आहे. दोघांची लिहिण्याची धाटणी अगदीं एकच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु अक्षराच्या बाबतींत दशमस्कंध जितका आर्याभारताकडे ओढ घेत आहे तितकेंच बाकीचें सर्व मंत्रभागवत संकीर्ण रामायणाच्या पोथीकडे झुकत आहे संकीर्ण रामायणाच्या पोथीचें अक्षर बारीक, अव्यवस्थित, गिजमिड व अस्थिर हातानें काढलेलें असून ती पोथी पंतांनीं अगदीं अखेरीस लिहिलेली दिसते.

मंत्रभागवताचें अक्षर त्याच्या कांहींसें अगोदरचें परंतु एकंदरीनें त्याच गोटांत जमा होण्याजोगें आहे. केवळ अक्षराच्याच दृष्टीनें पाहिलें तर हरिवंशाच्या पोथींचें अक्षर हें आर्याभारत व संकीर्ण रामायणें यांच्या बरोबर मध्यावस्थेंतील अक्षर दिसतें, अर्थात् तें मंत्रभागवताच्या पूर्वीचें असावें असा पाहाणाऱ्याचा ठाम ग्रह होतो. हरिवंशाची पोथी अगदीं घाईनें लिहिलेली आहे. तरी त्यांत भारती अक्षराची सफाई, ठसठशीतपणा, व बुरूक वळण हें सुटलेलें नाहीं. किंबहुना १७१०–११ सालांत लिहिलेलीं काशीयात्रा प्रकरणें देखील भारती वळणांत सुरेख लिहिलेलीं आहेत परंतु मंत्रभागवतांत हें वळण सुटलेलें दृष्टोत्पत्तीस येतें व लेख-णीचा अस्थिरपणा अक्षरांत उमटलेला दिसून येतो. अक्षर पंतांचेंच खास परंतु वृद्धापकाळचें, हात कांपूं लागल्या वेळचें, असावें असा ग्रह होऊं लागतो.

या वर वर्णिलेल्या पोथ्यांच्या व अक्षरांच्या स्थितीवरून पराडकरांनीं काढलेलें तेंच कांहीं अगदीं अबाधित अनुमान नव्हे हें सहज लक्षांत येईल. व सध्यां दिसत असलेल्या पोथ्यांचा लेखनकाळ हाच काव्याचा रचनाकाल असें निर्धारानें मानण्याची सोय नाहीं हेंही स्पष्ट दिसून येईल. मंत्रभागवत हें सर्व आर्याभारत झाल्यानंतर लगेचच ( पूर्वी ठरविल्याप्रमाणें ) पंतांनीं रचलें. परंतु त्याच्या दशम-स्कंधाची तेवढी त्यला मागणी विशेष असल्याकारणानें त्या वेळच्या भारतकालीन अक्षरांत पक्की प्रत करून ठेवली असावी; बाकीच्या मंत्रभागवताची ( स्कं १–९ व ११–१२ ) पक्की प्रत करण्याचें तसेंच राहून गेलें असावें व काशीयात्रेहून आल्यावर ती पक्की प्रत पंतांनीं तयार केली असावी;–अशी एक अनुमानपरंपरा वर वर्णिलेल्या पोथ्यांच्या स्थितीवरून सुचते. हिला अर्थात् इतर आधार कांहीं नाहीं. तथापि तिच्यांत असंभवनीय असेंही कांहीं नाहीं म्हणून ती येथें नमूद करून ठेविली आहे. पंतांच्या काव्याची कच्ची प्रत म्हणजे जवळजवळ पक्क्या पोथीप्रमा-णेंच शुद्ध व व्यवस्थित असे असें कृष्णविजयाच्या बऱ्याच भागाची उभ्या कागदा-वर लिहिलेली कच्ची प्रत अजून अस्तित्वांत आहे तिजवरून दिसून येतें. तेव्हां मंत्र-भागवताची अशी कच्ची प्रतच कांहीं दिवस अस्तित्वांत असणें व तीच भैराळबाबा वगैरेंकडे पाठविली गेली असणें अशक्य नाहीं.

पराडकरांनीं स्वमतसिद्धीकरितां पोथीचा व अक्षराचा जो हवाला दिला आहे त्याविषयीं खरा सखोल विचार केला असतां विचाराची मजल कोठपर्यंत जाते हें वर दर्शविलें. आतां बाकीचीं जीं त्यांचीं प्रमाणें आहेत त्यांविषयीं विचार करूं.

दशमस्कंधांतच १०८ मंत्रसंख्या साधली आहे हें प्रमाण या दृष्टीनें अगदींच निर्बल आहे. पंतांना १०८ ही संख्या अत्यंत प्रिय होती. शक्य असेल तेथें ही संख्या साधावी असा त्यांचा मनोदय असणें साहजिक आहे. मंत्रभागवताच्या संक्षेपाचें जें प्रमाण त्यांनीं योजिलें होतें त्या मानानें पाहतां दशमस्कंधांतच येवढी मोठी मंत्रसंख्या साधतां येईल असें त्यांना वाटलें म्हणून त्यांत ती त्यांनीं साधली. त्यावरून तो अगोदरच रचला किंवा मागाहून रचला असें कांहींही अनुमान निघत नाहीं. ' भागवतमंत्रमुक्तामणिमाला ' असें स्वतंत्र निराळें नांव पंतांनीं दशमस्कंधाला दिलें होतें या म्हणण्यांतही कांहीं जीव नाहीं. असें बोजड, बेडौल व लांबलचक नांव पंत आपल्या काव्याला कधीं देत नाहींत. त्यांच्या काव्यांचीं नांवें सर्व सुटसुटीत व बहुधा काव्यांतील मुख्य विषयाचें दिग्दर्शन करणारीं असतात. फक्त रामायणांचीं नांवें मात्र कांहीं तरी बाह्य लक्षणांवरून (मंत्र वृत्त वगैरेवरून) योजिलेलीं आढळतात. व त्यांतच एखादें बोजड नांव दिसून येतें. इतरत्र तसें आढळत नाहीं. तेव्हां ' भागवतमंत्रमुक्तामणिमाला ' हें त्यांनीं दशमस्कंधात्मक स्वतंत्र ग्रंथाला दिलेलें नांव होतें असें मुळींच मानतां येत नाहीं. कर्णपर्वाच्या शेवटीं ' नरनारायणविजयग्रंथ ' हे शब्द पाहून कर्णपर्वाला निराळा स्वतंत्र ग्रंथ मानण्यांत काव्यसंग्रहकार जसे चकले तसाच कांहींसा प्रकार येथें होत आहे. का. सं. कारांनीं जसा नरनारायणविजय याचा अर्थ लक्षांत घेतला नाहीं त्याचप्रमाणें पराडकरांनींही वरील लांबलचक पदाचा अर्थ काय आहे याची छाननी केलेली दिसत नाहीं. ' भागवतांतील मंत्ररूप मोत्यांपैकीं उत्कृष्ट मोत्यांची माला' असाच या पदाचा अर्थ करावा लागतो. म्हणजे दशमस्कंध हा **भागवतांतील मंत्रांपैकीं** उत्कृष्ट मंत्रांची माला आहे असें पंत येथें म्हणत आहेत. तेव्हां भागवतमंत्रमुक्तामणिमाला या संज्ञेवरून दशमस्कंध हा स्वतंत्र ग्रंथ आहे असें मुळींच सिद्ध न होतां उलट मंत्रभागवतांतील मंत्रांच्या माळांपैकीं ती उत्कृष्ट माळ आहे असेंच खुद्द पंतांच्या शब्दांनीं सिद्ध होत आहे. या संज्ञेवरूनच दशम हा मंत्रभागवताचा भाग म्हणूनच रचलेला होता असें स्पष्ट दिसतें.

भागवताच्या पंतांनीं तीन माळा केल्या आहेत या गोष्टीलाही नसतें महत्त्व पराडकर देत आहेत. खुद्द मूळ भागवताकडे नजर दिली म्हणजे दशमस्कंध तेवढा चटकन् निराळा असा लक्षांत येतो. विस्तार, रचनाशैली, रसोत्कर्ष व श्रीकृष्णचरितानुवर्णन या सर्व गोष्टींमुळें तो भागवतांतील अत्यंत महत्त्वाचा

असा स्वतंत्रच भाग बनून राहिला आहे. अर्थात् त्याच्यामुळें बाकीच्या भागवताचेही १–९ व ११–१२ असे दोन विभाग पडल्यासारखे झाले आहेत. हे मूळ भागवताचे स्वाभाविक रीतीनेंच पडलेले तीन विभाग पाहून एकाद्या कवीला त्याचा अनुवाद करतांना आपल्याही ग्रंथाचे असे तीन विभाग कल्पावे असें वाटलें तर त्यांत आश्चर्य करण्याजोगें कांहीं नाहीं व त्याच्यावरून दुसरीं अनुमानें काढलींच पाहिजेत असें नाहीं. त्याचप्रमाणे दशमाला उपक्रमोपसंहार जोडलेले दिसून येतात या गोष्टीचें महत्त्वही सकृद्दर्शनीं वाटतें तितकें विचारांतीं दिसून येत नाहीं. उपसंहारात्मक श्लोक तर कोणत्याही महाकाव्याचे मोठे विभाग संपले असतां त्यांच्या अंतीं असे अनेक रचून घालण्याची पंतांना संवयच आहे. आदिपर्वाच्या अंतीं 'रामाचें रचिलें चरित्र' इत्यादि सुंदर उपसंहाराचा श्लोक पंतांनीं घातला आहे. त्याचप्रमाणें विराट, भीष्म, कर्ण इत्यादि पर्वांच्या शेवटीं कमी अधिक उपसंहारात्मक उद्गार त्यांनीं काढले आहेत हें सुप्रसिद्धच आहे. उपोद्घात मात्र असे ठिकठिकाणीं घातलेले दिसून येत नाहींत हें खरें, तथापि दशमाचा बारा आर्यांचा उपोद्घात ज्या तऱ्हेनें पोथीवर लिहिलेला आहे त्यावरून तो दशमाच्या अगोदरच रचला आहे कीं नाहीं याविषयीं संशय वाटतो. या उपोद्घातावरून फार तर दशमस्कंध इतर स्कंधांच्या अगोदर रचावयास घेतला होता येवढें निष्पन्न होईल, तो स्वतंत्र ग्रंथ म्हणूनच रचला असें सिद्ध होत नाहीं.

पराडकरांनीं दिलेलीं प्रमाणें याप्रमाणें वस्तुस्थितीचें दिग्दर्शन करण्याच्या दृष्टीनें खरीं असलीं तरी त्यांचें प्रमेय सिद्ध करण्याला तीं असमर्थ आहेत. फार तर दशमस्कंध अगोदर रचावयास घेतला असावा येवढें त्यावरून दिसून येतें; परंतु तो स्वतंत्र ग्रंथ या नात्यानें सबंध भागवत लिहिण्याचा बेत नसतां रचला असें मानणें दुरापास्त होतें. उलट स्वतंत्र ग्रंथ म्हणून दशम रचला नसावा असेंच मानण्याला कांहीं कारणें दिसून येतातः— ( १ ) सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे दशमस्कंधावर एक ग्रंथ अगोदरच रचला असतांना दुसरा ग्रंथ स्वतंत्रपणें रचण्याला पंतांना काय कारणें झालीं होतीं याचा खुलासा कोठेंही मिळत नाहीं. पंतांनीं दशमस्कंधावरचा आपला ग्रंथ कृष्णविजय हा पुष्कळ वर्षांपूर्वींच लिहून संपविला होता ही गोष्ट निर्विवाद आहे. मग त्याच दशमस्कंधावर आपण पुनः आणखी एक काव्य रचावें अशी बुद्धि पंतांस कशानें झाली? एकशें आठ रामायणांची एक गोष्ट सोडून दिल्यास दुसऱ्या कोणत्याही समग्र मूळ ग्रंथावर

दोनदोनदां टीका लिहिण्याची बुद्धि पंतांस झाल्याचें कोठेंही दिसून येत नाहीं. प्रथम स्वतंत्र काव्य म्हणून दशमस्कंध लिहिला असें न मानतां सबंध भागवत रचण्याचाच पंतांचा पहिल्यापासून बेत होता असें मानलें म्हणजे मग ही अडचण रहात नाहीं. कारण मग स्वतंत्र रीतीनें दशमस्कंध लिहिण्याचा प्रश्नच उरत नाहीं. सबंध भागवत लिहितांना ओघानें तो येईल आणि तसा तो ओघानें लिहिला गेल्यास तेथें त्याची पुनरुक्ति कां केली असा प्रश्न उपस्थित होऊं शकत नाहीं. परंतु प्रथम सबंध मंत्रभागवत लिहिण्याचा बेत नसतांना 'भागवतमंत्रमुक्तामणिमाला' म्हणजे दशमस्कंध हाच तेवढा पंतांनीं प्रथम लिहिला असें जेव्हां म्हणण्यांत येतें तेव्हां मात्र कृष्णविजय अगोदर रचलेला असतांना हा नवीन दशमावर ग्रंथ लिहिण्याची बुद्धि पंतांना कां झाली असा प्रश्न उद्भवतो व त्याचें समाधानकारक उत्तर मिळत नाहीं. पंतांच्या कृष्णविजयांत मंत्र साधलेले नाहींत व तो सबंध आर्यामयही नाहीं. मंत्रभागवतांतील दशमस्कंधांत या दोन्ही गोष्टी आहेत हें खरें. तथापि केवळ मंत्रांकरितां व आर्यावृत्ताकरितां पंत एक निराळा दशमस्कंध पुनः लिहिण्यास घेतील हें संभवनीय दिसत नाहीं. मंत्राकरितां पंत 'मंत्रयमय भागवता' सारखी एकादी क्षुल्लक कसरत करून दाखवितील पण केवळ त्याच्याकरितां मंत्रभागवतांतील दशमस्कंधासारखा मोठा ग्रंथ लिहिण्यास ते कधींही घेणार नाहींत. व असल्या क्षुल्लक हेतूनें हातीं घेतलेला ग्रंथ इतका सरस व उत्कृष्ट उतरणेंही शक्य नाही.

( २ ) श्री मंत्रभागवत या नांवानें ग्रंथ जो तयांस करी

निजचरितांचा संग्रह, कांहीं येयेंहि कारिल तोचि हरी ॥ हरिवंश १-९.

या आर्येंत 'मंत्रभागवत' नांवाच्या ग्रंथांतच श्रीकृष्णचरितांचा संग्रह आहे असें म्हटलें आहे. यावरून हरिवंशप्रारंभकालीं श्रीकृष्णचरितांचा संग्रह असलेला दशमस्कंध नुकताच रचला होता व हा 'निजचरितांचा संग्रह' **मंत्रभागवतांतीलच भाग** होता हें अगदीं उघड दिसतें. 'करी' या क्रियापदावरून वर्तमानकालाचा, फार तर 'वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वा' या न्यायानें समीपस्थ भूतकालाचा बोध होतो. अर्थात् दशमस्कंध त्यावेळीं अगदीं नुकताच रचलेला असला पाहिजे. (३) तिसरें प्रमाण भाषा व रचनाशैली यांचें. मंत्रभागवताची शैली सर्वत्र सारखी दिसून येते. दशमांत श्रीकृष्णकथांमुळें आलेला मधुरिमा व प्रेमळपणा सोडून दिल्यास मंत्रभागवतांत पंतांची आर्या सर्वत्र सुगम, घटलेली, प्रसादपूर्ण

व ललित अशीच दिसून येते. तेव्हां यावरून मंत्रभागवताच्या निरनिराळ्या विभागांच्या रचनाकालामध्यें फारसें अंतर असावें असें दिसत नाहीं. हें प्रमाण सर्वस्वीं अंतःकरणग्राह्यच खरें, तथापि मार्मिक वाचकास तेव्हांच पटण्याजोगें असल्यामुळें त्याचा उल्लेख केला आहे.

एवंच काय, कीं दशमस्कंध हा स्वतंत्र रीतीनें सबंध भागवत लिहिण्याचा बेत नसतांना अगोदर लिहिला गेला, हें पराडकरांचें म्हणणें मान्य होण्याजोगें नाहीं. बाकीच्या स्कंधांपेक्षां दशमस्कंध कदाचित् अगोदर लिहिला गेला असेल हें संभवनीय आहे. तो देखील अगोदर म्हणजे कांहीं थोडा काळ अगोदर, इतकेंच. तो अगोदर रचून झाल्यामुळें त्याची स्वतंत्र माळा कल्पावी ही सहज सुचणारी कल्पनाही त्यांच्या मनांत दृढ होऊन त्यांनीं ती अमलांत आणली असेल. परंतु प्रथम रचला गेला असला तरी तो हेतुपुरस्सर, मंत्रभागवताचा एक भाग म्हणूनच रचला गेला व तो १७०४ किंवा फार तर १७०३ च्या सुमारासच रचला गेला याविषयीं संदेह वाटत नाहीं.

३४. यास्तवच रा. रामचंद्र महादेव आठवले यांनीं ' मांधांता स महीपतिः ' या दशमस्कंधाच्या अंतीं लिहिलेल्या श्लोकावरून जी कल्पना बसविली आहे ती असंभवनीय वाटते. हा श्लोक भोजप्रबंधांतील असून मुंज राजा आपला पुतण्या जो भोज, त्यास मारेकऱ्याकडून मारविणार होता त्या प्रसंगीं भोजानें आपल्या चुलत्यास रचून पाठविला होता. ' हा श्लोक नारायणराव पेशव्याच्या वधप्रसंगानें पंतांना आठवला असावा व तो त्यांनीं दशमाच्या पोथीवर लिहून ठेवला असावा; अर्थात् दशमाचा रचनाकाल नारायणरावांच्या वधापूर्वींचा असावा;' अशी आठवल्यांची तर्कपरंपरा आहे. परंतु नारायणरावांचा वधकाल १६९५ हा आहे. त्याच्या अगोदर म्हणजे भारतरचनेच्या देखील अगोदर मंत्रभागवत दशमाला ओढणें हें अगदीं अशक्य होणार आहे. मंत्रभागवत दशमांतील वात्सल्यरसाचा परमोत्कर्ष हा कवीची परिणतावस्था व उतारवय स्पष्टपणें सुचवीत आहे. शिवाय कृष्णविजय नुकताच पूर्ण झालेला असतांना लगेच पंत पुनः दशमावर ग्रंथ लिहिण्यास घेतील हें कसेंसेंच वाटतें. ' मांधाता ' इ. श्लोक नारायणरावांच्या वधावरून त्याचवेळीं सुचला ही केवळ कल्पनाच आहे. तिला आधार कांहीं एक नाहीं. अशा तऱ्हेचे सुभाषितरूप अनेक श्लोक पंतांनीं आपल्या पोथ्यांवर कोठें कोठें लिहून ठेवले आहेत.

शिवाय मंत्रभागवताचा दशमस्कंध इतका अगोदर लिहिला नसला पाहिजे व आम्हीं म्हटलें आहे त्याप्रमाणें १७०३ नंतरच तो रचला असावा असें म्हणण्यास आणखी बलवत्तर प्रमाण उपलब्ध आहे. विठोबादादास पंतांनीं पाठविलेल्या एका पत्रांत पुढील मजकूर आहे." आपणास दशम पूर्वार्ध व गीतार्थ पाठविल्या आहेत. श्रीद्रोणपर्व जयद्रथवधान्त झालें. रात्रियुद्धाचा आरंभ आहे." इ. (मो.च.पृ १२९) या पत्रांत दशमपूर्वार्ध पाठविल्याचा उल्लेख आहे परंतु त्याला 'थोर' दशम किंवा 'लघु' दशम असें कांहीं म्हटलेलें नाहीं. यावरून त्यावेळीं कोणता तरी एकच दशम अस्तित्वांत होता हें उघड दिसतें व तो एक म्हणजे कृष्णविजयच असला पाहिजे. कृष्णविजय पूर्वार्धाची पोथीही निराळी, उत्तरार्धाहून भिन्न अशी आहे. मंत्र-भागवतांतील दशम पूर्वार्धाची निराळी पोथी नसून सर्व दशम सरसकटच लिहिला आहे. यावरूनही येथें कृष्णविजयच अभिप्रेत आहे हें सिद्ध होतें. आतां हें पत्र द्रोणपर्व निमें लिहून झाल्यावरचें आहे. याचा काल शके १७०१ किंवा १७०२ असावा. यावरून १७०१-०२ पर्यंत मंत्रभागवत दशम अस्तित्वांत नव्हता असें निःसंशय म्हणतां येतें.

३५. याप्रमाणें महाभारतानंतरच्या पांच सहा वर्षांत मंत्रभागवत व हरिवंश यांची रचना झाली असें आपण पाहिलें. यापुढें १७१०-११ हीं वर्षे पंतांचीं काशीयात्रेंत गेलीं. पंत कार्तिक शु॥ १ शके १७१० रोजीं यात्रेस निघाले. त्याच्या पूर्वीचे दोन तीन महिने तयारींत सहज गेले असतील. पुढें काशीयात्रा करून सुमारें १ वर्ष ८ महिन्यांनीं म्हणजे १७१२ च्या वैशाख ज्येष्ठांत ते परत आले. हा एक वर्ष आठ महिन्यांचा काल म्हणजे त्यांच्या **काशीयात्रा प्रकरणांच्या** रचनेचा काल होय. या प्रकरणांची पद्यसंख्या सुमारें १००० इतकी असून हीं सर्व अत्यंत प्रेमळ व मधुर आहेत. संसारी पुरुष या नात्याचा पंतांचा स्वकीयांविषयींचा अनुपम प्रेमळ भाव यांत प्रकट झाला आहे. पंतांच्या संबंधाचीं, शेजार-पाजारचीं, गांवकऱ्यांचीं वगैरे अनेक नांवें त्यांत आलीं असल्यानें चरित्राच्या दृष्टीनेंही तीं मोठीं मनोरंजक झालीं आहेत.

३६. शक १७१२ नंतरची पंतांची कृति म्हणजे बहुधा **संकीर्ण रामायणें** हीच होय. संकीर्ण रामायणाची पोथी अगदीं अव्यवस्थित, गिचमिड, अस्थिर हातानें कशी तरी लिहिलेली आहे हें वर सांगितलेंच आहे. तिच्यांतील कांहीं भाग परलिखित असावा असेंही वाटतें. या सर्व लक्षणांवरून संकीर्ण रामा-

यणाची पोथी हें पंतांचें अगदीं वृद्धापकाळचें लिखाण असावें असें उघड दिसतें. व हीं सर्व रामायणें पंतांनीं उतारवयातच रचलेलीं होत याविषयीं पांगारकरां-सकट सर्व पंतकाव्यमर्मज्ञांचें ऐकमत्य आहे.

परंतु वाद आहे तो निराळ्याच गोष्टीविषयीं आहे. 'अष्टोत्तरशत' या संज्ञेनें प्रसिद्ध असलेलीं पंतांचीं रामायणें बरोबर १०८ भरत नाहींत ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. पराडकरांच्या ७, ८ व ९ या खंडांत एकंदर ९० रामायणें प्रसिद्ध झालीं आहेत. याशिवाय भारत, भागवत, हरिवंश व अवतारमाळा यांत असलेलीं पंतांच्या सांगीप्रमाणें धरलीं म्हणजे एकंदर उपलब्ध रामायणांची संख्या ( ९०+४ ) ९४ होते.* अर्थात् निदान १४ रामायणें कमी पडतात. या विलक्षण परिस्थितीमुळें पुढीलप्रमाणें विवेचनार्ह प्रश्न उपस्थित होतात.—१. पंतांनीं स्वतः संकल्प केल्याप्रमाणें १०८ रामायणें शेवटपर्यंत त्यांच्या हातून रचून झालीं होतीं कीं नाहीं ? २. रचून झालीं असल्यास त्यांपैकीं खरोखर उपलब्ध किती आहेत व त्यांचीं खरीं नांवें कोणतीं ? ३. बाकीचीं अनुपलब्ध जीं रामायणें राहतात त्यांच्या नांवांचा तरी पत्ता लागतो कीं नाहीं ? व प्रत्यक्ष १०८ रामायणें नाहींत परंतु १०८ रामायणांचीं नांवें तरी निःसंदेह उपलब्ध होतात किंवा नाहीं ?

पहिल्या प्रश्नाचें उत्तर आजपर्यंत सर्वांनीं अस्तिपक्षींच दिलें आहे. हीं रामायणें १०८ असल्याबद्दलचा पंतकालापासून चालत आलेला समज, 'अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथक्स तीं' अशी समकालीन राम बडव्याची स्पष्ट साक्ष व एकदां संकल्प केल्यावर तो पुरा करण्यासाठीं अवश्य असलेला पंतांचा दरक व धडाडी यांचा विचार करतां त्यांच्या हातून अष्टोत्तरशत रामायणें लिहून झालीं असावींत असेंच वाटतें. दुसऱ्या प्रश्नासंबंधानें देखील फारसा वाद होण्याचें कारण आतां राहिलेलें नाहीं. पंतकाव्यांच्या मूळ प्रतीबरहुकूम छापलेल्या आवृत्तींत ९४ ( किंवा खरीं ९२ ) रामायणें त्यांच्या खऱ्या नांवासकट छापलेलीं असल्यानें एकंदर ८८ रामायणेंच उपलब्ध आहेत, ( मो. च. पृ. ४४४ ) वगैरे पांगारकरादिकांचीं विधानें बादच समजावयास पाहिजेत. तिसऱ्या प्रश्नासंबंधीं मात्र मतभेदास जागा असून त्याविषयींच काय तो खरा वाद माजलेला आहे.

---

* यांपैकीं साररामायण व त्रुटित रामायण हीं अष्टोत्तरशत रामायणांत गणणें पंतांना संमत नसण्याचाही संभव आहे. ( पहा मागें पृ. २११. )

पांगारकरांनीं आपल्या मोरोपंत चरित्रांत १०८ रामायणांची जुळणी करून त्यांची नांवनिशीवार यादी दिली आहे. परंतु रा. पराडकर व श्री. न. चिं. केळकर यांनीं पांगारकरांच्या यादींतील कित्येक नांवांवर आक्षेप घेतले असून १०४ किंवा १०५ च नांवांचा पत्ता लागतो, बाकीचीं नांवें अजून अज्ञातच आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. पांगारकरांची याद सदोष आहे याबद्दल वाद नाहीं. तथापि त्यांनीं दिलेल्या पद्धतीनें नसला तरी इतर कोणत्याही रीतीनें १०८ नांवांचा पत्ता लागतच नाहीं हें म्हणणेंही थोडेसें चित्यच आहे.

संकीर्ण रामायणांच्या सुमारासच श्लोककेकावलि, कांहीं संतस्तवनपर प्रकरणें व देवतांचीं स्तोत्रें, अहल्योद्धार, ध्रुवाख्यान, अंबरीषाख्यान इत्यादि साकीबद्ध आख्यानें वगैरे रचना पंतांनीं केली असावी. त्यांचें शेवटचें काव्य केकावलि हें मानण्यांत येतें हें रास्तच आहे. परंतु याचा अर्थ, केकावलि रचल्यानंतर कवितेची एक ओळही त्यांनीं लिहिली नाहीं व लगेच ते मृत्युवश झाले असा नव्हे; व असें म्हणण्यास कांहीं आधारही नाहीं. याशिवाय दुर्वासाभिक्षा, गीतार्या हीं प्रकरणें शेवटचीं म्हणून पांगारकरांनीं वर्णिलीं आहेत. परंतु तीं तशीं दिसत नाहींत. प्रातप्रार्थना हें लहानसें स्तोत्र अगदीं अखेरचें असें पांगारकर मानतात. परंतु तसें मानण्यासही कांहीं प्रमाण दिसत नाहीं. प्रातप्रार्थनेची पंतलिखित पोथी उपलब्ध आहे, त्यावरून तें अगदीं अंतकाळचें स्तोत्र असावें या म्हणण्यास बाधच येतो. पंतांचें अगदीं शेवटचें काव्य कोणचें याविषयीं आपणास जरी कितीही कुतूहल वाटलें तरी उपलब्ध साधनांच्या सध्यांच्या स्थितींत तो प्रश्न अनिर्णीतच राहणार ही गोष्ट कबूल केली पाहिजे.

पंतकाव्यांच्या कालनिर्णयाचें विवरण येथें संपलें. या आतांपर्यंत केलेल्या विवेचनाचा सारांश काढून पंतांच्या काव्यरचनेचा आराखडा थोडक्यांत मांडाव-याचा झाल्यास तो पुढीलप्रमाणें मांडतां येईल.

[ १ ] **शके १६७४-१६८३; तारुण्यावस्थेंतला नवशिकेपणाचा काल, ( Juvenile period ).**—कुशलवचरित, ब्रह्मोत्तरखंड, कृष्णविजय अ. १–४९, प्रह्लादविजय, मदालसाख्यान, हरिश्चंद्राख्यान, सप्तशती, विनायकमाहात्म्य व कदाचित् साररामायण हीं काव्यें या कालांतलीं होत.

[ २ ] यापुढें **१६८३ ते १६९४** या दहा अकरा वर्षांचा अवधि म्हणजे पंतांच्या **प्रौढावस्थेचा काल** होय. यांतही दोन पोटविभाग पडतात. ( १ )

**१६८३ ते १६८८.** या कालाचें विशिष्ट लक्षण **श्लोकबद्ध रचना** हें होय.— कृष्णविजय अ० ५० ते ७९, सुदामचरित, भक्तभूषण, भस्मासुराख्यान ( गिरि-त्रमोक्ष ), भृगुचरित्र, कृष्णामाहात्म्य, व वरीचर्श नद्यांचीं व देवांचीं स्तोत्रें, वगैरे रचना या कालांतली होय. ( २ ) **१६८८ ते १६९४.** या कालांत **आर्या-वृत्ताचें प्राबल्य** कायमचें प्रस्थापित झालें. कृष्णविजय अ० ८०–९०, मंत्र-रामायण, आर्यामुक्तामाला, संशयरत्नावलि, साधुसत्कार, आर्याकेकावलि, नषक, नामार्या, नामरसायन, मारुतिस्तुति, सन्मनोरथराजि, प्रश्नोत्तरमाला हीं काव्यें या कालांतील असावींत. या शिवाय भीष्मभक्तिभाग्य, नारदाभ्युदय अवतारमाला, गीतार्या, वगैरे प्रकरणेंहीं बहुधा याच कालांतलीं होत. सीतागीत, सावित्रीगीत, व रुक्मिणीगीत हीं या कालाच्या अगदीं प्रारंभींचीं असावींत. हा काल म्हणजे पंतांच्या कवित्वशक्तीच्या बहराचा काळ होय.

[ ३ ] १६९५ ते १७०४–५. हा अकरा वर्षांचा काल पंतांच्या **परिनिष्ठि-ततेचा व परिपक्वतेचा** होय. समग्र महाभारत ही यांतील मुख्य रचना होय. शिवाय, अमृतमथन, वामनचरित हीं काव्यें या काळांत रचलीं गेलीं असण्याचा संभव वाटतो मंत्रभागवत दशमस्कंध याच कालाच्या शेवटीं रचला गेला असावा.

[ ४ ] १७०५ ते १७१६ **हा उतारवयाचा काल होय** –मंत्रभागवत, हरिवंश, काशीयात्रा प्रकरणें, कांहीं संतस्तवनप्रकरणें व देवांचीं स्तोत्रें, साकी-बद्ध आख्यानें, संकीर्ण रामायणें व श्लोककेकावलि ही या अवधींतील रचना होय.

याप्रमाणें पंतांच्या काव्यरचनेचा रचनाक्रमास धरून काढलेला आढावा वाचकांस सादर केला आहे. यांतील कांहीं ठिकाणें वादग्रस्त असलीं तरी निर्वि-वाद रीतीनें कायम होण्याजोगा असा भागही बराच आहे. कांहीं गोष्टी अशाही आहेत कीं, निर्णायक साधनाचे अभावीं त्यांत मतभेद हे थोडे बहुत रहावयाचेच. एकंदरीनें वरील वर्णनावरून पंतांच्या चाळीस वर्षांच्या वाङ्मयात्मक कामगिरीचा चित्रपट स्थूल मानानें जरी वाचकांच्या डोळ्यापुढें उभा राहिला तरी लेखकास कृतार्थता वाटेल.



## विभाग ६.

# पंतांची भाषाशुद्धि व पंतभाषेचें व्याकरण.

## [ १ ]

### पंतांची भाषाशुद्धि.

१. भाषाशुद्धीविषयीं पंतांची प्रख्याति आहे. त्यांच्या कवितेची भाषा अत्यंत व्याकरणशुद्ध असते असें सर्वत्र म्हटलें जातें. परंतु ही व्याकरणशुद्धि म्हणजे काय याचें मात्र स्पष्टीकरण कोठें केलेलें आढळत नाहीं. ही पंतकवितेंत आढळणारी व्याकरणशुद्धता म्हणजे संस्कृत वाङ्मयांत दिसून येणाऱ्या नियमबद्धतेसारखी नव्हे हें प्रथम लक्षांत ठेवलें पाहिजे. संस्कृत भाषा पाणिन्यादि मुनींच्या नियमांनीं जी एकदां जखडून टाकली आहे तिच्यांत रेसभरही फरक करण्याविषयीं कोणाची मात्रा चालण्याजोगी नाहीं. सर्व रूपें, सर्व प्रयोग त्यांनीं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें तंतोतंत झाले पाहिजेत. त्यांत येवढीशी कोठें ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार, संधि, यांसंबंधींची चूक झाली कीं ' अपाणिनीय ' प्रयोग केला म्हणून सर्व जग त्याच्यावर उठलेंच! कालिदासानें

तं पातयां प्रथममास पपात पश्चात् ।

असा एक प्रयोग केला कीं, अशुद्ध म्हणून लगेच त्याच्यावर शिक्का बसलाच! तेव्हां अशा तऱ्हेची कानामात्रेंत देखील फरक न करूं देणारी व्याकरणबद्धता पंतांच्या ग्रंथांत आढळून येत नाहीं हें ध्यानांत बाळगणें जरूर आहे. आम्ही गद्यांत जीं रूपें वापरतों व शुद्ध मानतों तशींच व तेवढींच रूपें काव्यांत योजिलीं जातात असें नाहीं. उदाहरणार्थ—' कवीच्या रीतीला नियम घालून उपयोग नाहीं ' असें वाक्य आपण गद्यांत लिहितों; परंतु कवि छंदासाठीं, यमकासाठीं, किंबहुना स्वतःच्या मर्जीखातरही याच्यांत नानातऱ्हेचे बदल करूं शकतील. ' कवीच्या ' या शब्दाचें रूप ' कवीचिया ' असें तर काव्यांत करतीलच; परंतु ' कविच्या ', ' कविचिया ' अशीं गद्यांत अगदीं अशुद्ध ठरणारीं रूपेंही पद्यांत कवि योजूं शकतात. त्याचप्रमाणें ' रीतिला ' असें अशुद्ध रूपही कवितेंत शुद्ध ठरतें. ' घालून ' या शब्दाचीं रूपें तर अनंत परींनीं करण्यांत येतात:—

' घालुनि, ' ' घालुन, ' ' घालूनी, ' ' घालुनियां, ' ' घालूनीया, ' इ० इ०. त्याचप्रमाणें कवि, गुरु, परंतु, या ऱ्हस्वान्त शब्दांचीं रूपें कवी, गुरू, परंतू अशीं दीर्घान्त, व पाणी, नदी यांचीं पाणि, नदि अशीं ऱ्हस्वान्त रूपेंही कवि जरूरी असल्यास क्वचित् ठिकाणीं करितात. कवींना देण्यांत आलेल्या या सवलतींचा स्थूलमानानें निष्कर्ष काढला तर पुढील नियम बसवितां येतील असें वाटतें.--

१. ( ऱ्हस्व अथवा दीर्घ ) इकारान्त व उकारान्त प्रातिपदिकांचे अंत्य स्वर काव्यांत वाटेल तसे, ऱ्हस्व अथवा दीर्घ लिहावे. जसे—गुरू, कवी, परंतू; पाणि नदि, भाजि, इ०

२. प्रत्ययगत किंवा सामान्यरूपगत इकार व उकार हे असेच विकल्पानें ऱ्हस्व अगर दीर्घ लिहावे. जसें—रामाहुन, घरिं, कविचा, त्याहिं, इ०

३. क्रियापदें व धातुसाधितें यांतील मूळ धातु कायम ठेवून प्रत्ययांशांतील इकार उकार विकल्पानें ऱ्हस्व वा दीर्घ लिहावे. जसें—करीतो, मारिल, मारिलि, करुन इ०. परंतु नीजला, भीजला, चूकला अशीं रूपें करणें मात्र या नियमाप्रमाणें बरोबर नव्हे. तीं अशुद्धच मानलीं पाहिजेत.

४. भूतकालीन क्रियापदांच्या प्रत्ययापूर्वीच्या 'अ'चा क्वचित् एकार करण्यांत येतो. जसें—निजला, निजेला; कोमला, कोमेला.

५. नामें, विशेषणें, क्रियापदें व धातुसाधितें यांच्या प्रत्ययांशांतील आच्या ठिकाणीं अय, यच्या ठिकाणीं अय किंवा इय, आणि ईच्या ठिकाणीं इय असे आदेश कांहीं ठिकाणीं करण्यांत येतात. जसें—राजाच्या, राजयाच्या; त्याच्या, तयाचया अगर तयाचिया; कवीच्या, कवीचिया; मारिला, मारियला; करुनी, करुनिया इ०. (प्रत्ययांश=शब्दाचें मूळरूप वगळलें असतां बाकी राहणारा अंश.)

वर सांगितलेले सर्व विकार मूळशब्दांच्या अंतरंगास कधींही होत नसून अंत्य स्वरास व प्रत्ययांशासच होतात हें लक्षांत घेण्याजोगें आहे.

वरील नियमांत दाखल केलेल्या सवलती भाषाशास्त्रज्ञांनीं उघडपणानें कवींना दिल्या आहेत व सर्व कवीही त्यांचा सररास उपयोग करीत आहेत. त्यांत कांहीं अशुद्धता आहे असें कोणी मानीत नाहीं. अर्थातच पंतांनींही या सवलतींचा फायदा आपल्या काव्यांत यथास्थित घेतला आहे. अशीं उदाहरणें शेंकडों, हजारों देतां येतील; परंतु गद्यांत अशुद्ध वाटणारीं रूपें पद्यांत कशीं योग्य

वाटतात हे दर्शविण्याकरितांच दोन चारच उदाहरणे येथें दिलीं आहेत—' **है** देघे **भाउ** दया **करितिल** ' कृ. वि. ३९. २१. ' **मनिं आणिल** रतिपा ' कृ. वि. २९. २१. ' **जेंवि शुद्ध रवी** ' मं. भा. १०, ८४६. ' वाहे व्रजपथ-धूळी... **स्वामिचीं** पदें अमळें ' मं. भा. १०. ४८३. ' ऐसें ऐकोनि **तीचें** कृ. वि. ५८. ११. ' आणितों **विष्णुला** ' कृ. वि. ५८. ११. ' **तूझा** ' कृ. वि. ८०. ७५. ' **भाजि** वज्रपशुपांचीहि सेविली ' कृ. वि. ८१. १९. ' **सुरगुरू** सखा पणसाचा ' कृ. वि. ४८. ४१. ' **प्रीतिचि** तो **बेडि** सोडवि ' कृ. वि. ४२. ९. ' **सुस्वामिनें** ' रामप्रार्थना ४. ६० ६०.

३. इतर कवींनीं घेतलेल्या सवलतींचा अशा रीतीनें पंतही जर फायदा घेतात तर मग त्यांचा व्याकरणशुद्धीबद्दलचा कटाक्ष तो कोठें उरला ? याचें उत्तर हेंच कीं पंत येवढ्याच सर्वसंमत सवलती घेऊन थांबतात तर इतर वामनपंडितादि कवि कोणतीच मर्यादा न मानितां केवळ मनास येतील तसे प्रयोग करतात. वर ज्या सवलती म्हणून सांगितल्या आहेत त्यांपैकीं कांहींचा फायदा पंत अगदींच क्वचित् घेतात. उदाहरणार्थ; ' पाणी, भाजी, रामाची ' अशा दीर्घ ईकारांत शब्दांना ऱ्हस्वांत केलेलें पंतकवितेंत फारच क्वचित् दिसून येतें; ' नदी, वाणी ' सारख्या अगदीं संस्कृत शब्दांना तर नाहींच. तथापि फार फार पुढें गेले तर पंत याही सवलतींचा फायदा घेतील इतकें कबूल करितां येईल परंतु इतर कवींना या सर्व सवलती म्हणजे कांहींच नव्हेत ! त्यांच्या स्वैर विहारास येथपासून नुकता प्रारंभ होतो. गुरु हा शब्द घेतला तर वर दिलेल्या नियमां-प्रमाणें त्याचें ' गुरुला ' असें रूप होऊं शकेल; परंतु 'गूरुला' असें करणें केवळ अशुद्ध होय. परंतु वामनपंडितादि कवि तसें बेलाशक करतील. उदाहरणार्थ—

असा मी त्या मातें **पुनित** करिशी तूं जननिये । वामन.
सदा सर्वदा देव **सन्नीध** आहे । रामदास.
**प्रपंचीक** नाहीं जयातें उपाधी । रामदास.
प्रियाची कथा **प्रीय** दामोदरासी । वामन, विराटपर्व ७. ५
सभा आड जेंवी **शशीमूख** राहो । वामन, विराटपर्व ७. ९.

याशिवाय प्रतीमा, संचीत, शीकवीलें, सूचवीलें वगैरे कित्येक अपप्रयोग वामनांच्या काव्यांत आढळतात.

कोणताही तत्सम संस्कृत शब्द वापरतांना तो संस्कृतांतल्या त्याच्या शुद्ध

स्वरूपांतच नेहमीं वापरला पाहिजे. पंतांचा याविषयीं नेहमीं कटाक्ष असलेला आढळतो व तें अगदीं योग्य आहे यांत शंका नाहीं. परंतु वामनपंडित व इतर कवि याविषयीं अगदीं बेफिकीर असलेले दिसून येतात. उदाहरणार्थ—

कैकेयीच्या ये गृहा **सानुरागें** । वामन.

बस **तूं मौन्यपणें** अथवा उगा । वामन.

घाली नेणुनि **शास्त्रविद्ध पुरुषा** उच्छिष्ट देतां बळें । आनंदतनय.

यांतील अधोरेखित पदें व्याकरणदृष्ट्या चुकीचीं आहेत. विशेषतः समासांत तर या कवींचा निष्काळजीपणा फारच प्रत्ययास येतो. समासांतलीं अंतर्गत पदें ऱ्हस्वदीर्घांच्या दृष्टीनें बिनचूक असून सर्व समास संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीनें शुद्ध असाच बनविला पाहिजे. परंतु या कवींनीं ऱ्हस्वदीर्घांची व अनुस्वार विसर्गांची बिलकुल तमा बाळगिलेली नसून निरंकुशपणें वाटेल तसे समास बनविले आहेत. ' धनुविद्या ', ' विधीअंड ', ' हरिगुणअनुवादी ', रवीचंद्र ', ' तमारी ' ( तमः + अरि ), ' माद्रिनंदन, ' ' योगीवरा, ' ' चमुउदधिमथोनि,' ' रिपूकुळहुताशन, ' ' शशीमुख, ' हीं वामनपंडितांचें विराटपर्व थोडेंसें वरवर चाळून त्यांत आढळलेलीं उदाहरणें दिलीं आहेत. यावरून त्याच्या काव्यांत असल्या अपप्रयोगांची किती गर्दी उडाली असेल याची कांहींशी कल्पना वाचकांस येईल. वामनपंडितांचे अनुयायी साम्राज्य वामन, अनंत, आनंदतनय वगैरे कवि यांचाही खाक्या अशाच तऱ्हेचा दिसून येतो. रामदासांच्या विषयीं तर बोलावयासच नको.

४. मोरोपंतांची कविता या सर्व प्रकारच्या अशुद्धतादोषांपासून अलिप्त आहे. ' शास्त्रपूतां वदेद्वाचम् ' या वचनास अनुसरून त्यांनीं आपली वाचा सर्वतोपरी शुद्ध ठेविली आहे याबद्दल त्यांस धन्यवाद देणें उचित आहे कवींच्या सवलतींचे जे चार पांच नियम सांगितले आहेत त्यांच्या बाहेर जाऊन मर्जीस येतील तशीं रूपें त्यांनीं कधीं केलीं नाहींत. इतकेंच नव्हे तर त्या नियमांचाही आश्रय शक्य तितक्या थोड्या ठिकाणीं त्यांनीं केला आहे. संस्कृतांतून शब्द घेतांना व समास बनवतांना व्याकरणनियमांवरून रेसभरही आपलें लक्ष त्यांनीं दूर केलें नसून जणूं काय आपण संस्कृतांतच काव्य रचतों आहोंत अशा जाणिवेनें प्रत्येक शब्द त्यांनीं जोखून वापरला आहे. या त्यांच्या भाषाशुद्धी· विषयींच्या दक्षतेबद्दल आपण महाराष्ट्रीयांनीं त्यांचे सदैव ऋणी असलें पाहिजे.

कारण सध्यां निर्माण होणाऱ्या उच्च दर्जाच्या वाङ्मयांत भाषेची जी प्रशंसनीय शुद्धता आढळून येते तिचा उगम मोरोपंतांपासूनच झाला आहे. पंतांनंतरचे कवि रामजोशी यांच्या कवनांतही भाषाशुद्धि चांगली आढळते. त्यानंतर अर्वाचीन वाङ्मयाचा पाया घालणारे अव्वल इंग्रजींतले ग्रंथकार दादोबा पांडुरंग व परशुरामपंत गोडबोले हे पंतांच्या ग्रंथांचे मोठेच चहाते व अभ्यासक असून त्यांच्या ठायीं दिसून येणारी भाषाशुद्धीची चाड पंतकाव्यांच्या अवलोकनानेंच उत्पन्न झालेली होती. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचाही पंतकवितेवर चांगला व्यासंग होता व विष्णुशास्त्री हे तर पंतांचे मोठेच अभिमानी होते. भाषाशुद्धीच्या बाबतींत या दोघांवरही पंतकवितेचा परिणाम झालेला आहे.

५. पंतकाव्यांतही फारच क्वचित्, कोठें तरी एखादा अपप्रयोग आढळून येतो, नाहीं असें नाहीं. असे अपाणिनीय शब्दप्रयोग इतके विरळ आढळतात कीं ते जमेस धरण्याच्या मुळींच लायकीचे नाहींत. तथापि ते आढळतात ही गोष्ट मात्र नमूद करून ठेवणें अवश्य आहे.

(१) देहप्राण **मनमर्तास्वजनस्त्रीसुतधनादिही** प्रिय गमती । कृ. वि.२७. २६. ( २ ) बहुरात्री **अपगेला** । कृ. वि. २८. १. ( ३ ) ' न सुतसुखरुचिद **धिम** मीं ' कृष्ण म्हणे । कृ. वि. ४५. २. (४) मी दासी तुझी **शीक्षिता** । कृ. वि. ६५. ३६. (५) मरती घडींत **शतशा** । मं. भा. ९. १५५. (६) तव वक्त्र**निशीन** कोमला । कुशलवचरित ८-१६. ( ७ ) चूकले । निं. पं ४ एवढींच उदाहरणें आमच्या आढळांत आलीं. आणखीही दहापंधरा ठिकाणें अशीं आढळतील असें मानलें तरी पंतांच्या काव्यविस्ताराच्या मानानें तीं कांहींच नव्हेत: हें उघड आहे.

पंतांच्या भाषेतील आणखी कांहीं आक्षेपार्ह वाटणाऱ्या गोष्टी म्हणजे संकरसमास, नामधातु, संस्कृताच्या धर्तीवरचे वाक्यप्रयोग, यांची चर्चा येथें करीत नाहीं. कारण हे अपप्रयोग नसून त्यांनीं जाणून बुजून भाषेमध्यें प्रचलित करण्यासाठीं आणलेले नवीन प्रकार आहेत. पुढें यथास्थल त्यांचा विचार होईलच.

६. भाषाशुद्धीचें पहिलें व मुख्य अंग जी शब्दशुद्धि तिच्याविषयीं आतांपर्यंत विचार झाला. दुसरें अंग वाक्यशुद्धि हें होय. प्रत्येक वाक्य व्याकरणाच्या दृष्टीनें बरोबर असलें व त्याचा सुसंगत अर्थ होत असला म्हणजे तें वाक्य शुद्ध होय.

याच्या उलट स्थिति ज्या वाक्यांत असेल तें वाक्य अशुद्ध होय. ज्या लेखकाच्या भाषेंत अशीं अशुद्ध वाक्यें आढळतात त्याची भाषा वाक्यरचनेच्या बाबतींत अशुद्ध गणली पाहिजे. ही वाक्यशुद्धि आमच्या जन्या कवींच्या काव्यांत चांगली आढळते. शब्दांच्या शुद्धीच्या बाबतींत अत्यंत निष्काळजी असणारे वामनपंडित व त्यांच्या सांप्रदायांतील कवि यांच्या कवितेंत वाक्यरचनेच्या बाबतींत तितकें शैथिल्य आढळत नाहीं, ही लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. वाक्यरचनेच्या बाबतींत ज्यांना दोष दिला पाहिजे असे कवि म्हणजे ओंवीबद्ध रचना करणारे तिसऱ्या चौथ्या प्रतीचे कवि होत. शुभानंद वगैरे महाभारताच्या कांहीं पर्वांवर रचना करणारे कवि, त्याचप्रमाणें गुरुचरित्रकार सरस्वती गंगाधर यांच्या कवितेंत ही रचनेची अशुद्धता बरीच दिसून येते. पंतांची कविता याही बाबतींत अर्थात् निष्कलंक आहे हें सांगावयास नको. फार क्वचित् ठिकाणीं एखाद्या वाक्याची रचना मराठी व्याकरणनियमास थोडीशी सोडून केलेली आढळते. पुढें वाक्यप्रयोगाचा विचार करतांना अशा स्थलांचा उल्लेख केला आहे.

## [ २ ]

## पंतभाषेचें व्याकरणः स्वरूपदिग्दर्शन.

७. आतां पंतभाषेच्या व्याकरणाचें थोडेंसें दिग्दर्शन करावयाचें. येथें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, हें व्याकरणविषयक विवेचन पंतकाव्याच्या भाषेसच फक्त लागू पडणारें आहे. कोणत्याही काळीं सामान्य जनसमाजाच्या भाषेपेक्षां वाङ्मयाची भाषा जराशी निराळी व कृत्रिम असते, व वाङ्मयांतही गद्यापेक्षां पद्याची भाषा अधिक कृत्रिम असते. तेव्हां पुढील विवेचन पंतकाव्याच्या भाषेस व तिजमध्यें त्यावेळच्या सामान्य भाषेचें जितपत प्रतिबिंब पडलें असेल तेवढ्यासच लागू पडणारें आहे असें समजावें. पंतांचा काळ म्हणजे सुमारें दीडशें वर्षांपूर्वींचा, मराठी भाषेच्या उत्कर्षाचा काळ होय. या काळच्या मराठी भाषेचें साग्रपणें विवेचन करावयाचें झाल्यास त्यास भरपूर सामग्री उपलब्ध आहे, व तसा ग्रंथ अवश्य व्हावयासही पाहिजे. येथें फक्त पंतकाव्याच्या भाषेचें ऐतिहासिक दृष्टीनें शास्त्रीय विवरण करावयाचें आहे.

८. कोणत्याही भाषेच्या व्याकरणाचे मुख्य दोन विभाग पडतात:—१ शब्दसिद्धि, २ वाक्यसिद्धि. शब्दसिद्धि म्हणजे नाम, विशेषण, आख्यात, अव्यय

इत्यादि जातींच्या शब्दांचीं निरनिराळीं रूपें कशीं तयार करावयाचीं यासंबंधींचा विचार होय. वाक्यसिद्धि म्हणजे या तयार झालेल्या शब्दांचा वाक्यांत प्रयोग कसा करावयाचा याविषयींचा विचार होय. ( अर्थात्, विभक्तींचे अर्थ, कारक व क्रियापदांचे प्रयोग या सर्वांचा या दुसऱ्या विभागांत समावेश होतो. ) शब्दांच्या मुख्य जाती दोन-१ प्रातिपदिक व २ आख्यात. तेव्हां प्रथम या दोन्ही जातींच्या शब्दांच्या रूपसिद्धीविषयीं विचार करून मग वाक्यसिद्धी-संबंधानें उद्भूत होणाऱ्या कांहीं प्रश्नांचा विचार करून हें विवेचन संपवून टाकूं.

## ( १ ) प्रातिपदिक.

९. **नाम.** नाम, विशेषण, अव्यय या सर्वांचा '**प्रातिपदिक**' या संज्ञेमध्यें अंतर्भाव होतो. पैकीं नामांचा* प्रथम विचार करूं. नामांच्या रूपांविषयीं विचार करावयाचा म्हणजे अर्थात् विभक्तींचेंच विवेचन करावयाचें. तर तें आतां शक्य तितकें थोडक्यांत येथें करण्याचा यत्न करूं. मराठी भाषेंत विभक्ति किती व कोणत्या मानाव्या याविषयीं भाषाशास्त्रज्ञांमध्यें बराच मतभेद आहे. विशेषतः प्रथमा व द्वितीया आणि द्वितीया व चतुर्थी यांच्या परस्पर संबंधामध्यें तर फारच घोटाळा व मतभेदही आहे.येथें वादग्रस्त प्रश्नांच्या भानगडींत न पडतां साधारण-पणें सर्वांस समजेल व सर्व मतांच्या लोकांस मान्य होईल असें विवेचन करा-वयाचें असल्यामुळें जेवढ्या विभक्तींचीं भिन्न रूपें मराठींत होत असलेलीं स्पष्ट दिसतात तेवढ्यांचाच पुढें निर्देश केला आहे. व सर्व व्याकरणकारांनीं नमूद केलेले प्रत्ययही प्रत्येक विभक्तीच्या पुढें दिले आहेत.

| विभक्ति. | प्रत्यय. |
|---|---|
| प्रथमा | ... ... ... ... ... ... |
| तृतीया ... | नें, ऐं, शीं ( एकवचन ); नीं, हीं, ईं, शीं ( अ. व. ). |
| चतुर्थी ( अगर द्वितीया ) | स, ला, तें ( ए. व. ); स, ला, ना, तें ( अ. व. ). |
| पंचमी ... ... | ऊन, हून ( ए. व. ); ऊन, हून, ( अ. व. ). |
| षष्ठी ... ... | ... च [ चा, ची, चें ]; च [ चा, ची, चें ]. |
| सप्तमी ... ... | त, ई, आं, ( ए. व. ); त, ई, आं (अ. व.). |

शब्दांच्या रूपास कवितेमध्यें होणारी विकृति ( उदा०, रामाहुनि रामासी येथील इकार ) सोडून दिल्यास नामांचीं विभक्तिरूपें पंतभाषेंत सध्यांच्याप्रमाणेंच होत

* नामांमध्येंच सर्वनामांचाही अर्थात् अंतर्भाव केला आहे.

असत असें दिसून येतें. ज्ञानेश्वरकालीं अकारांत प्रातिपदिकांच्या प्रथमेच्या एकवचनाच्या अंतीं दिसून येणारा उकार (व ओकार ) पंतकालीं अजीबात नाहींसा झालेला दिसून येतो. हा उकार ज्ञानेश्वरकालीं सर्वत्र प्रचारांत होता. एकनाथकालापर्यंत त्याचा प्रचार चांगला होता. पुढें मुक्तेश्वरांच्या काळीं तो बराच कमी होऊन रामदासवामनांच्या वेळेस बहुधा नाहींसाच झाला होता. ओंकार मात्र क्वचित् दृष्टीस पडत असे. अर्थात् पंतांच्या भाषेंत हा उकार व ओंकार आढळत नाहीं. द्वितीयेचे किंवा चतुर्थीचे प्रत्यय दादोप्रोक्त स, ला, तें व स, का, ना, तें हेच होते. त्याचप्रमाणें दादोबांनीं सांगितलेले, तृतीयेचे प्रत्यय नें, एं, शीं; नीं, हीं, ईं, शीं; पंचमीचे ऊन, हून; षष्ठीचा प्रत्यय च ( चा, ची चें ) व सप्तमीचे त, ई, आं हे सर्व प्रत्यय पंतांच्या काव्यांत सररास आढळून येतात. किंबहुना दादोप्रभृति व्याकरणकारांनीं सांगितलेले हे प्रत्यय चालू भाषेवरून सांगण्याचे ऐवजीं पंत व तत्कालीन कवींच्या भाषेवरूनच सांगितलेले दिसतात. चतुर्थीचा तें हा प्रत्यय त्याचप्रमाणें तृतीयेचे एं, हीं हे प्रत्यय, सप्तमीचे ई, आं हे प्रत्यय चालू भाषेंत प्रचलित नसून पंतभाषेंत मात्र सररास उपयोजिलेले दिसून येतात. उदाहरणार्थ ' रामास-रामाला बोलाव ' असें आपण म्हणूं पण 'रामातें बोलाव' असें म्हणणार अगर लिहिणार नाहीं. सध्यांच्या कवितेच्या भाषेमधून सुद्धां ' तें ' हा प्रत्यय जात चालला आहे. परंतु पंतकालीं गद्यांत सुद्धां तो सररास वापरला जात असे. त्याचप्रमाणें तृतीयेचे एं व हीं हे अनुक्रमें एकवचन व अनेकवचन यांचे प्रत्यय व सप्तमीचे ई व आं हे प्रत्यय सध्यां प्रचारांत नाहींत. ' रामें-रामांहीं काम केलें ' असें सध्यां आपण म्हणत नाहीं.' घरीं गेला ' 'गावीं गेला ' अशा कांहीं ठिकाणीं आपण ई हा प्रत्यय योजितों तथापि तो सररास सर्व शब्दांस लाविला जात नाहीं. उदा० ' तो दुकानीं गेला, ' ' रस्तीं गर्दी आहे ' असें आपण म्हणत नाहीं. पंतांच्या काव्यांत हे सर्व प्रत्यय अनिर्बंधपणें वापरलेले दिसून येतात.

> गळां पडति ज्यांचिया तवगुणैकदेशभ्रमें ।
> तिहीं तुजचि दावितां भजति बा तुला संभ्रमें ॥

यांत तृतीयेचे एं व हीं, आणि सप्तमीचा आं, या प्रत्ययांचीं उदाहरणें आहेत. दादोबांनीं तृतीयेच्या अनेकवचनाचा ईं हा एक प्रत्यय सांगितला आहे. तो पंतकाव्यांतही फारच क्वचित् उपयोजिलेला आढळतो. त्याचें एक उदाहरण—

अर्नी न ज्ञात श्रीगुरुगुरुचिया काय करर्नी । कृ. वि.७८.८.
अर्नी–जनांनीं. कवर्नी ही ईकारांत सप्तमी आहे.

तेव्हां चतुर्थी-तें; तृतीया–एं, हीं, शीं; सप्तमी–ई, आं; हे सध्यां प्रचारांतून बहुतांशीं जात चाललेले प्रत्यय पंतकालीं, विशेषतः पंतकाव्यांत, सर्रास वापरलेले दिसून येतात; व तृतीया अनेकवचनाचा ई हा प्रत्यय अगदीं विरळ आढळतो–असा एकंदरीनें निष्कर्ष विभक्तिप्रत्ययांविषयीं सांगता येईल.

वरील प्रत्ययांपैकीं ' स ' यास शेवटीं इकार (ऱ्हस्व अथवा दीर्घ) जोडण्याची पंतांची व सर्वच कवींची पद्धत आहे. ' ऊन, हून ' हे प्रत्यय लागून होणाऱ्या शब्दांसही हा इकार जोडण्यांत यतो. उदा०—' गळती नेत्रांतूनि प्रेमाश्रुजळें फुलें शिराहूनि । ' मं. भा. १०,१६९. या ' ऊन, हून ' प्रत्ययांची व्याप्ति मराठींत फारच मोठी आहे. ते नामांस, विशेषणांस, व धातुसाधितांसही लागतात. ते नामास लाविले म्हणजे त्यांचा पंचमीसारखा अर्थ होतो म्हणून दादोबांनीं त्यांना पंचमीचे प्रत्यय मानिलें आहे. असो. त्यांची विशेष चर्चा येथें करितां येत नाहीं.

वर सांगितलेला इकार ' स ' प्रत्ययास क्वचित् तत्कालीन गद्यांतही लाविलेला दिसून येतो. 'स्वामीचे सेवेसी' हें त्या प्रचाराचें, सध्यांपर्यंत टिकून राहिलेलें, पत्रांच्या मायन्यांतलें एक प्रसिद्ध उदाहरण होय.

खालीं पंतांच्या व विठोबा ताहराबादकरांच्या पत्रांतले दोन उतारे दिले आहेत, त्यावरून वर सांगितलेले सध्यांच्या गद्यांत प्रचारांत नसलेले प्रत्यय त्यावेळीं कसे प्रचारांत होते हें दिसून येईल—' भवानीमनुष्याहातीं पुस्तक पाठविलें ( तें ) पावोन समाधान झालें...ती ( आज्ञा ) मस्तकीं धरून यावयाच्या उद्योगातें करितों....श्रीमंत जों गृहीं असतात पर्जन्यकाळीं तों आपलाही समाज श्रीक्षेत्रीं...यांस सोडून यावें तरी यांच्या चित्तानुकूलतेकरून अशास तुमच्या कृपेनें घडेल तें पहावें. '–पंतांचें पत्र. ( मो. ब पृ. १३० ). ' स्वामीच्या शेवेशीं...स्वामीच्या आशीर्वादें सर्व मंडळी सुखरूप असे. यानंतर श्रीगुरूंहीं निरंतर कृपा करून पत्रद्वारें सेवकांस संतोषवीत असावें... म्यां ते पायांसी विनंती केली होती कीं...इ० इ० '—ताहराबादकरांचें पत्र. ( मो. ब. पृ. १४१ ).

१०. सध्यांच्या प्रचाराहून निराळीं अशीं स्त्रीलिंगी नामांचीं प्रथमेच्या

अनेकवचनाचीं रूपें कधीं कधीं पंतकाव्यांत दृष्टोत्पत्तीस येतात. 'स्त्री' या शब्दाचें अनेक वचन 'स्त्रिया' असें न करितां 'स्त्री' असेंच पंतांनीं कित्येक ठिकाणीं केलें आहे. उदा०—'स्त्री म्हणती अक्रूरा तुझें तळपट हो।' कृ. वि. ३९. १९. 'स्त्रीही हांसति।' कृ. वि. ७५. १०. त्याचप्रमाणें शिप याचें 'शिपा' असें अनेकवचन न करितां 'शिप्या' असेंही केलेलें आढळतें.—'त्या शिप्या न तो सावडी।' कृ. वि. ७४. २६. 'स्त्री, सासू' वगैरे नामांचीं इतर विभक्तींचीं रूपेंही सामान्यरूप न करितां 'स्त्रींत' 'सासूनें' अशीं केलेलीं पंतकाव्यांत कोठें कोठें दिसून येतात. उ०—'सकळा स्त्रींत बरी' कृ. वि. ३०. ४८. सप्तमीचा ई हा प्रत्यय स्त्रीलिंगी आकारान्त नामांना कधीं लागत नाहीं. परंतु तो 'रसा' (पृथ्वी) या शब्दास पंतांनीं एकदां लावला आहे.—'सेवाया योग्य सुरस तो रसिं कानीं' कृ. वि. १२. २. हें 'रसिं' असें रूप वृत्ताकरितां व यमकाकरितां पंतांनीं मुद्दाम केलें आहे हें उघड आहे. याचप्रमाणें वृत्तयमकांच्या जरूरीकरितां आणखीही कोठें कोठें नियमबाह्य रूपें पंतांनीं केलेलीं दिसून येतात. उदा०—वैरिला (वैऱ्याला) कृ वि. ७८. ९. त्यांहीं, ज्यांहीं यांच्याबद्दल 'तिहीं' 'जिहीं,' तसेंच वासरा याच्याबद्दल 'वासरुवा' (मं. भा. ४. ११७) अशीं रूपें कोठें कोठें आढळतात. अशा रूपांत बहुधा सामान्यरूप प्रचलित पद्धतीहून कांहीं भिन्न तऱ्हेनें केलेलें आढळतें. वरील उदाहरणांत 'वैऱ्या' 'त्या' असें सामान्यरूप व्हायचें त्या ऐवजीं 'वैरि' 'ति' असें केलें आहे. सामान्य भाषेच्या दृष्टीनें अशीं रूपें चूकच होत. कवितेंत देखील अशीं रूपें सहसा योजूं नयेत. पंतांनींही असे प्रकार अगदीं विरळ, नडल्या ठिकाणींच केले आहेत.

११. त्याला, त्याचा याबद्दल तयाला, तयाचा; राजानें, भरतवंशानें यांबद्दल राजयानें, भरतवंशियानें (मं. भा. ९. १६८); प्याला, भ्याला यांबद्दल पियाला, भियाला—अशीं रूपें करण्याचें कवींना सर्वांच्या संमतीनेंच अनुज्ञापत्र मिळालेलें आहे. अर्थात् पंतांनीं अशीं रूपें मर्जीनुरूप सर्वत्र केलीं आहेत हें सांगावयास नको. याशिवाय रूपें सध्यांच्या प्रचारांतलीं तींच, परंतु लिहिण्याची अगर उच्चाराची पद्धत थोडीशी निराळी असेंही पुष्कळ शब्दांच्या बाबतींत दृष्टीस पडतें. स्त्रीलिंगी 'ती, ही'च्या ऐवजीं 'ते, हे' अशीं रूपें करण्याचा प्रघात फार जुना आहे. अजूनही त्याचा अवशेष 'कळावें हे विनंती' या, पत्रांच्या समाप्तिदर्शक माय-

ण्यांत दिसून येतो. पंतांच्या काव्यांतही हा प्रकार मधून मधून दिसून येतोच. उदा०—' उक्ति मनिं धरी गा हे । ' मं. भा. १०. ८९. ' होहि युक्ति बरी । ' मं. भा. १०. ९५. ' मूर्ति गळा ते जाची, जे खनि अनलादिकाखिला तेजाची ' कृ. वि. ११. २५. याचप्रमाणें ज्या, च्या या वर्णांच्या जागीं शब्दांच्या रूपांत जा, चा असें लिहिण्याची प्रवृत्ति पंतांच्या काव्यांत, सर्वत्र नाहीं, परंतु कांहीं ठिकाणीं दिसून येते. उदा०—' भव्य विषय जांत ' मं. भा. ३. १०२. 'सुधर्मेचा ठायीं ' । कृ. वि. ७५. १७. परंतु कित्येक स्थळीं याच्या उलट, ' जा, चा ' यांच्या ऐवजीं ज्या, च्या लिहिण्याची पद्धतही पंतांनीं अवलंबिलेली दिसते.—'घोकवितां च्यार मास' मं भा. ५. ४२. ' तो चित्रकेतु गा राज्या ! ' मं. भा. ६. १८४. हीं रूपें म्हणजे लेखनाच्या निराळ्या पद्धतीमुळें थोडींशीं भिन्न वाटणारीं अशीं होत. अशी लेखनाच्या पद्धतीची भिन्नता आणखीही कित्येक बाबतींत दिसून येते. श बद्दल स, ( सिकविले, मासी, सेत इ० ), ळ बद्दल ळ ( बळ, खळ, मळ इ० ), असे कित्येक वर्ग बदलून लिहिण्याची पंतांची चाल आहे. असो. पंतांच्या लेखनपद्धतीविषयीं येथें विशेष विस्तार करण्याचा उद्देश नाहीं.

१२. चतुर्थीचे प्रत्यय न लावतां नुसतें नामाचें सामान्यरूप योजून चतुर्थी विभक्तीचें काम भागविण्याची आणखी एक सवलत कवींस देण्यांत आलेली आहे. इतर सर्व कवींप्रमाणें पंतांनींही या सवलतीचा आपल्या काव्यांत उपयोग करून घेतला आहेच उदाहरणार्थ —' वासरूवाहि न पाजी ' मं. भा. ४. ११७. ' भगवंत शंखचूडा मारुनि तन्मूर्धरत्न रामातें । अर्पी ' मं. भा. १०. ४२१. ' विद्वत्संन्यासिवेषा नट धरि ' कृ. वि. ७८ १८. 'प्रभु दयमान सहाय स्वजना' कृ वि.४९.२३. अशीं उदाहरणें पंतकाव्यांतून शेकडों काढून देतां येतील हें उघड आहे. सामान्यरूपाच्या या प्रचारासंबंधानें एक महत्त्वाची गोष्ट मात्र लक्षांत ठेवण्याजोगी आहे. पूर्वीच्या एकनाथ, मुक्तेश्वर वगैरेंच्या ग्रंथांत प्रातिपदिकांचें सामान्यरूप (व पुष्कळ वेळां मूळरूपसुद्धां) कोणच्या वाटेल त्या विभक्तीच्या अर्थी वाक्यांत योजलेलें आढळतें. पुढें संस्कृतशब्दप्राचुर्याची चर्चा करितांना मुक्तेश्वराच्या कवितेचें जें अवतरण घेतलें आहे ( पहा, विभाग ७ परिच्छेद ८ ) त्यांत 'उदधी डोळतां मंदरागिरी ।' असें वाक्यखंड आहे. तेथें ' उदधी ' हें पद सप्तम्यंत असून त्याचा अर्थ 'उदधींत' असा आहे. त्याचप्रमाणें मागें पृ. ३७ वर एकनाथी भागवतांतला

उतारा घेतला आहे त्यांत 'निज आवडी वाडेंकोडें । वानितों भक्तीचे पवाडे ।' याच्यामध्यें 'आवडी' हें पद तृतीयान्त असून त्याचा अर्थ 'आवडीनें' असा आहे. 'मदें मछरें सांडिला स्वार्थबुधी ।' (मनाचे श्लोक ५१) येथील 'स्वार्थबुधी' याचा अर्थ 'स्वार्थबुद्धीनें' असा आहे. अशा रीतीनें जुन्या कवितेंत प्रातिपदिकाचें मूळरूप अगर सामान्यरूप, कोणत्याही विभक्तीचें कार्य करूं शकतें. पंतांच्या काळीं हा महत्त्वाचा प्रचार नाहींसाच झाला होता. प्रातिपदिकाचें मूळ रूप तर पंतकाळीं असें योजिलें जातच नव्हतें, व सामान्यरूपाचाही फक्त चतुर्थीच्या अर्थीच उपयोग केला जात होता.

१३. **सामान्यरूप** करण्याची पंतांची रीत सध्यांच्या भाषेप्रमाणेंच आहे, 'आ,' 'या' व 'ए' अशा तीन प्रकारांनीं होणारीं, 'रामास,' 'घोड्यास,' व 'मातेस' या शब्दांत अनुक्रमें दिसून येणारीं, जीं तीन सामान्यरूपें कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं सांगितलीं आहेत तींच पंतकाव्यांत दिसून येतात. जयाला, तयाला, राजयानें, गडियांस, वासरुवास, भरवसियानें अशीं जीं सामान्यरूपें कोठें कोठें आढळतात तीं सवलतीदाखल, वृत्तादिकांच्या जरूरीसाठीं केलेलीं होत हें वर सांगितलेंच आहे. सामान्यरूपांच्या बाबतींत मराठी भाषेंत ज्ञानेश्वरकालापासून आजपर्यंत पुष्कळच महत्त्वाचे फेरफार होत आलेले आहेत. त्यांचें शोधपूर्वक विवेचन करून त्यांवर स्वतंत्रच निबंध लिहिण्याजोगा आहे. येथें पूर्वीच्या ग्रंथांतील सामान्यरूपाचे कांहीं मासले देतों—**ज्ञानेश्वरी**; (१) कां जे **लळेयाचे** लळे सरतीं । ९.३. (२) **तुमचेया दिठिवेयाचिये** बोलें । ९.४. (३) **जेयां जिया** अक्षौहिणी । १.१२२. हीं रूपें सध्यांच्या भाषेंत लळ्याचे, तुमच्या, दिठिवेच्या, ज्यां(ना), ज्या,–अशीं होतील. **एकनाथ**; –तेथ **गुणेशीं** उपमा उपडे । **भेदेशीं** वाद बुडे ॥ हे सर्व प्रकार पंतकालीं अस्तंगत झाले होते.

१४. **विशेषणें**. आतांपर्यंत नामांविषयीं निरनिराळ्या बाजूंनीं विचार केला विशेषणांविषयीं पंतभाषेंत विशेष कांहीं लिहिण्याजोगें आढळत नाहीं. एकच विशिष्ट प्रचार पंतांच्या भाषेंत आढळतो त्याचा उल्लेख करून पुढें जाऊं. आपल्या चालू मराठींत विशेषणांविषयीं सामान्य नियम असा आहे कीं, विशेष्याच्या लिंगवचनविभक्तीप्रमाणें विशेषणाचें रूप बदलत नाहीं; तर तें अविकृत असेंच राहतें. फक्त आकारान्त विशेषणें तेवढीं विशेष्याच्या लिंगवचनांस अनुसरून बदलतात व विशेष्याची प्रथमेतर विभक्ति असल्यास त्यांचें सामान्यरूप होतें. जसें— चांगल्या घोड्यास, काळीं वांगीं इ॰. पंतांच्या भाषेंतही सर्वत्र बहुतेक याच

विग्रमास अनुसरून रूपें केलेलीं दिसतात; परंतु कित्येक ठिकाणीं मात्र, विशेष्याच्या लिंगवचनविभक्तीचे सर्व विकार विशेषणाला होण्याचा जो संस्कृत भाषेचा प्रचार त्याचा पंतांनीं अवलंब केलेला आढळतो. म्हणजे विशेषणाला तसेंच अविकृत न ठेवतां विशेष्याप्रमाणें त्याचीं विभक्तीचीं रूपें करून तीं पंत योजितात. उदाहरणार्थ--

१. नृप अंबरीष होता तो बहुमत फार हरिस अरिदास । मं. भा. ९.५८.

२. त्याची सुता सुकन्या तेजें वल्मीकबिलगतें पाहे । मं. भा. ९.२७.

३. वचनें करुणें न गणी । मं. भा. ४.११७.

४. ते नंदयशोदोद्भव रात्रीला नेणतीच सरलीला । मं भा. १०.५८९.

५. देहिहित नित्यकर्मेंचि; कर्में काम्याभिचारिकें दुष्टें ।
सेवूं नयेत, जैसीं कीं भस्में पुष्टिनाशकें पुष्टें ॥ मं. भा. ११.३०६.

६. विलासवतीनें सवतीनें । कृ. वि. ३०. २५.

खालील उदाहरणांत विशेषणांचें सामान्यरूपच केलें आहे परंतु तें भाषेच्या नियमाप्रमाणें करूं नये अशा ठिकाणीं केलें आहे.--

१. भेटे हरि, परि टाचें पुण्य खळा कंसकिंकरा परिटाचें । कृ.वि.४१.१५.

२. भी जडाहि परिटा कीं । मं. भा. ९.१६२.

खळ, कंसकिंकर व जड हीं आकारान्त विशेषणें नसल्यामुळें त्यांना विकृति करण्याची जरूरी नव्हती. खालील उदाहरणांत दोन्ही नामेंच असून समानाधिकरण आहेत. अशा ठिकाणीं संस्कृतांत अर्थात् दोघांचीं विभक्तिरूपें करितात. मराठींत तसें करण्याची पद्धत नाहीं; परंतु पंतांनीं तसें केलें आहे.--

१. वारिद सुज्ञानाचा श्रीगाधिज चातकीं नृपीं वळला । मं.भा.९.१०६.

२. मयि कामशर जया त्या राम म्हणे साधुमोक्षलत्पथिका* कृ.वि.८६.१३.

१५. संस्कृतांतून जीं विशेषणें मराठींत घेतलीं जातात तीं स्त्रीलिंगी नामांना लाविलीं असतां त्यांचीं संस्कृत व्याकरणांतले स्त्रीप्रत्यय लावून स्त्रीलिंगी रूपें करण्याची मुळींच पद्धत नाहीं. 'अलंकारयुक्त भाषा सुशोभित दिसते' असें आपण म्हणतों. 'अलंकारयुक्ता भाषा सुशोभिता दिसते' असें म्हणत नाहीं. परंतु संस्कृत विशेषणांचीं स्त्रीलिंगी रूपें पंत नेहमीं संस्कृताच्या धर्तीवरच करतात. जसें--

*पराडकरी प्रतींत हा शब्द चुकीचा छापून त्याचा अर्थही चुकीचा दिला आहे.

१. अलंकारें युक्ता रघुपतिकथा शोभत असे
अलंकारें हीना जरि म्हणति कोणी न विलसे । मं. रा. उपसंहार.

२. प्रभुच्या प्रादुर्भावीं झाल्या विमला दिशा, प्रजा मुदिता । वा. च. १७.

३. माळा पुष्पमयी...ती शीता परि...तापदा । कृ. वि. ६२. ३१.

हा सर्व प्रकार, संस्कृताचें अनुकरण करून संस्कृतांतील भाषाप्रचार शक्य तितके मराठींत आणण्याच्या प्रवृत्तीचा परिणाम होय. संस्कृत भाषेच्या अशा अनेक तऱ्हा मराठींत आणण्याचा पंतांनीं प्रयत्न केला आहे. त्याचें हें केवळ पहिलें दिग्दर्शन होय. यापुढें आणखी असे कित्येक प्रकार आपल्या दृष्टीस पडतीलच.

**१६. विभक्तींचा अर्थ.** ' स ' हा जो चतुर्थीचा प्रत्यय आहे त्याचा उपयोग जुन्या वाङ्मयांत फार व्यापकपणानें केलेला आढळतो व त्याचे अर्थही प्रकरीप्रमाणें निरनिराळे होत असलेले दिसतात. नेहमींच्या द्वितीया चतुर्थीच्या अर्थांशिवाय ' साठीं ' या अव्ययाच्या अर्थासारखा त्याचा अर्थ पुष्कळदा होत असतो. पंतकाव्यांतही हा ' स ' अशा निरनिराळ्या अर्थीं योजिलेला आढळतो. —' **त्यास** आलों असों गा ! ' कृ. वि. ६६. १४. येथें, 'त्यास – त्या कामासाठीं' असा अर्थ आहे.'ब्रह्मांडाचीं शतें **ज्यासि** लघु अधें सुख चौरी दे' कृ. वि. ६३. ३५. येथें, ज्यासि—ज्याच्यापेक्षां, ज्याच्या तुलनेनें. मागें पृ. २६४ वर पंतांच्या पत्रांतला उतारा दिला आहे त्यांत–' **अशास** तुमच्या कृपेनें घडेल तें पहावें ' असें वाक्य आहे. त्यांत ' अशास–अशा स्थितीमध्यें ' असा अर्थ आहे.

**१७. अव्ययें.** कित्येक अव्ययांचे अर्थही पंतकाव्यामध्यें सध्यांच्या पेक्षां भिन्न असलेले दिसून येतात. **वरी** ( ज्ञानेश्वरकालीन वेऱ्हीं )-पुरतें, पर्यंत; जसें–' पाजी जनासि अमृत **धणिवरी** ' कृ. २५. ४०. **परि, परिस** या अव्ययाचा अर्थ पंतकाव्यांत नेहमीं 'पेक्षां' असा होतो, ' सारखा, सदृश ' असा कधीं होत नाहीं. उदाहरणार्थ–' कीं, **बहुतांपरि** सकळा स्त्रींत वरी, जाणत्यें **तथापरिस** कळा.' कृ. वि. ३०. ४८. ' केला विस्तीर्ण **रसातळापरिस** गळा ' मं. भा. ६. १२० ' मोटें भाग्य तुझें त्या प्रल्हादाच्या **परीसही** धर्मा ! ' मं.भा. ७.१५६. **स्तव**–याचा अर्थ ' साठीं ' ' कारणें ' असा सर्वत्र होतो. परंतु पंतकाव्यांत त्याचा ' मुळें ' असाही क्वचित् केलेला दिसतो.–' त्या सर्वांचा पति **जास्तव** शक्ति तूं मला दे ही. ' मं. भा. ७.१९. जिच्यामुळें मी सर्वांचा पति

होईन अशी शक्ति तूं मला दे, असा येथें अर्थ आहे. कीं हें नेहमींचें कारण-बोधक अव्यय आहे. परंतु केव्हां केव्हां तें ' आणि ' या अर्थी योजिलेलें आढ-ळतें.--' आणें मीं दास योगमायेतें कीं भगवान् भव ' मं. भा. २.९६. ' अंगें स्वसख्याचीं कीं निववाया आपुलीं परिष्वंगें ' मं. भा. १.५१. या दोन्ही ठिकाणीं कीं याचा 'आणि' असा अर्थ आहे.

## ( २ ) आख्यात व धातुसाधित.

१८. **आख्यातें ( क्रियापदें ).** प्रातिपदिकांविषयीं विचार झाला. आतां क्रियापदें व धातुसाधितें यांविषयीं विचार करूं. पैकीं क्रियापदांविषयीं विचार करूं जातां पंतभाषेंत व चालू भाषेंत कांहीं फारसा फेर आढळून येत नाहीं. भाषाशुद्धिप्रकरणांत कवींच्या सवलतींचे जे नियम दिले आहेत त्यांप्रमाणें होणारे फेरफार सोडले असतां क्रियापदांचीं सर्व रूपें चालू भाषेंतल्या प्रमाणेंच होतात असें दिसून येतें. तेव्हां सर्व काळांच्या निरनिराळ्या रूपांविषयीं चर्चा करीत न बसतां ज्या कांहीं लक्षांत ठेवण्याजोग्या गोष्टी पंतभाषेंत आढळतात त्यांचा उल्लेख करून पुढें जाऊं.

चालू भाषेंतील रूपांहून फारशीं निराळीं नसलेलीं परंतु लिहिण्याच्या भिन्न पद्धतीमुळें निराळीं दिसणारीं अशीं रूपें पंतकाव्यांत बरींच आढळतात. त्यांचा प्रथम उल्लेख करूं. सध्यांच्या भाषेंत ऊकारान्त लिहिलीं जाणारीं कित्येक रूपें पंत ओकारान्त लिहितात आणि याच्या उलट सध्यां ओकारान्त असणारीं ऊकारान्त लिहितात. आज्ञार्थाचीं प्रथमपुरुषी रूपें आपण सांगूं, जाऊं, करूं, अशीं करतों तर पंत तीं सांगों, जावों, करों अशीं करतात. जसें—' सुज्ञाची मर्यादा किति सांगों ' मं. भा. ९. १६२ ' नको हालों ' मं. भा. १०. २२४ ' शर्मी लोक पडों द्या ' कृ. वि. ८९. ९६. परंतु आज्ञार्थाचीं तृतीयपुरुषी रूपें मात्र ' तो करो ' ' ते करोत ' अशीं ओकारान्त न करतां ' तो करू ' ' ते करूत ' अशीं करतात. उ०—' तो मित भावू ससा ' कृ. वि. ७७. २२. ' टाकू कर्णमुखें पिवू जन सुखें शुद्धामृता मद्यशा । ' कृ. वि ७२. ४. त्याच-प्रमाणें तर्पू, होऊ, करू, लावू इ०. वृत्ताकरितां हा ऊकार कधीं कधीं र्‍हस्वही केला जातो. उ०—' करुत कृपा बहु सुकवी ' कृ. वि. १. ४. अगदीं क्वचित्, सध्यांच्या प्रमाणें ओकारान्त अशींही रूपें सांपडतात. उ०—' तो मेघ वर्षो पळ '. कृ. वि. ६७. १९. ऊकाराबद्दल ओकार करण्याची प्रवृत्ति ' ऊन '

प्रत्ययान्त धातुसाधितांमध्येंही दिसून येते. उ०— म्हणोन, बोळोन, भुंकोन इ०. कित्येक शब्दांमध्यें उ बद्दल वु व इ बद्दल वि लिहिण्याचीही प्रवृत्ति दिसून येते. इ०—भावू, होवू, पिवून, खावून, विंगळाला (इंगळाला) इ० या सर्व जुन्या काळांत प्रचलित असलेल्या लेखनपद्धतीच्या तऱ्हा आहेत.

वर्तमानकाळीं स्त्रीलिंगी एकवचनाचीं रूपें आपण सध्या 'मी खातें' 'ती खाते, दिसते' अशीं करतों व पंतही बहुधा तशींच करतात. पण क्वचित्, 'तीच्क अधरामृत पीती', 'वक्षःस्थळींच वसती', 'आपण आकंठ रस सेविती', (मं. भा. १०. ११५९, ६०); 'जी स्थिति दिसती' (मं. भा. ११. ३८); 'पावती' (भी. भा. ५५)—अशीं देशस्थी वळणाचीं रूपें पंत योजितात. कोठें कोठें 'अधराचा परमरस पितये' (कृ. वि. ३०. ३६) 'आणतयें कळा' (कृ. वि. ३०. ४८) 'चिंता वितयें, चिंतामणीस आठवितयें' (कृ. वि. ४९. १७), अशीं कोंकणस्थी रूपेंही त्यांच्या काव्यांत दिसून येतात. हीं दुसऱ्या तऱ्हेचीं रूपें कृष्णविजयामध्यें दिसून येतात व पहिल्या प्रकारचीं देशस्थी रूपें मंत्रभागवतांत विशेष आढळून येतात हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. यावरून पूर्ववयांत पंतांच्या भाषेवर कोंकणी उच्चारांचा पगडा होता व उत्तरवयांत, बारामतीस बरींच वर्षें काढल्यानंतर त्यांचे उच्चार देशस्थी बनले असें अनुमान निघण्याजोगें आहे. परंतु त्या दृष्टीनें त्यांच्या काव्यांचें बारकाईनें निरीक्षण केल्याशिवाय त्या अनुमानाच्या खरेपणाविषयीं खात्री देतां येण्याजोगी नाहीं.

१९. केवळ उच्चारांत फरक नसून भिन्न प्रत्ययांनीं व भिन्न प्रक्रियेनें साधलीं गेलेलीं अशीं रूपें पंतकाव्यांत फारच थोडीं दृष्टीस पडतात. त्यांपैकीं 'हो' या धातूचीं रूपें विशेष लक्षांत ठेवण्याजोगीं होत. 'होवीस' 'होयास' 'होया' हीं रूपें विशेषतः त्यांतील शेवटचें रूप, पुष्कळच ठिकाणीं आढळतें. होवीस= व्हावीस, हूवीस (पाहिजेस); उ०—'तूं मनींच होवीस' मं. भा. ५, ४२. 'आम्हांसि तूंचि होवीस' मं. भा. १. ३. 'होया' याचा अर्थ होण्यास, व्हावयास, असा केला जातो. उ०—'साधूंसि गावया होया' भीष्म ३. ४४. 'मोद माझ्याहि हृदया होया' कृ. वि. २३. २४. 'स्वास्थ्य शीघ्र होया' कृ. वि. २५. २६. याशिवाय 'ले' धातूचें 'लेया' असेंही एक रूप आढळलें. 'हरिपदधूळिचें नव लेया' कृ. वि. ३०. १८. लेणें म्हणजे घेणें, अर्थात् लेया म्हणजे घेण्यासाठीं, असा अर्थ होय.

आज्ञार्थी द्वितीय पुरुषाचें एकवचन करण्यास मराठींत प्रत्यय लावावा लागत नाहीं. धातूचें मूळरूप तेंच द्वि. पु. चें एकवचन होतें. जसें—कर, जा, ये इ०. परंतु पंतभाषेंत क्वचित् ' एं ' प्रत्यय लागून हें रूप तयार होतें. उ०—'अमृता ! तूं यापुढें जडा ! लाजें. ' मं. भा. ७. १.

' न ' चा व धातूचा संधि करून नकारात्मक रूपें करण्याची प्रवृत्ति मराठी कवितेंत सर्वत्र आढळते. अर्थात् पंतकाव्यांतही ती दिसून येतेच. हा न बहुतेक स्वरांनीं प्रारंभ होणाऱ्या धातूंसच लागतो. उदा०—मं. भा.– नुचली. ६. ११६, नुरावया. ७. १४०. नेकति, ९. २५०. नुतरित्यें, १०. १४०. नु-घाडितां, १०. ४५१. कांहीं थोड्या व्यंजनादि धातूंसही हा ' न ' लागतो, तेव्हां धातूच्या पूर्वी ' ए ' अगर ' ओ ' असा आगम होतो व धातूचीं रूपें अनियमित होतात.—नेदून, मं. भा. २. ९; नोहे, मं. भा. २. ५.

२०. आतां भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाच्या अशा व्याकरण-विषयक गोष्टीचा उल्लेख करावयाचा आहे. आपल्या चालू मराठी भाषेंत क्रिया-पदाची रूपसिद्धि अगदीं अपुरी व अडचणीची आहे. वर्तमानकाळीं धातूंचीं कर्मणि रूपें होऊं शकत नाहींत व भूतकाळीं धातूंचीं कर्तरि रूपें करतां येत नाहींत. वर्तमानकाळीं कर्मणि रचना करावयाची झाल्यास सहाय क्रियापदें घेऊन कसा तरी वेडावांकडा प्रयोग करावा लागतो. ' तो काम करतो ' याचें कर्मणि ' त्याच्याकडून काम केलें जातें ' असें करावें लागतें. आणि या वाक्या-चाही अर्थ कर्मणीसारखा असला तरी व्याकरणदृष्ट्या प्रयोग कर्तरीच रहातो. हा मराठी भाषेचा लंगडेपणा पूर्वीच्या काळीं नव्हता. जुन्या मराठी भाषेंत, निदान कवितेच्या भाषेपुरती तरी, ' ज ' प्रत्यय लावून धातूंचीं कर्मणिरूपें कर-ण्याची प्रक्रिया सररास चालू होती व या कर्मणि रूपांबरोबरच ' ज ' प्रत्यय लावून धातूंचीं विध्यर्थी रूपेंही होत होतीं. सकर्मक धातूंच्या कर्मणीबरोबर अकर्मक धातूंचीं ' भावे ' रूपेंही अर्थात् होत होतींच. ' राम काम करतो ' या कर्तरि वाक्याचें ' रामानें काम करिजेतें ' असें सरळ कर्मणि रूपांतर होत असे. व 'रामें काम कीजे' म्हणजे 'रामानें काम करावें' अशा प्रकारचीं विध्यर्थी रूपेंही होत होतीं. हा प्रकार सरसकट भाषेंत कितपत चालू होता हें सांगतां येत नाहीं; परंतु तो कवि-तेंत अगदीं अनिर्बंध रीतीनें चालू होता यांत मात्र संशय नाहीं. पंतांच्या कवि-तेंतही या कर्मणि व विध्यर्थी रूपांचा प्रचार चांगला दृष्टीस पडतो; तो त्यांच्या

वेळेस बंद पडत चालला होता असें मुळींच दिसत नाहीं. मग त्याच्यानंतर थोड-क्याच अवकाशांत तो बंद पडण्यास काय कारण झालें हें समजत नाहीं. इंग्रजी झाल्यानंतर जी ग्रंथरचनेस व काव्यरचनेस सुरवात झाली त्यांत हा प्रचार दिसून येत नाहीं. असो. पंतकाव्यांतील या प्रकाराचीं कांहीं उदाहरणें देऊं म्हणजे हीं 'ज' प्रत्ययघटित रूपें कशीं केलीं जात असत व त्यांचा वाक्यांत कसा प्रयोग होत असे हें नीट लक्षांत येईल. कर्मणिः–'पूर्णोचि अमा त्यांहीं करिजेत्ये अंधभूपति-अमात्यांहीं' कृ. वि. ४. २०. अंध राजाच्या अमात्यांकडून जिकडे तिकडे अमावास्येसारखा घोर अंधार, अंदाधुंदी करण्यांत येते, असा भावार्थ. 'करिजेल काय ताशिला पुत्रे ?' कृ. वि. ९.९. 'भजिजेते कंज बांधि तरि कां मा तां' कृ.वि. ४७.३५. कंज ( कमल ) बांधि तरी तां ( तुझ्याकडून ) कां भजिजेते ( भजलें जातें ) ! 'गणिजेल यमोग्ररोष कां पतितें ?' मं. भा. ६. ४. 'जो सुखभोग दुर्लभ सुरां तो सेविजेतो जनें' कृ. वि. ६९. २. या उदाहरणांवरून अगदीं संस्कृताप्रमाणें हीं रूपें कशीं नियमित व व्यवस्थित होतात हें दिसून येतें. संस्कृतांतल्या 'य' प्रमाणें व त्या 'य' पासूनच निघालेला 'ज' मूळ धातूला लागून त्याचें कर्मणि रूप तयार होतें व इतर धातूंप्रमाणेंच या कर्मणि धातूंचीं सर्व काळीं, सर्व पुरुषीं रूपें होतात. कर्त्याची तृतीया विभक्ति होते व कर्माची प्रथमा होते. हीं कर्मणि प्रयोगाचीं विशिष्ट अंगें वरील सर्व उदाहरणांत एकजात दिसून येत आहेत. पुढील उदाहरण भावे प्रयोगाचें आहे.—'गळिजेलें कुलपानीं' कृ. वि. ३.१९. येथील गळणें हें क्रियापद अकर्मक आहे 'कुलपें गळालीं' याचें 'गळिजेलें कुलपानीं' हें सुरेख भावे रूपांतर आहे. विध्यर्थः—'घनपवनासि-हि न भिजे' कृ. वि. २५. २६. न भिजे=न भ्यावें 'या सिंधुमग्न पुत्रा म्हणिजे,' कृ. वि. ४५. ४८. म्हणिजे=म्हणावें. 'आठविजे काय तुजे या घोषीं ?' कृ. वि, ४७.७. आठविजे=आठवावें 'त्यजिजे आगाणें...हृतधना गणिकांनीं' कृ. वि. ४७.८. हृतधना=हृतधन पुरुषास. त्यजिजे=त्यजावें.'यांसि पूजिजे सुज्ञांनीं,' कृ. वि. ४७.१०७. 'निजलंघन जगीं नीचें असमर्थे साहिजे' कृ. वि. ५४.२० 'जें पीयूषें न दिजे, दिजे सहज त्या पद्माळयातोयजें' कृ. वि. ६४.४. 'अशन किजे' मं भा. ९ ६०. या उदाहरणांवरून या जुन्या विध्यर्थाचें स्वरूप चांगलें लक्षांत येईल. धातूला 'जे' प्रत्यय लावला कीं विध्य-र्थाचें रूप तयार होतें. त्या रूपास पुढे काळ, पुरुष व वचन यांचे दर्शक प्रत्यय

लागत नाहींत. पुढचे आख्यात प्रत्यय लागले कीं तें रूप विध्यर्थाच न राहतां कर्मणि होतें. या विध्यर्थांत कर्त्याची तृतीया होते व कर्माची प्रथमा अगर चतुर्थी होते. सारांश, करावें, खावें, धावें, मरावें या चालू भाषेतील नपुंसकलिंगी विध्यर्थी रूपाप्रमाणेंच सर्व बाबतींत या जुन्या विध्यर्थाची स्थिति होती. शिवाय हा ' वा, वी, वें 'प्रत्ययान्त विध्यर्थही त्यावेळेस चालू होताच हें सांगण्याची जरूरी नाहीं.

२१. साध्या धातूंच्या रूपासिद्धीविषयीं विचार करून त्यांतील महत्त्वाच्या गोष्टी वर निवेदन केल्या; आतां **साधित धातूं**विषयीं विचार करूं. साधित धातूं-पैकीं मुख्य जो **प्रयोजक धातूचा** प्रकार त्याविषयीं विशेष सांगण्याजोगें असें कांहीं नाहीं. थोड्याशा धातूंचीं प्रयोजक रूपें सध्यां आपण करितों त्यापेक्षां पंतांनीं निराळीं केलेलीं दृष्टीस पडतात धावणें याचें प्रयोजक सध्यां दवडणें असें होतें; पंतभाषेंत तें धांवडणें असें होत असे. ' कंसें जो धांवडिला, ' कृ. वि. ३९.१. शिवाय दवडिलें असें रूप होत असेच.पहा मं. भा. ९. १०७.न्हा धातूचें प्रयोजक 'न्हाण' असें होत असे. ' तिस कन्यासहस्र तें न्हाणी, ' मं. भा. ३. १०७. ' यादवांच्या वर्गे क्षोणिला न्हाणीतों ' र. गी. १०४. सध्यां न्हा याचें प्रयोजक करावयाचें असल्यास ' न्हायला घालणें ' असें करतात. न्हाणितों इ० रूपें प्रचारांत आहेत असें वाटत नाहीं. जिंकणें या ऐवजीं जिणणें हें क्रियापद कोठें कोठें दृष्टीस पडतें. —' तैसेंचि जिणुनियां हरितें ' मं. भा. ४.१४५. खणणें याचें प्रयोजक खाणविणें असें होतें.—' वसु खाणविलें, ' मं. भा. १.४९. ' सरणें ' ( संपणें ) याचें प्रयोजक ' सारणें ' ( संपविणें ) असें होत असे. सध्यां सारणें याचा अर्थ सरकविणें असा होतो.

२२. **नामधातु**. परंतु चालू भाषेच्या तुलनेच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचा साधित धातूंचा प्रकार म्हणजे नामधातूंचा होय. नामधातु म्हणजे नामावरून तयार केलेले धातु. या नामधातूंचा प्रचार जुन्या काव्यवाङ्मयांत फारच दृष्टीस पडतो. ज्ञानेश्वरांच्या पुढील ओव्या पहा.—तैसा तुम्हीं मी **अंगिकारिला** । सज्जनीं आपुला म्हणितला । तरी उणावो साहाजे **उपसाहला** । प्रार्थु काइ ॥ १. ६५. येन्हवीं संकल्पाचिये सांजवेळे । नावेक **तिमिरेजती** बुद्धीचे डोळे । म्हणोनि अखंडीतचि परि झावळे । भूत भिन्न ऐसें देखे ॥ ९.७२. सगें पडिसाद्याची प्रत्युत्तरें । कां आरिसा जें **आविष्करे** । ९.७८. या उदाहरणांवरून या आद्य महाराष्ट्र ग्रंथांत कसे नामापदींनीं धातु बनविलेले आहेत हें कांहींसें लक्षांत

येईल. या धातूंस आम्ही ' नामधातु ' असें नांव दिलें आहे. परंतु अशा तऱ्हेचे सर्व धातु मराठींत प्रचारांत असलेल्या नामांवरूनच बनविण्यांत येतात असें नाहीं. संस्कृतांत प्रचारांत असलेल्या क्रियापदें अशींच्या तशीं मराठींत उतरूनही असे कित्येक धातु बनविण्यांत येतात. वर जीं ज्ञानेश्वरींतील चार क्रियापदें उदाहरणादाखल दिलीं आहेत त्यांपैकीं ' अंगिकारिला ' व ' तिमिरेजती ' हीं अंगीकार व तिमिर या नामांवरून बनविण्यांत आलीं आहेत असें म्हणतां येईल. परंतु ' उपसाहला ' व ' आविष्करे ' हीं कोणत्याही नामांवरून बनविण्यांत आलीं नसून ' उपसहते ' व ' आविष्करोति ' या संस्कृत क्रियापदांची ती मराठी प्रतिकृति आहे. तथापि या नामांवरून बनविलेल्या व संस्कृतांतून घेतलेल्या क्रियापदांमध्यें परस्पर सर्वस्वीं सादृश्य असल्यामुळें येथें त्यांचा एकाच कोटींत समावेश केला आहे. तसेंच पाहूं गेलें तर जे नामापासून निघाले असें मानण्यांत येतें असे धातूही संस्कृतांतूनच आणले असण्याचा संभव वाटूं लागतो. ' अंगीकारणें ' हा धातु ' अंगीकार ' या शब्दावरून बनविला असें मानण्याऐवजीं ' अंगीकरोति ' या संस्कृत क्रियापदावरून मराठींत उतरला असें कां मानूं नये ? ' थोजला ' ' चमत्कारला ' यांसारख्या कांहीं धातूंस हा युक्तिवाद लागू पडणार नाहीं व ते नामांवरूनच तयार केले असें मानावें लागेल हें खरें. तथापि एकंदरीनें या दोन्ही प्रकारांतील भेदाचा पडदा झिरझिरीतच आहे यांत संशय नाहीं. असो.

पंतांनीं असल्या साधित धातूंचा आपल्या काव्यांत इतर कवींप्रमाणेंच मनमुराद उपयोग केला आहे. नामांपासूनच बनविलेल्या धातूंचीं कांहीं उदाहरणें—— ' विश्वात्मा **अटकळला** ' कृ. वि. ८. ३७. अटकळला—अटकळ करिता झाला. ' न देह धुतला **उटिला** ' कृ. वि. २९. १२. उटिला—उटणें लाविलेला उटणें या नामापासून हें चमत्कारिक धातुसाधित बनविलें आहे. ' तया दुर्बुद्धि वे कौरव **अनादरिति** ' कृ. वि. ६८. २५. ' अया **मानवे** श्रीनिवास ' कृ. वि. ७१. १. मानवे—मान देई. ' मान ' या नामापासून हें क्रियापद केलें आहे. ' पसंत पडतें ' या अर्थी ' मानवे ' असें क्रियापद आहे तें हें नव्हे. ' देवब्राह्मणसाधुवृंदहि मखामध्यें **चमत्कारलें** ' कृ. वि. ७५. १४. ' व्हाया संतान **नवसिला** वरुण ' मं. भा. ९. ९४. ' करुनि **कवाचितें** अंगें ' मं. भा. १०. ६६६. कवचित—कवचें घातलेलीं. ' तद्दस्य संजातामिति तारकादिभ्य

इतच् ' यानें इतच् प्रत्यय होऊन निष्पन्न होणाऱ्या ' तारकित, ' इ० शब्दांप्रमाणेंच हा प्रकार आहे असेंही मानतां येईल. ' झाला सिद्ध स्वकाय होमाया ' मं. भा. १०.१११९. 'वाळींया, हा दोषचि' मं. भा. ३.१०. वाळीं–वाळींत टाक– ' जो सकंप कातरतो ' मं. भा. ११.४१९. ' मीं कर्मेत नसें ' मं. भा. ११. ४३४. जीं क्रियापदें नामांपासून बनविलेलीं किंवा संस्कृतांतून घेतलेलीं अशींही मानतां येतील अशांचीं कांहीं उदाहरणें.–' तपोनि ' तप करून. मं. भा. ७. ८. 'भक्त नमस्कारिले विमळुसोम' मं. भा. उपोद्घात ३. 'शीके' मं. भा. ७.६३. ' दाहिलें ' मं. भा. १०. २९३. जीं उघड उघड संस्कृत क्रियापदांपासून मराठींत वापरण्यासाठीं घेतलेलीं दिसतात अशा क्रियापदांचीं उदाहरणें–'समधिष्ठुनि' कृ. वि. २२. ५. मं. भा. ८. ११२. ' उपरमला ' मं. भा. ५. ५. ' व्यापारुनि ' मं. भा. ६. ११५. 'परिहरितां' मं. भा. ८. ४४. 'अनुमोदितीं' मं. भा. ११. ५३९ ' विस्मरुनि ' मं. भा. १.११६; २.१३. विचारुनि हें संस्कृतांतील क्रियापद पंतकाव्यांत पुष्कळ वेळां येतें. त्याचा अर्थ ' प्रश्न करणें ' असा नसून ' विचार करणें ' असा असतो. हें ' विचारयति ' ह्या संस्कृत क्रियापदावरून मराठींत घेतलेलें आहे हें उघड आहे.

हे नामधातु किंवा संस्कृतांतील धातु सध्यांच्या गद्य भाषेंत प्रचारांत नाहींत. ते प्रचारांत आणण्याचा हरिभाऊ आपटे प्रभृति कित्येक लेखकांनीं प्रयत्न केला आहे; परंतु तो प्रयत्न फारसा सफल झाला आहे किंवा होईल असें दिसत नाहीं. जुन्या काळीं तरी काव्यवाङ्मयांतच असे धातु बनवून वापरण्याचा प्रघात होता. गद्यामध्यें किंवा सामान्य बोलींमध्यें ते वापरीत असत असें दिसत नाहीं. आणि तसा गद्यामध्यें व साधारण व्यवहारामध्यें त्यांचा मुद्दाम उपयोग करूं लागल्यास ते बोजड व अपरिचित वाटतील यांत संशय नाहीं. मराठी भाषेची प्रवृत्ति क्रियापदें किंवा आख्यातरूपें वाढविण्याकडे नसून प्रातिपदिकांचा साठा वृद्धिंगत करण्याकडे विशेष आहे; व या प्रवृत्तीस अनुसरून मराठीनें आजपर्यंत जो शब्दसंभार परभाषांतून घेतला आहे तो प्रातिपदिकांच्या स्वरूपांतच घेतला आहे. तेव्हां उद्गारला, उत्तरला, प्रश्नला, चमत्कारला, चिकित्सला, भविष्यला असल्या चित्रविचित्र क्रियापदांची भरती करूं पाहाणाऱ्यांचा प्रयत्न मराठी भाषेच्या अभिवृद्धीस कारण होत आहे असेंच केवळ म्हणवत नाहीं.

२३. संस्कृतांतील क्रियापदें मराठींत आणण्याचा वर सांगितलेला प्रयत्न

म्हणजे मराठी भाषेला संस्कृतमिश्रित करून सोडण्याच्या पंतांच्या धोरणांतलाच एक भाग होय. तसाच आणखी एक प्रयत्न म्हणजे संस्कृताच्या धर्तीवर मराठींत वर्तमानकालवाचक धातुसाधितें बनविण्याचा होय. मराठींत ' तो करता झाला,' 'त्यानें त्याला बसतें केलें' अशा तऱ्हेच्या वाक्यांत संयुक्त क्रियापदांच्या अंगभूत म्हणून वर्तमानकालवाचक धातुसाधितांचा प्रयोग होतो. स्वतंत्र रीतीनें त्यांचा प्रयोग फारच क्वचित् होतो. उदा०—करता सवरता पुरुष, रांगतें मूल, उडता पक्षी, धावती गाडी, इ०. परंतु पंत अशा धातुसाधितांचा प्रयोग संस्कृत पद्धतीप्रमाणें सररास पाहिजे त्या विभक्तीनें युक्त असा करतात. उदा०—' संगें हर्ष देऊनि सर्वोत्कृष्टत्वाप्रति **नेतीच्या** ' मं. भा. ९. १९१. ' सर्वोत्कृष्टत्वं नयत्याः ' या संस्कृत प्रयोगाचें हें तंतोतंत भाषांतर आहे. त्याचप्रमाणें, ' प्रेमें समर्पिलें मग जग **पाळितया** तया दयानिधितें ' मं. भा. पृ. १.५०. ' तूं साधु **परिसता** राया ' मं. भा. २. १०. हेही प्रयोग होत.

## ( ३ ) प्रयोग व वाक्यरचना.

२४. आख्यातें व धातुसाधितें यांच्याविषयींचा विचार पुरे करून व्याकरणाचें तिसरें अंग जी वाक्यरचना तिजविषयीं आतां विचार करूं. वाक्यरचनेविषयीं व क्रियापदांच्या प्रयोगाविषयीं विचार करूं लागलें म्हणजे पंतांच्या संस्कृतीकरणाच्या धोरणाचा आणखी एकदां प्रत्यय येतो. कित्येक वेळां पंतांचे प्रयोग मराठीच्या दृष्टीनें अगदीं कृत्रिम होतात. उदा०—' सह्य होति हे हठ कवणें.' ' केन सह्या भवन्ति ' या संस्कृतवाक्याचें ' कवणें सह्य होति ' हें तंतोतंत भाषांतर आहे. खरें मराठी म्हणजे ' कवणास सह्य होति ' असें पाहिजे. ' याची शोभा पांडवांच्या वधूंनीं निरखित असतां, तों आला धार्तराष्ट्र ' कृ वि. ७५.१८. ही वाक्यरचना सर्वस्वी संस्कृताच्या धर्तीवर गेली असें म्हणतां येत नसलें तरी मराठीच्या दृष्टीनें ती अगदीं चमत्कारिक व अशुद्ध आहे. अगोदर 'निरखित असतां' याचा कर्ता जो ' वधू ' त्याची तृतीया विभक्ति येथें नको आहे; प्रथमाच पाहिजे. 'तों' हा शब्द तर येथें अगदींच अनर्थक आहे. ' असतां ' या धातुसाधितापुढें 'तों' या ' उभयान्वयी अव्ययाची कांहीं जरूरी नव्हती. ' निरखिली ' असें पूर्ण क्रियापद असतें तर ' तों ' याची योजना योग्य झाली असती. ' युधिष्ठिरें चिंता करितां अर्जुन आला ' मं. भा. १. ७५. हा प्रयोगही चूक आहे. ' युधिष्ठिर चिंता करीत

असतां ' असें पाहिजे. कोठें कोठें कर्माची सप्रत्यय चतुर्थी वाक्याची भावेची रूढि असतां पंतांनीं प्रथमेचीच योजना केलेली आढळते. ' क्षोणी शोभवि ' मं. भा. ८. ४. ' गंगोदक दग्ध पितर तारिले ' मं. भा. ९. १२३. या दोन्ही स्थळीं अनुक्रमें ' क्षोणीला शोभवि ', ' पितरां तारिले ' असे प्रयोग करणें हें भाषेच्या रूढीला अधिक धरून आहे. उलट 'तयांप्रति फळा कर्मानुरूपा दिजे' येथें चतुर्थी नको असून प्रथमाच पाहिजे असतांना चतुर्थीचा प्रयोग केला आहे. कृ. वि. ६१. २०. ' प्रभुसि मद्दि साक्षवावी ' मं. भा. ३. ४८. येथें प्रभुसि ही चतुर्थी बरोबर नाहीं 'प्रभूकडून ' असा अव्ययान्त प्रयोग पाहिजे.

२५ हे व्याकरणाच्या दृष्टीनें केवळ अशुद्ध प्रयोग झाले असले प्रयोग पंतकाव्यांत अगदींच विरळ आढळतात. ते केवळ नमूद करून ठेवण्यापलीकडे त्यांच्यांत फारसें तात्पर्य नाहीं. परंतु सध्यां मराठींत भूतकाळीं जेथें कर्मणि प्रयोग करण्याचा प्रचार नाहीं अशा ठिकाणीं कर्मणि प्रयोगच करण्याचा जो पंतांनीं पद्धतशीर प्रयत्न केला आहे तो लक्षांत ठेवण्याजोगा आहे. सध्यां सकर्मक धातूचा भूतकाळ कर्तव्य असतां कर्म जर प्रथमपुरुषी ( मी ) अगर द्वितीयपुरुषी ( तूं ) सर्वनाम असेल किंवा तृतीय पुरुषी असून मनुष्यवाचक असेल तर त्या कर्माची चतुर्थी विभक्ति होते व क्रियापद नेहमीं नपुंसकलिंगी एकवचनी रहातें. अर्थात् त्या वाक्याचा भावे प्रयोग होतो, कर्मणि होत नाहीं. उदाहरणार्थ--' रामानें रावणास मारिलें,' ' या दासानें तुला नेलें ' असे प्रयोग होतात. भावे प्रयोग नको असून कर्मणीच पाहिजे असल तर ' या दासाकडून तूं नेला गेलास ' असें सहाय क्रियापद घालून वाक्य करावें लागतें. परंतु अशी रचना केली म्हणजे व्याकरणदृष्ट्या त्या वाक्याचें स्वरूप बदलून निराळीच स्थिति उत्पन्न होते. ' तूं ' हा कर्ता व 'गेलास' हें क्रियापद होऊन हा अकर्मक कर्तरि प्रयोग होतो. कर्म जर सामान्य-प्राणिवाचक व पदार्थवाचक असेल तर मात्र ही भानगड न राहतां कर्मणि प्रयोग होतो. जसें—' रामानें घोडा नेला, गाय नेली, वासरूं आणिलें,' इ०. ही झाली व्याकरणाची सद्यःस्थिति. यांत पंतांनीं सुधारणा केली आहे; ती अशी कीं अमुक ठिकाणीं भावे, अमुक ठिकाणीं कर्मणि हा पंक्तिप्रपंच काढून टाकून सर-सकट सर्वांस कर्मणि प्रयोगाचा कायदा लावून दिला आहे. ' दासानें तुला नेलें ' असा प्रयोग न करितां सरळ ' नेलासि जेधवां या दासानें तूं ' कृ. वि. ८५. ९.

असा प्रयोग पंत करतात. हा प्रयोग म्हणजे ' दासेन त्वं नीतः,' याचें शुद्ध रूपांतर होय. अर्थात् संस्कृतीकरणाच्या धोरणाच्या बजावणीचें हें आणखी एक कलम होय. जेथें प्रसंग पडेल तेथें बहुधा पंतांनीं असेच प्रयोग केले असल्यानें याचीं उदाहरणें पुष्कळच देतां येतील. कांहीं थोडीं येथें दाखल करूं.—' जिणें वनीं पळविलास ' कृ. वि. ३०. १८. ' मीं गोपांहीं पर्थी भग्न केला ' मं. भा. १. ८०. येथें ' केलों ' पाहिजे. ' तुज म्यां मीं दिधलों,' मं. भा. २. ४३. ' म्यां तूं मोहितहृदय केलासि ' मं. भा. ८. १०२. ' पार्थ म्हणे, तूं मुनिनीं चिर्ती धरिलास ' उद्योग. १. ' वरिलासी मत्सखीनें ' आदि. १०. ' हारविलीस तूं धर्में' सभा. ४. शेवटलीं तीन उदाहरणें निबंधमालेंतून घेतलीं आहेत.

२६. संकरसमास. या प्रश्नाचा परामर्श घेतला म्हणजे आमचें व्याकरणविषयक विवेचन संपलें. एक अवयव संस्कृत तर दुसरा अवयव देशी अशा तऱ्हेचे घेडगुजरी समास पूर्वीच्या काव्यांतून बरेच दिसून येतात. भाषाशुद्धीच्या कामांत निष्काळजी असलेले जे वामनपंडितादिक कवि त्यांच्या काव्यांत अशा समासांचा विशेष भरणा दिसून येतो. पंतांच्या काव्यांतही असे समास कोठें कोठें आढळतात.—हरिसी ' काम-सगास ' कृ. वि ३९–१९. कुंकुम ' माथानींचें ' कृ. वि. ३८. १६. ' कुठार-गडी ' ( 'परशूवा सोबती ' म्हणजे परशुराम ) मं. भा. ११. १३० ' शुचिप्रतिभा-झरा,' कृ. वि. सज्जन प्रार्थना ३. ' काट-मांदुस-रीति,' कृ. वि. ३९. १७. 'उद्धत-पसारा ' मं. भा. २१. १३९. ' मुनि-वहाडा, ' इ० इ०.

अशा तऱ्हेचे समास कितपत भाषापोषक होतात हा प्रश्न आहे. पंतकाव्यांत असे समास केलेले आढळतात ते बहुधा यमक प्रास वगैरेंच्या अपरिहार्य नडीकरितांच केलेले आढळतात. अर्थात् असे समास स्पृहणीय म्हणून त्यांनीं योजिलेले नसून अगदीं नाइलाजानेंच क्वचित् स्थलीं त्यांस त्यांनीं अवकाश दिला आहे. आणि एकंदरींत हीच पंतांची वृत्ति या बाबतींत सध्यांच्या लेखकांनींही ठेवणें प्रशस्त होय असें आम्हांस वाटतें. म्हणजे, असे समास भाषेच्या शुद्धीला व भारदस्तपणाला अपायकारक होत ही गोष्ट सतत मनांत ठेवून त्यांना टाळण्याचा शक्य तितका प्रयत्न करावा, परंतु जेथें त्यांवाचून विचारप्रदर्शनाचें काम अडतच असेल तेथें मात्र अपरिहार्य म्हणून त्यांचा स्वीकार केल्याखेरीज राहूं नये. असा मध्यम मार्ग स्वीकारल्यानें भाषेच्या गौरवाचा भंग न होतां

विचारप्रदर्शनाचें काम अस्खलितपणें करतां येईल; व अत्यंत उपयोगी असेच शब्द भाषेंत येऊन भाषेची अभिवृद्धीही होईल. हल्ली वर्तमानपत्रांचा प्रसार झाल्यामुळें लेखनांतला निष्काळजीपणा फार वाढला आहे. पार्लमेंटसभा, कायदेकौन्सिल, शेतकीकमिशन, सुधारणाकमिटी असले सहज टाळतां येण्याजोगे विचित्र शब्द वर्ज्य करण्याची बुद्धि भारदस्त लेखकांसही होऊं नये ही शोचनीय गोष्ट होय.

२७. व्याकरणाच्या दृष्टीनें पंतकाव्यांच्या भाषेचें अगदीं थोडक्या अवकाशांत जेवढें करतां आलें तेवढें निरीक्षण येथवर केलें. आतांपर्यंत मराठी व्याकरणांतील ज्या ज्या प्रश्नांचें विवेचन केलें ते सर्व प्रश्न अतिशय किचकट व अडचणीचे आहेत. सूक्ष्म विचारांत शिरल्यास प्रत्येक विषयाला शेंकडों फांटे फुटलेले दिसूं लागतात व व्याकरणनियमांच्या अस्थिरतेमुळें प्रयोगांत स्वैरपणा किंबहुना घोटाळाही कोठें कोठें दृष्टोत्पत्तीस येते. खरोखर म्हटलें तर, आख्यातप्रत्यय, विभक्तिप्रत्यय, शब्दयोगी अव्ययें, नामधातु, क्रियापदांचे प्रयोग, वगैरे महत्वाच्या विषयांपैकीं एकेक निराळा घेऊन आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयांतून त्याचा अभ्यास करून त्या विषयाचें सांगोपांग विवेचन स्वतंत्र प्रबंधाच्या रूपानें केलें पाहिजे. असें विवेचन करणारे अधिकारी भाषाशास्त्रज्ञ निर्माण व्हावे याखेरीज असलें तात्पुरतें विवेचन करणाऱ्यांचा दुसरा काय हेतु असणार ?



## विभाग ७.

# पंतकवितेंतील दोषांचें विवेचन;

## पंतांच्या वर्णनशैलीचे आणखी कांहीं विशेष.

---

वंशे घुण इव न विशति दोषो रसभाविते सतां मनसि ।
रसमपि तु न प्रतीच्छति बहुदोषः संनिपातीव ॥ आर्यासप्तशती ४१.

वंशीं कीट तसा, नच रसविकसितसन्मनीं शिरे दोष ।
परि मधुरंरसहि नेदी दोषपारा, ज्वरयुता जसा, तोष ॥

१. पंतकाव्याच्या भाषासरणीचें व रचनाशैलीचें आतां आपणास निरीक्षण करावयाचें आहे. या निरीक्षणाचा क्रम पुढीलप्रमाणें राहील:—प्रथम दोषनिरीक्षण, पुढें गुणपरीक्षण व कांहीं महत्त्वाच्या विशेषांचें अवलोकन. दोषांचाच परामर्श अगोदर घेण्याचें कारण, त्याच्याविषयीं पंतकाव्यदूषकांनीं विशेषच गवगवा करून ठेवला आहे हें होय. या दूषकांनीं कांहीं कारण नसतां जीभ उचलून टाळ्याला लावून स्वाभिमानशून्यतेचे प्रलाप काढल्यामुळें सत्यदर्शनाचे कामीं अनास्था होऊन खरोखर फार मोठें नुकसान झालें आहे. कारण, क्रियेस प्रतिक्रिया या न्यायानें, दूषक एका टोकाला गेले तर पंतकाव्याचे अभिमानी अगदीं दुसऱ्या टोकाला गेले. त्यांना सर्वत्र एकजात गुणच दिसूं लागले. दोषांचें विवेचन स्पष्टपणें व निर्भीडपणें करण्यास त्यांची लेखणी वाहीना! एका दृष्टीनें त्यांचें करणें बरोबरही होतें. कारण पंत हे कवीच नव्हेत येथपासून जी दूषकांच्या प्रलापांस सुरवात झाली होती तिचें यथास्थित निरसन करून वाङ्मयाच्या राज्यांतले पंतांच्या हक्काचें उच्च स्थान त्यांना निरामय रीतीनें प्राप्त करून द्यावयाचें होतें. परंतु 'अळीमिळी गुपचिळी'चा हा प्रकार, पंतांना वाङ्मयांतील त्यांचें योग्य स्थान प्राप्त झाल्यावर यापुढेंही चालू ठेवणें इष्ट आहे असें मात्र मुळींच म्हणतां येत नाहीं. सध्यां चाललेल्या केवळ स्तुतिपठणाच्या कार्यक्रमामुळें फायद्यापेक्षां तोटाच जास्त होत आहे. हंसांनीं आपला निबंध लिहिला, पांगारकरांनीं येवढें ६०० पृष्ठांचें चरित्र लिहिलें, काव्यसंग्रहाच्या आवृत्तीला व पराडकरांच्या

आवृत्तीला मोठमोठ्या विद्वानांनीं उपोद्घात लिहिले तरी पंतकाव्यांतील उणीवां-विषयीं जो तो आपला मूग गिळून स्वस्थ बसला आहे! असल्या तारतम्यरहित स्तुतीमुळें आणि दोषांबद्दलच्या मूकभावामुळेंच पंतांचें फार नुकसान झालें आहे. येवढ्या मोठमोठ्या विद्वानांचे केवळ स्तुतींनें भरलेले लेख विश्वस्तभावानें वाचून एकाग्रानें पंतकाव्याच्या अवलोकनास सुरवात केली व सुरवात केल्यानंतर त्याला त्या काव्यांत कित्येक दोष आढळून आले म्हणजे एकदम सर्वच पारडें उलटून जातें. या विवेचकांनीं दोष प्रकट न करितां मागें ठेवले व गुणांचें अतिशयोक्ति-पूर्ण वर्णन केलें आहे असें त्यास वाटावयास लागून त्यांच्यावरचा त्याचा विश्वास उडून जातो व एकदां मन फिरलें म्हणजे लंबकाप्रमाणें उलट टोकाला जाऊन पंतांचें काव्यही त्यास दोषपूर्ण असेंच वाटावयास लागतें. तेव्हां प्रथम-पासूनच समतोल दृष्टि ठेवून गुणांप्रमाणेंच दोषांचेंही स्पष्टपणें विवरण करणें हेंच रास्त व परिणामाच्या दृष्टीनें अधिक फायद्याचें होय. आमच्या कवींचा गुणसमु-च्चय मोठा आहे अशी जर आमची खात्री आहे तर यथार्थदर्शनास आम्ही कां भ्यावें? त्यांचे गुण केव्हांही दोषांपेक्षां प्रभावी ठरतीलच; मग दोषांची बाजू लप-वून खोटा आभास उत्पन्न करण्यांत फायदा कोणता?

असो. मम्मटादिक साहित्यशास्त्रकारांनीं काव्याचे जे दोष म्हणून सांगितले आहेत त्यांच्या अनुरोधानें आम्हांला येथें दोषविवेचन करावयाचें नाहीं. अनेक कारणांस्तव तसें करणें इष्ट होणार नाहीं. सामान्य सहृदय वाचकाला काव्य या दृष्टीनें पंतांचे ग्रंथ वाचीत असतांना कोणकोणचे दोष आढळून येतात व ते काव्याच्या रसास्वादाला कसा अडथळा करतात हेंच पुढील विवेचनांत मुख्यत्वें-करून दाखवावयाचें आहे.

२. पंतकाव्यांमध्यें दोष नाहींत असें नाहीं; ते आहेतच. परंतु त्यांच्यासंबंधानें ही एक गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे कीं, ते दोष पंतांच्या असमर्थतेमुळे उत्पन्न झालेले नाहींत. इतर कवींच्या काव्यांत दोष राहतात याचें कारण प्रयत्न करूनही सर्वस्वीं निर्दोष असें काव्य त्यांना रचतां येत नाहीं हें होय. परंतु जे अगदीं ढोबळ असे दोष पंतांच्या काव्यांत आढळतात ते पंतांना टाळतां आले नाहींत म्हणून त्यांच्या काव्यांत राहिले आहेत असें मुळींच नाहीं. त्या दोषांची छटाही ज्यांत सांपडणार नाहीं असें निष्कलंक काव्य त्यांनीं पुष्कळच केलें आहे. अर्थात् त्या दोषांपासून अलिप्त असें काव्य त्यांना करतांच येत नव्हतें असें कोणी

म्हणू शकणार नाहीं. मग हे दोष उत्पन्न झाले आहेत कशानें ? दोष टाळ-ण्याची शक्ति असतांना मुद्दाम होऊन कोण त्यांचा लेप लावून घेईल ? वाटेंतले खांचखळगे टाळणें शक्य असतां स्वत: होऊन कोण त्यांत उडी घेईल ? परंतु पंत हे मुद्दाम आंधळे बनूनच असे खड्डयांत पडले आहेत असें म्हणणें भाग पडतें. कांहीं गोष्टींचा त्यांना इतका अपरिमित नाद लागला होता कीं, त्यामुळें ते अगदीं आंधळे बनले आहेत. या. पंतांना नाद लावणाऱ्या गोष्टी म्हणजे **यमकादि शब्दचमत्कार व भाषेचें संस्कृतीकरण** या दोन होत. त्यांच्या काव्यांत दिसून येणारे सर्व दोष यमकांचा हव्यास व संस्कृतीकरणाची हौस या दोहों-मुळेंच सर्वस्वीं उत्पन्न झाले आहेत असें पुढील विवेचनांत आपल्याला दिसून येईल. एकादा छांदिष्ट पुरुष आपल्या छंदाच्या पायीं आपणावर अनेक संकटें ओढवून घेतो तशी पंतांची स्थिति झाली आहे. इतर मराठी कवींना पंतांच्या या दोन नादांनीं पछाडलें नसल्यामुळें पंतकवितेंत दिसून येणाऱ्या दोषांपासून त्यांची कविता बहुतांशीं अलिप्त आहे असें दिसून येतें. असो. आतां दोषांच्या परिगणनास आरंभ करूं.

## [ १ ]

## ( १ ) क्लिष्टता व दुर्बोधता

३. पंतकाव्याच्या क्लिष्टतेविषयीं निंदकांनीं आजपर्यंत फारच गवगवा केला आहे. पंतकवितेवर वाक्प्रहार करण्याचें हें एक मोठें सुलभ व कधीं न लुलें पडणारें हत्यार होय, असें पंतदूषकांना आजपर्यंत वाटत आलें आहे. पंत-दूषकांच्या या गवगव्यामध्यें जरी कांहीं अर्थ नसला तरी क्लिष्टतेचा आरोप अजीबात झुगारून देण्याइतकी पंतकविता सर्वत्र सुलभ नाहीं हें कोणासही कबूल केलें पाहिजे. पंतांची कविता साधारणतः क्लिष्ट नसून सुगम व प्रसादपूर्ण असते. प्रसन्नता हेंच तिचें सहज स्वरूप होय; क्लिष्टता हें नव्हे. कांहीं विशिष्ट प्रसंगीं मात्र पंतांची कविता क्लिष्ट होते व ते विशिष्ट प्रसंग म्हणजे पंत जेव्हां दीर्घयम-कांच्या किंवा चित्रकाव्यरचनेच्या नादीं लागतात तेव्हांचे होत. ही क्लिष्टता पंतकाव्यामध्यें बहुधा पुढील तीन कारणांनीं उत्पन्न होते.—१. मराठी वाचकांस अत्यंत अपरिचित अशा संस्कृत शब्दांची योजना; २. दीर्घसमास; ३. दुरा-न्वय, घोटाळ्याची वाक्यरचना इ०. कित्येक कवींचा प्रतिपाद्य अर्थ व कल्पनाच

दुर्बोध, गुंतागुंतीच्या असल्यामुळे त्यांच्या काव्यास क्लिष्टता येते. अशा अर्थगत क्लिष्टतेचें उदाहरण संस्कृतांतील भारवि कवीच्या काव्याचें होय. ही अर्थगत क्लिष्टता पंतांच्या काव्यांत आढळत नाहीं. त्यांच्या काव्यांतील कल्पना कधींही गूढ, दुर्बोध किंवा आभासमय नसतात. असो. उपर्युक्त क्लिष्टतेच्या तीन्ही प्रकारांचें क्रमानें सोदाहरण विवेचन करूं.

४. (१) **अवघड व अपरिचित संस्कृत शब्द.** अशा शब्दांची योजना बहुधा सर्वत्र यमकांमुळेंच करण्याची पंतांवर पाळी आली आहे. जेथें जेथें हव्यासानें लांब यमकें साधण्याचा पंतांनीं प्रयत्न केला आहे तेथें तेथें अवघड शब्दांची अधिक प्रमाणांत योजना करणें पंतांना भाग पडलें आहे. कृष्णविजय पूर्वार्धांत आर्येच्या चान्ही चरणांत लांब लांब यमकें साधण्याचें बंधन त्यांनीं लावून घेतलें आहे. अर्थात् तेथें अपरिचित संस्कृत शब्दांचें प्रमाण सर्वांत जास्त झालें आहे.

ते पूतनिका स्वधिती । राष्ट्रांत फिरे, छळें मुळांला वधिती । कृ. वि.६.२

येथील स्वधिती (कुठार) हा शब्द केवळ यमकाकरितां घातला आहे. त्याचा अर्थ सामान्य मराठी वाचकांपैकीं कितीजणांना चटकन् समजेल याचा संशय वाटतो.

करि बहु परिदेवन, ' हा ! ' । म्हणत रडे, स्तन्यतृप्त परि देव न हा ।
वर्णें अभ्र, मुरडतां । प्रकृतिकडे, भासलीहि अभ्रमु रडतां ॥कृ.वि.६-१२.

हेंही पूतनेचेंच वर्णन आहे. स्पष्टीकरणार्थ कांहीं टीपा न देतां ही आर्या वाचण्यास दिली तर चांगल्या बहुश्रुत वाचकांतही कितीजणांना ही बिनचूक लावतां येईल ? ' परिदेवन ' ( रडणें ) हा मराठी वाचकास अपरिचित वाटणारा शब्द पहिल्याच चरणांत यमक साधण्याकरितां घातला आहे. परंतु ' अभ्रमु ' याच्या मानानें तो अगदींच सोपा ठरेल. अभ्रमु शब्दाचा अर्थ फारच थोड्यांस एकदम सांगतां येईल. पंतांना स्वतःला सुद्धां त्या शब्दावर टीप द्यावी असें वाटलें. अगोदर असले शब्द वापरून मग काठिन्यास्तव त्यांच्यावर टीप देत बसणें हा विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करण्याचा प्रकार थोड्यांसच पसंत पडेल ! ' [ कृष्णानें शरीरांतील रस शोषून घेतल्यामुळें ] वर्णें ( कांतीनें ) अभ्र ( अभ्रासारखी पांढरीफटक अशी ) [ ती पूतना ] प्रकृतिकडे ( आपल्या मूळ राक्षसी वृत्तीकडे ) मुरडतां ( वळली असतां ) [ शुभ्र वर्णानें व प्रचंडतेनें अभ्रमु (ऐरावतपत्नीच अशी) रडतां भासली ' असा सबंध आर्येचा अर्थ करावा-

करी आवृत्तीच्या संपादकांना टीपेंत द्यावा लागला आहे ! 'अभ्र' याचा ' अभ्रा-सारखी पांढरी फटफटीत ' असा लाक्षणिक अर्थ करावा लागतो, त्याचप्रमाणें ' मुडतां प्रकृतिकडे ' याचाही अर्थ लक्षणेनें जुळवून घ्यावा लागतो. असे क्लिष्टतेस कारणीभूत होणारे अनेक दोष या आर्येंत झाले आहेत. ' स्वधिति ' किंवा ' अभ्रमु ' या शब्दांप्रमाणेंच, वाल ( केस ) १. ३२; क्षणन ( हनन, वध ) १. ३९; शय ( हात ) २. २५, ८. २०, ९. १६, २२. १४, ६०; कीनाश ( यम ) २. २५; लकुच ( कहूलिंब ) ८. ३८; प्रह ( नम्र ) १२. २७; प्रघन ( सूर्य ) १६. ५; शरारु ( घातुक-पंतांची टीप ) १८. १५, ४४. १६; वन ( पाणी ) २२. २; लपन ( मुख ) २२. १६, ४१.१८; अंध ( अन्न ) २३ ७; अशनाया ( भूक ) २३. १२; सिक्थ ( ओदन ) २३. २९; वपानें ( मस्तीनें ) २३. ४३; अहार्य ( पर्वत ) २४. ७; करका ( गारा ) २५. ११; रसित ( मेघगर्जना ) २५. १३; शात ( सुख ) २८. ६; बलद ( जलद, शार-पाणी ) २९. १; अलिक ( कपाळ ) २९. २; संव्यान ( उत्तरीय ) ३२. १४; श्रील ( शोभादायक ) ३३. १८; गृष्टि ( एकदां व्यालेली गाय ) ३४. २१; हरिता ( दिशा ) ३४. २१; अमत्र ( पात्र ) ३४. २५; अवकेशी ( निष्फल वृक्ष ) ३६. २१; कशा ( चाबूक ) ३७. २; चंचरीक ( भ्रमर ) ३८. ३३; भुवन ( पाणी ) ३९. ६२; पाटीर ( चंदन ) ४१. २, ४२. २, ४८. १; महामात्र, आधोरण ( महात ) ४३. ३, ४; वलक्ष ( शुभ्र ) ४९. ५; कंबा ( कडू भोंपळयाची वेल-पंत ) ४७. ५५; रोलंब ( भ्रमर ) ४७. ५५; रंकु ( मृग ) ४७ ८१; पाथ ( पाणी ) ४७. १२४; असे अनेक अवघड शब्द कृष्णविजय पूर्वार्धांत आढळून येतात. कृष्णविजय पूर्वार्धाखेरीज इतरत्रही असले शब्द ठिकठिकाणीं आढळतात. उदाहरणार्थ - कृ. वि. उत्तरार्ध—क्ष्वेड ( विष ) ८३. १९; दाश ( कोळी ) ५५. ७; सौनिक ( हिंसक, कसाई ) ५७. ९; महोतु ( मोठें मांजर ) ६१. १२; ग्लह ( फांसा ) ६१ १२; हर्यक्ष ( सिंह ) ६३. ९; कीश ( वानर ) ६७. १८; मनु ( मंत्र ) ६८. १५; फेरु ( कोल्हा ) ७४. २०; लेलिह ( सर्प ) ७४. २२; सुपर्व ( देव. ' सुपर्वाणः सुमनसः ' ) ७९. १; उदन्या (तहान) ८३. १७४; वल्गा (लगाम) ८६. २५; शंपा ( वीज ) ५०. १२; दमुना ( अग्नि ) ८५. ९; भिदुर ( वज्र ) -मं. भा. १०. ६४८. एकंदरीनें पाहतां शब्दचमत्कारांचा नाद ज्यांत विशेष

दिसून येतो अशा महाभारत, कृष्णविजय इ० काव्यांत अशा कठीण संस्कृत शब्दांचा प्रयोग विशेष आढळतो. असे बहुतेक शब्द यमक प्रास जुळविण्याकरितांच पंतांना आणावे लागले आहेत हें तीं तीं स्थळें पाहिल्यास दिसून येईल. ज्यांनीं अमरकोश म्हटला आहे व संस्कृत काव्यनाटकांचें चांगलें परिशीलन केलें आहे अशा व्युत्पन्न वाचकांस यांतील बरेचसे शब्द अपरिचित वाटणार नाहींत हें खरें. तथापि सामान्य मराठी वाचकांकडून इतक्या व्युत्पत्तिज्ञानाची अपेक्षा करणें अप्रयोजकपणाचें होईल. अशा शब्दांनीं भाषेस काठिन्य येतें. शिवाय त्यांनीं भाषेची स्वभावसुंदरता व तिचा मराठीपणा नष्ट होऊन तिला बोजडपणा येतो व त्यामुळें काव्यसौंदर्याची हानि होते ही गोष्ट निराळीच.

५. ( २ ) **दीर्घ समास**—पंतांच्या काव्यांत दीर्घ समास वारंवार येतात व ते भाषेच्या दुर्बोधतेस कारणीभूत होतात या दोन्ही गोष्टींची सिद्धता करण्याची मुळींच जरूर नाहीं. अशा दीर्घ समासांतील अर्थही मोठा सुंदर असतो असें नाहीं. कल्पनाचमत्कृतीच्या व रसपरिपोषाच्या दृष्टीनें असे समास बहुधा निरर्थक; किंबहुना अनर्थकच असतात. दीर्घ समासरचना ही बहुधा पंतांच्या संस्कृतीकरणाच्या हव्यासाचें फल होय. क्वचित् यमकानुप्रासासाठींही अशी बोजड समासाची रचना पंत करतात.

गति-जित-बाल-करेणु-।-श्रीश-पदांभोज-भक्त-पालक-रेणु ।
हे धन्य; विधि भवानी-।-पति लक्ष्मी वाहती शिरोंनुभवानीं ॥

कृ. वि. ३०. १३.

यांतील पहिलें अर्ध हा सर्व एक समास आहे. त्याचा अर्थ थोडक्यांत ' कृष्णाचे चरणरज ' असा आहे. समासांतील बाकीच्या पदांचा आशय कथानकाच्या दृष्टीनें व्यर्थ व अपुष्ट आहे.

गोपजनवधू लीला-।-नर-तनु-हरि-रथ-समुत्थ-नव-धूलीला ।
पाति; मन रमे; घाली । त्या चातकतति सुखांत ते मेघाली ॥

कृ. वि. ३९. ५८.

हा समास कांहींसा यमकाकरितां व कांहींसा प्रासाकरितां घातलेला दिसत आहे. यांतील ' लीलानरतनु ' हें पद अपुष्ट आहे, त्याचें येथें कांहींच प्रयोजन नाहीं.

परंतु समासदैर्घ्य हें पुष्कळ वेळां अदोषरूप किंवा गुणरूप देखील होत असतें. थोर, बिकट समासामुळें काव्यांत ओजोगुण निष्पन्न होतो. ' ओजः समास-

समूहस्त्वम्' अशीच ओजोगुणाची दण्डीनें व्याख्या केली आहे. अशा समास-घटित विकट रचनेमुळे निष्पन्न होणारा ओजोगुण हा वीर, रौद्र, भयानक या रसांना फार पोषक होतो. तेव्हां वीर, रौद्र, भयानक या रसांचा उत्कर्ष कर्तव्य असतां दीर्घ समासरचना उपकारकच होते.

> गदा ही दे, मायाशतनिपुणशत्रुप्रमथन-
> क्रियासिध्युत्साहा उपजवि, करी युक्तिकथन ।
> उठे काम क्रोधेंकरुनि कलितोद्दामगद या
> रिपूतें माराया, कलह करि, कैंची मग दया ॥ कृ.वि.५५.१८,१९.

हें वीररसाचें चांगलें उदाहरण असून येथें समास रसोत्कर्षास कारणीभूत झाला आहे. परंतु याहीपेक्षां सुंदर उदाहरण पुढील आर्येचें आहे.

> भट-मुकुट-रत्न-कैटभरिपु-पटुशर-पटल-पट रणीं फांके ।
> कां केवळ कटकाचि ? सखि, घटजठरीं दीपस रवी झांके ॥
>
> कृ वि. ८३. १४४.

कृष्णाच्या युद्धपाटवाचें हें वर्णन आहे. 'वीरशिरोमणि कृष्णाचा कुशल बाण-समुदाय हेंच कोणी वस्त्र,' असा समासाचा अर्थ आहे. बाणसमुदायरूपी वस्त्र सर्व सैन्यावर पसरलें व त्यास आच्छादितें झालें, हें रूपक तर सुंदर आहेच; परंतु घड्यांत ठेवलेल्या दिव्याप्रमाणें सूर्यही झांकून गेला ही उपमा तर बहारीचीच आहे. येथें दीर्घ समासामुळें व 'ट' च्या कठोर अनुप्रासामुळें वीररसाचा उत्कर्ष होऊन तो फारच खुलला आहे.

६. (३) दुरान्वय. घोटाळ्याची वाक्यरचना, संदिग्धता इ०. हे वाक्यदोषही पंतांच्या काव्यांत पुष्कळ अंशीं यमकानुप्रासांच्या हव्यासामुळेंच आले आहेत. एकाद्या कवीचें भाषेवर कितीही जरी प्रभुत्व असलें तरी पदोपदीं जर तो वर्णनियमांनीं आपल्यास बांधून घेऊं लागला तर इकडचीं पदें तिकडे करणें, आवश्यक पदांचा अध्याहार करणें, अनवश्यक पदें घुसडून देणें वगैरे अनेक लटपटी त्यास कराव्या लागतात व त्यांमुळें बिचाऱ्या अर्थाचे शोचनीय हाल होतात. ज्यांमध्यें शब्दचमत्कारांवर विशेष भर आहे अशा महाभारत, कृष्ण-विजयपूर्वार्ध या काव्यांमध्यें क्लिष्ट व किचकट आर्या पुष्कळच आढळतात. त्यांपैकीं नमुन्यासाठीं चार पांच आर्या खालीं दिल्या आहेत. त्यांचा अर्थ

पूर्ण समाधानकारक रीतीने लावतां आल्यास पाहिजे आहे. वाचकांनी त्यासाठीं प्रयत्न करावा.

होय, सकृप गोज जनीं । या तव नाभ्यमृतसद्हृदयोजजनि ।
मीं जरि, तरि यवसाचें । या वनिंच्या भाग्य हें सदवयव साचें ॥
कृ. वि. १४. ५.

ही ब्रह्मदेवानें केलेल्या कृष्णाच्या स्तुतींतली आर्या आहे.

हे पीयूषघन; तगे । ताप न; होती विनष्टविपदघ नत गे ।
स्वविधि कसा गरळ वसे । तीचें पद गमति अमृतसागर लवसे ॥
कृ. वि. ३०. ३५.

कृष्णानें एकाच गोपीवर विशेष प्रेम दाखविलें व तिच्यासह तो गुप्त झाला तेव्हां इतर गोपींना वैषम्य वाटून त्यांनीं काढलेल्या उद्गारांतील ही आर्या आहे. हे=श्रीकृष्णपदरजःकण.

रासीं हरिच्या तूर्यें । क्षीरनें ज्यांत कोटिभरि चातूर्यें ।
हा महिमा जीवाचा । तद्गुकेरससिंधुमग्न मार्जी वाचा ॥ कृ. वि. ४७. ४.

हा=उद्धवहि-पंत. उद्धवाची गोपींनीं एकांतात भेट घेतली त्या समयींची ही आर्या आहे. हिचा सुसंगत असा कांहींच अर्थ लागत नाहीं.

पाहे प्रणता तोका, नव्यासम हाक विप्र सादास ।
विप्राच्या दे, न करी न व्यास महाकवि प्रसादास ॥
स्वर्गारोहण २. ४१.

महाभारताच्या अंतीं आपल्या आप्तेष्टांचें व व्यासादिकांचें स्मरण करून पंतांनीं ज्या आर्या लिहिल्या आहेत त्यांतील ही एक आहे. हिचा अर्थ काव्यसंग्रहकार एक देतात, पांगारकर त्याहून भिन्न देतात तर पराडकर तिसराच देतात! कोणी म्हणतात, ही व्यासांस उद्देशून आहे तर कोणी म्हणतात, विठोबादादांस उद्देशून आहे! इतरांनींही आपआपल्या अकलेप्रमाणें यांत आणखी शकला लढवाव्या. हा सर्व महाघोटाळा अक्षरा अक्षरी यमक जुळविण्यासाठीं पंतांनीं माजविलेला आहे.

हरि जन अरिजे न परिजन करि जननि ! प्राज्ञजनसभे ! काय ? ।
हा दास यास हास न्नास नसो; शिशुसि निंदिना माय ॥ स्वर्गारोहण२.४८.

हीही महाभारताच्या उपसंहारांतीलच आर्या असून हिच्या अर्थाविषयींही असेच मतभेद आहेत. पूर्वार्धाचा पदच्छेद कसा करावयाचा याच्या विष-

र्थांही एकमत नाहीं. येथे प्रासांच्या नादीं लागून पंतांनीं प्रसादाचें गूळखोबरें केलें आहे !

## ( २ ) कृत्रिमता, बोजडपणा व बेडौलपणा.

७. हा दोष पंतांच्या काव्यांत कित्येक ठिकाणीं दिसून येतो. हा मुख्यत्वेंकरून पुढील दोन तीन गोष्टींमुळें पंतांच्या भाषेंत उत्पन्न झाला आहे.—१. संस्कृत शब्दांची प्रचुरता किंबहुना अतिरेक; २. मराठींत सरास उपयोगांत आणण्यास नालायक असा अपरिचित संस्कृत शब्दांचा अगदीं घसटींतल्या देशी शब्दांप्रमाणें उपयोग ३. दीर्घ समास.

८. ( १ ) **संस्कृतशब्दप्राचुर्य.**—पंतांची भाषा संस्कृतशब्दप्रचुर असते हें सुप्रसिद्ध आहे. आणि मराठी भाषा जास्त संस्कृतप्रचुर होऊं लागली म्हणजे तिचा मराठीपणा नष्ट होऊं लागून एक प्रकारचा कृत्रिम बोजडपणा तिच्या अंगीं येत असतो. संस्कृत शब्दांची अतिशय योजना झाल्यामुळें भाषा संस्कृतमय झाली आहे असा रा. पावगी यांचा ' विलायतचा प्रवास ' ( विशेषतः पूर्वार्ध ) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. अलीकडचे कवि रा. विद्याधर वामन भिडे यांची कविता संस्कृतशब्दप्रचुर असते असें म्हणतात. पंतांचीही कविता पुष्कळ ठिकाणीं अशाची त्यापेक्षां जास्त संस्कृतशब्दप्रचुर असते ही गोष्ट नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. पंत स्वतः उत्कृष्ट विद्वान् पुराणिक होते आणि उत्तम विद्वान् पुराणिकाचें जसें कवित्व असावें तशीच त्यांची कविता उतरली आहे. आणि संस्कृतांतल्या सर्व गोष्टी मराठींत आणून भरण्याचा मोठा नाद त्यांस असल्यामुळें जेथें तेथें संस्कृत शब्द योजण्याची त्यांना भारीच हौस वाटत असे.

पंतांची भाषा इतर कवींच्या भाषेपेक्षां, पौराणिक कथानकांवर लिहिणाऱ्या कवींच्या भाषेपेक्षांही, जास्त संस्कृतप्रचुर असते ही गोष्ट प्रत्यक्ष पुराव्यानें सिद्ध करून देतां येण्याजोगी आहे. खालीं मुक्तेश्वर व मोरोपंत या दोघांच्या काव्यांतील सारख्याच कथानकांवरचे दोन लहानसे उतारे दिले आहेत. यांतील शब्दसंख्या मोजून त्यांमध्यें शुद्ध संस्कृत म्हणजे तत्सम शब्दांचें प्रमाण किती आहे हें काढलें असतां पंतांची भाषा मुक्तेश्वरांच्या भाषेहून जास्त संस्कृतप्रचुर आहे हें तात्काळ दिसून येतें. शिवाय मुक्तेश्वर व पंत या दोघांच्या रचनाशैलींमध्यें कसा व केवढा फरक आहे हेंही ठळकपणें नजरेंत भरण्यास हीं समकक्ष अवतरणें चांगलीं उपयोगीं पडतील. वर्षाविषयावरील मुक्तेश्वराची झेप कशी वाखाणण्याजोगी आहे व पंतांची द्रुतगति

आर्या कशी घोडदौडीसारखी भासते हेंही अवश्य निरीक्षण करण्याजोगें आहे. उतारे समुद्रमंथनाच्या कथेंतील आहेत. देवदानव मंदरपर्वत घुसळूं लागले व भगवंतानें कूर्मावतार घेतला त्या प्रसंगींचें वर्णन आहे.

सागरीं निक्षेपितां अचळ । भेदूनि चालिला पाताळ । ते वेळे धांवोनि लक्ष्मी-लोळ । कमठ झाला तळवटीं ॥ ८१ ॥ उदधि डोलतां मंदरगिरी । पुढती कंबु-चक्रधारी । हस्त ठेवूनि पर्वतशिखरीं । लोट आगें सांवरिला ॥ ८३ ॥ वेष्टिला असतां विषयव्याळें । विवर्ती भोवतां जडजीव अचळें । त्यातें कृपेनें वैकुंठपाळें । हस्त माथां ठेविजे ॥ ८४ ॥...पोट रगडतां व्यालवदनीं । अग्निज्वाळा लागली गगनीं । गरळ वामितां सिंधूचें पाणी । कढों लागलें खळखळां ॥ ९२ ॥ स्फुलिंग लागतां अळुमाळ । यंत्रमुखी उठती ज्वाळ । तेवि ओढितां सांडी व्याळ । विषानळ भडभडां ॥ ९३ ॥ तप्तकांचनरसाचा लोट । तेवीं फूत्कारी काळकूट । वर्षतां दैत्यांचे संघाट । जळों लागले त्यावेळीं ॥ ९४ ॥ मुक्तेश्वर; आदिपर्व अ० ४.

वरील उताऱ्यांत एकंदर ९८ शब्द असून त्यांपैकीं ५१ तत्सम (शुद्ध संस्कृत) आहेत व ४७ तद्भव, देशी वगैरे बाकीचे आहेत. म्हणजे यांत शेकडा ५२ शुद्ध संस्कृत व शेकडा ४८ तद्भव, देशी वगैरे, असें शब्दांचें प्रमाण निघतें. आतां पंतांच्या " अमृतमथन " नामक खंडकाव्यांतील त्याच प्रसंगींचें वर्णन:—

गरमग्नगिरिस पृष्ठीं धरि, होय क्षीरधींत कासवसा ।
उपदेशी कीं माझी स्वस्थ सुजन हो ! धरूनि कास वसा ॥ ४० ॥
गगनगदुग्धाब्धिमथनकुतुकप्रेक्षक सुरांत राहूनी, ।
कवळी अजित नगाच्या डळमळतां मस्तकासि बाहूंनीं ॥ ४३ ॥
वासुकिच्या बहुनासामुखनयनांतूनि बहु गळे गरळ ।
तद्धूमानलहतरुचि असुर गमति दावहत जसे सरळ ॥ ४५ ॥
वासुकिच्या श्वासविषज्वलनें तो देवगणहि होरपळे ।
एका प्रभुला पाहुनि विषवाहि, जसाचि विधुसि, चोर पळे ॥ ४६ ॥

या उताऱ्यांत एकंदर शब्द ६७ असून त्यांपैकीं ४५ तत्सम संस्कृत व २२ तद्भव, देशी वगैरे आहेत. म्हणजे तत्सम संस्कृत शब्द देशी शब्दांच्या दुपटीनें असून त्यांचें शेकडा प्रमाण ६७ इतकें निघतें. मुक्तेश्वरांत हेंच संस्कृत शब्दांचें प्रमाण शेकडा ५२ आहे हें आपण पाहिलेंच. अशा रीतीनें पंतांची संस्कृतप्रचुरता प्रत्यक्ष आंकड्यांनीं सिद्ध होऊं शकते. वरील आर्या मुद्दाम जास्त

संस्कृतशब्दमय म्हणून निवडलेल्या नसून त्या पंतांच्या नेहमींच्या वाटणीच्याच आहेत हें येथें सांगून ठेविलें पाहिजे. अगदीं समान कथाभागाचा प्रसंग काढून त्यांतील सारख्या अर्थाचींच दोन्ही कवींचीं वर्णनें दिलीं आहेत. विसदृश असा वर्णनाचा भाग सर्व गाळून टाकला आहे. त्यामुळें या दोघां कवींच्या वर्णन-शैलींची भिन्नता उताऱ्यांवरून पूर्णपणें लक्षांत येणार नाहीं. मुळांतील सर्व प्रसंग वाचून पाहिल्यासच त्याचें ज्ञान होईल. तथापि अगदीं सारख्या अर्थांचें वर्णन देखील दोघां कवींनीं त्यांतल्यात्यांत किती निराळ्या रीतीनें केलें आहे हें वरील उताऱ्यांत दिसून येईलच आणि दोघांही कवींच्या स्वतंत्र रचनाकौशल्याविषयीं कौतुकही अवश्य वाटेल.

नुसते वरील उतारेच पाहिले तरी मुक्तेश्वराच्या भाषेंत जो ठसठशीतपणा व जें मराठपण आढळतें तें पंतांच्या वाणींत दिसून येत नाहीं. उलट त्यांची भाषा कांहींशी कृत्रिम व बोजड वाटते. यावरून संस्कृत शब्दांची अतिरिक्त योजना केल्यानें काय हानि होते तें स्पष्ट नजरेस येईल. तरी मुक्तेश्वर हा विद्वान् ब्राह्म-णांच्या कुळांत निपजलेला संस्कृतज्ञ कवि होता. अर्थात् त्याच्या कवितेंत संस्कृ-ताचें वळण बरेंच दृष्टीस पडतें. आमच्या साध्या, खेडवळ मराठी भाषेच्या लडिवाळपणाचा व मनमोकळेपणाचा खेळ डोळे भरून कोणास पहावयाचा असेल तर त्याला तुकाराम–नामदेवांच्या अभंगांकडे वळलें पाहिजे.

आणीक म्यां कोणा यावें काकुळती । कोण कामा येती अंतकाळीं ॥
तूं वो माझी सखी होसी पांडुरंगे । लवकरी ये गे वाट पाहें ॥
काया वाचा मनें हेचि आस करीं । पाउलें गोजिरीं चिंतीतसें ॥
तुका म्हणे माझी पुरवीं हे आस । घालीं ब्रह्मरस भोजन हें ॥

या अभंगांतले ३२।३३ शब्द तद्भव व देशी असून केवळ ८।९ शब्द संस्कृत आहेत. म्हणजे संस्कृत शब्दांचें प्रमाण केवळ शेकडा २० झालें. आणि संस्कृत शब्द आहेत ते तरी कोणते ? तर काया, वाचा, भोजन, अंत, हे अगदीं खेडव-ळांच्या भाषेंत देखील मिसळून जाऊन भाषेशीं समरस झालेले असेच आहेत असल्या साध्या शब्दांनीं भाषेला तरी कांहीं कमीपणा आला आहे काय ? उलट ती अधिकच गोड, सुंदर व गोंडस बनली आहे.

९. संस्कृतशब्दप्राचुर्याचा हा जो आम्ही दोष म्हणून उल्लेख केला आहे तो केवळ त्याच्या अतिरेकास अनुलक्षून होय, हें मुद्दाम येथें सांगितलें पाहिजे.

आणि असा अतिरेक पंतकाव्यांत सर्वत्र दिसून येत नसून कित्येक ठिकाणींच मात्र आढळतो हेंही अवश्य ध्यानांत ठेवलें पाहिजे. देशी भाषांमध्यें संस्कृत शब्द घेऊं नयेत असें कोणीच म्हणत नाहीं व म्हणणेंही शक्य नाहीं. आपल्याला जसे पाहिजेत तसे व जितके पाहिजेत तितके शब्द संस्कृतांतून घेणें हेंच रास्त होय. कारण आपल्या हक्काचें तें अक्षय्य भांडारच आहे. विशेषत: शास्त्रीय व विवेचन-प्रधान ग्रंथांत अवश्य ते पारिभाषिक शब्द संस्कृतांतूनच घेतले पाहिजेत. परंतु काव्याच्या संबंधानें दृष्टि थोडीशी निराळी ठेवली पाहिजे. भाषेच्या रमणीयतेस व सौंदर्यास बाधक होईल असा कोणताही अतिरेक काव्यामध्यें दूषणीयच ठरेल. संस्कृत शब्दांविषयीं, मराठींत रुळलेले न रुळलेले, परिचित अपरिचित, साजणारे न साजणारे, असे कांहीं एक तारतम्य न बाळगतां सर्व संस्कृत शब्दांचा अमर्याद उपयोग करणें हें केव्हांही इष्ट होणार नाहीं. ही भाषा मराठी आहे, संस्कृत नव्हे हें केवळ क्रियापदावरून व एखाद्दुसऱ्या विभक्तिप्रत्ययावरून ओळखण्याची पाळी यावी ही स्थिति कोणीही चांगली म्हणेल असें वाटत नाहीं. म्हणूनच

सचेतःकैरवातें विकच करि जगत्ताप संपूर्ण टाळी
अज्ञानध्वांत सारे हरि, रसिकचकोरांसि अत्यंत पाळी ।
नाना वस्तु प्रकाशी, कविहृदयपयोराशिसंतोषहेतु
काव्येंदु स्वप्रभेनें खलविरहिजनीं होतसे धूमकेतु ॥ मं. रा. उपसंहार ८.

या, किंवा वदान्यजनसद्गुरो ! प्रशमितामितासन्मदा ! ।
गदारिदरनंदकांबुजधरा ! नमस्ते सदा ॥ केका. १.

अशा गीर्वाणशब्दखचित उद्गारापेक्षां

श्रीरामा तूं स्वामी असशी माझ्या शिरावरी जागा ।
आम्हांसि तुझ्या पायांवांचुनि निर्भय नसे दुजा जागा ॥ आर्याकेका. १.

हे पंतांचेच, अंतःकरणाच्या उमाळ्यासरशीं निघालेले, साधे, अकृत्रिम उद्गार जास्त हृद्य होत असें कोणास वाटल्यास तें गैर म्हणतां येणार नाहीं.

**१०. (२) अरूढ शब्दांचा अगदीं रुळलेल्या शब्दांप्रमाणें प्रयोग.** मराठीमध्यें संस्कृतांतील जे शब्द रूढ झालेले नाहींत व कांहीं केलें तरी रूढ होण्याचा संभव नाहीं असे शब्द सामान्य मराठी शब्दांप्रमाणें सर्व विभक्तींचे प्रत्यय लावून वापरण्याची पंतांची प्रवृत्ति दिसून येते. ही पुष्कळ अंशीं संस्कृती-करणाच्या हव्यासामुळें व कांहीं अंशीं यमकांच्या आवडीमुळें उत्पन्न झालेली

होय. 'ओकस्' ( घर ) हा एक अशा तऱ्हेचा शब्द होय. गृह व गेह हे याच अर्थाचे संस्कृत शब्द आहेत. ते मराठींत रूढ झाले असल्यामुळे सर्वजण त्यांचा वाटेल तितका प्रयोग करतात परंतु 'ओक' या शब्दाचा तसा करीत नाहींत. उ०—'खचित नग सकळ देहीं, गेहीं तहींसि मायिना कांहीं' मं. भा. १०.१६७. येथें 'गेहीं' याच्याऐवजीं 'ओकीं', असें घालून 'ओकीं तहींसि मायिना कांहीं' असें लिहिल्यास किती वाईट दिसेल याची सहज कल्पना होईल. संस्कृतांत देखील हा शब्द अगदीं अरूढ असून त्याचा सुटा प्रयोग फार करून करीत नाहींत. बहुतेक दिवौकस् सारख्या समासांमध्यें हा योजलेला आढळतो. पण पंत मराठींत देखील याचा बिनदिक्कत वाटेल तेथें प्रयोग करतात. अर्थातच तो अतिशय वैरस्यावह होतो. उदा०—' आ हृदओकामधुनीं,' कृ. वि. १६. ५२. 'न पाहती ओकासी' कृ. वि. १६. २०, 'केला नाहींच उद्धवा! ओक' मं. भा. ११.२५९ 'ऐसें गावूनि सेविलें ओक' मं. भा. २१. ५२४ इ० इ०. त्याचप्रमाणें दुसरा शब्द 'इन, ( स्वामी, श्रेष्ठ ) हा होय. स्वामी, श्रेष्ठ या अर्थी संस्कृतांत देखील हा शब्द फारसा वापरलेला दिसत नाहीं. पण पंतांनीं याचा प्रयोग फार, कंटाळवाणा होईल इतका, केला आहे. 'वीना,'! कृ. वि. १६. ७, १७. ५, 'बुडवी शोकनदीन' कृ. वि. १६. २५; 'खळदमना सकळेना!' कृ. वि. १६.४५; 'जाणोनि हरादीना' कृ. वि. १६. ३८; 'हे एकाच अध्यायांतील प्रयोग. याशिवाय, कृ. वि.—'मोदनदीना,' ३९. ४७; 'त्रिजगदिन' ४१. ६; 'सेना सेना शरातीं धरि भय' ७६.१०; 'घोटकरीन,' १८. १३; 'करीना' ४३. ३; 'सुकवीन', मं. भा. १०. ८७२;—अशीं या एकाच शब्दाचीं शेंकडो उदाहरणें काढून दाखवितां येतील. 'रामावांचुनि दावा ( अरण्याला ) गेला' कृ. वि. १६—१९; येथें 'दाव' शब्दाचा किती अनुचित प्रयोग केला आहे! असेच याद ( जलजन्तु ), मन्तु ( अपराध ), आगः ( अपराध ), दर ( शंख ), अरि ( चक्र ), वाडव ( ब्राह्मण ), अग ( वृक्ष ) वगैरे अनेक शब्द अशा रीतीनें योजिले आहेत. संस्कृतांतील कित्येक अरूढ क्रियापदेंही अशा रीतीनें मराठींत आणण्याची पंतांची प्रवृत्ति क्वचित् दिसून येते. 'ते यदु जाले द्रवते ( पळते ),' कृ. वि. २. ८; 'प्राणी जो जो घ्याला ( प्याला ),' 'धरणीला अव' कृ. वि. ३. ९. 'त्या परमोदारासी नटतीं ( नाचतां ),' कृ. वि. ३३. १४. द्रु पळणें, धे ( धा )—पिणें, अव—रक्षणें, नट्—नाचणें हे सर्व अस्सल संस्कृत धातु आहेत.

. अरूढ शब्द अगदीं रुळलेल्या शब्दांप्रमाणें सररास वापरण्याच्या या प्रकारा-मुळेंही पंतांची भाषा बरीच कृत्रिम व बेडौल झाली आहे. संस्कृत शब्दांचा अतिरेक करण्याच्या प्रवृत्तीचाच हा एक भाग होय.

( ३ ) दीर्घ समास.—यांविषयीं पूर्वी विवेचन केलेंच आहे; तेव्हां येथें पुनरुक्ति नको. लांबलचक समासांमुळें भाषेस कशी कृत्रिमता आली आहे हें तेथें दिलेल्या उदाहरणावरून दिसून येतच आहे.

## ( ३ ) संस्कृतीकरणाच्या सोसामुळें आलेले आणखी कांहीं प्रकार.

११. ( १ ) संस्कृत विभक्तिरूपें.—पुष्कळ ठिकाणीं संबोधनाचीं रूपें संस्कृत व्याकरणाप्रमाणें साधलेलीं पंत योजितात. उ०—' साधो ! ' कृ. वि. ३०. १३; ' जंबूरो ! ' ३०. १२; त्याचप्रमाणें देवि, शुभांगि, माहे, इ०. दुर्वासस् या संस्कृत शब्दाचें मराठींत सामान्यतः दुर्वास असें रूप वापरलें जातें. पंत दुर्वासाः या संस्कृत रूपास अनुसरून दुर्वासा असें रूप योजितात. तथापि संस्कृतांतील द्वितीया चतुर्थी इत्यादि विभक्तींचीं रूपेंही मराठींत आणण्यापर्यंत पंतांची मजल फारशी जात नसल्यामुळें हा प्रकार फारसा दोषास्पद मानितां येत नाहीं.

( २ ) संस्कृत लिंगें.—संस्कृतांतील शब्द मराठींत घेतांना पुष्कळांच्या लिंगामध्यें फरक होतो. परंतु या फरकास न जुमानतां पंत पुष्कळदां मूळ संस्कृतांतलींच लिंगें उपयोगांत आणतात हें सुप्रसिद्ध आहे. कृ वि.—' कृष्णाचीं प्रिय मित्रें, ' १७. १०; ' चित्तें मित्रें जालीं तटस्थ, ' १९. १०; ' कंसाचें आग, ' ३८. ५; ' प्रेमा त्याचा, ' ३९. २६; ' विघ्न जाला, ' ३९. ३४; ' पितृभगिनीचें अत्र, ' ४९. १७; ' नवीं नानावस्तु विलोकिलीं न तसीं मानवीं, ' ७५. १४; मं. भा.—' नृरत्नाचें जन्म, ' १. १४; ' शपथ वाहिले शतदा, ' ९. ४१; ' ते प्रभुद्वार उन्मत्त तसे वदले ' १०. ११३९; इ० इ०. परंतु कित्येक वेळां संस्कृत लिंगाचा त्याग करून मराठींत रूढ झालेंलें लिंगही पंतांनीं योजिलेलें दृष्टीस पडतें. उदा०—' आमुची दारा, ' मं. भा. ९. १७३. तेव्हां या बाबतींत कोणत्याही एका तत्वास पंतांनीं सर्वथा अनुसरलें नसून मनसोक्त वागण्याचा क्रम ठेविला आहे असें दिसतें. तथापि एकंदरीनें संस्कृत लिंगाकडे त्यांचा कल अधिक दृष्टीस पडतो.

**( ३ ) संस्कृत वाक्यें अथवा वाक्यखंड यांचा प्रयोग.**—मराठींत काव्य रचीत असतांना मध्येंच संस्कृतांत उद्गार काढण्याची पंतांना लहर येते. संस्कृताकडे त्याचें मन सदैव कसें ओढ घेत होतें हें यावरून चांगलें दिसून येतें. असे संस्कृत वाक्यखंड पंतांच्या काव्यांतून शेंकडों काढून दाखवितां येतील. त्यांपैकीं ' युगान्तक्षमो नमोरोऽसीति वन युधिष्ठिरं प्रभुं कोन ? ' सभा. असे कांहीं प्रसिद्धच आहेत. त्याचप्रमाणें—

ऐसें म्हणतां स्त्रीच्या कंठीं घालुनि मिठी म्हणे, ' अयि ते ।
कथमेवमुकमदयं तदयं किमनुष्ठितुं क्षमो दायेते ' ॥ आदिपर्व १९.

ही आर्या अधिक संस्कृतांतच रचलेली आर्याही निबंधमालाकारांनीं उचलकीस आणलेल्या ' अनुष्ठितुं ' या अपाणिनीय प्रयोगामुळें विशेष प्रख्यातीस आली आहे. कित्येक ठिकाणीं मूळ ग्रंथांतलें संस्कृत अवतरण पंत आपल्या काव्यांत गोंवतात.

गरुडुनि जों मुनि म्हणति ' कं धास्यति ' तोंचि इंद्र ' मां धाता ' ।
मं. भा. ९. ८१.

येथील 'कं धास्यति' 'मां धाता' हीं प्रश्नोत्तरें मूळ भागवतांतील आहेत. तसेंच—

' उर्वशि जाये घोरे ! तिष्ठ ' म्हणे; ती इमी विलाप करी ॥ मं. भा. ११. ५११.

येथें पुरूरव्याच्या तोंडीं घातलेले, ' जाये घोरे ! तिष्ठ ' हे उद्गार मूळ भागवतांतील आहेत.

'वत्सान्मुंचन्कचिदस-।-मय' इत्यादिकहि कथिति बोभाट ।
त्या निर्दोषगुणाचे ज्याचा जो दशशतास्य तो भाट ॥ मं. भा. १०.१५९.

या आर्येतील ' वत्सान्मुंचन्कचिदसमये ' हे गोपबालकांचे उद्गारही मुळांतलेच आहेत. परंतु ते आर्येंत बसवितांना पंतांनीं अगदीं अक्षम्य असा यतिभंग किंबहुना चरणभंग केला आहे. शिवाय ' इत्यादिक ' हा शब्द मराठी वाक्याचा अंश असल्यामुळें, त्याच्यामुळें ' असमये ' यांतील एकाराचा संस्कृत संधिनियमाप्रमाणें अकार केला आहे हीही चूकच झाली आहे.

एकंदरीनें मराठी कवितेंत मधून मधून संस्कृत वाक्यें घालण्याची ही पंतांची लकब फारशी चांगली आहे असें म्हणवत नाहीं. निवळ मराठी वाचक तर या प्रकाराला बिचकून जातीलच. परंतु काव्यसौंदर्याच्या दृष्टीनेंही एका भाषेंत दुसऱ्या भाषेचें असें मिश्रीकरण करणें शोभावह होत नाहीं. क्वचित् प्रसंगीं मात्र

कवींचे संस्कृत उद्गार अत्यंत उचित, जोरदार व रसोत्कर्षकारक असे असल्यास काव्यांत शोभून दिसतात. उदाहरणार्थ—

‘ अयि ! कांत, कांत, प्रियतम !’ असें गद्गद वदे
रडे लाजे ताप प्रबळ पतिविश्लेषदव दे ।
प्रभूतस्वेदाश्रुस्नपिततनु ती सेज भिजली
उठे आंतरवातें गडबडुनी आलींत निजली ॥ कृ. वि. ६२. १५.

येथील बाणासुराची मुलगी उषा इच्या तोंडीं घातलेले संस्कृत उद्गार खुलून दिसतात.

पंतभाषेंतील संस्कृतीकरणाचे आणखी प्रकार, म्हणजे १. विशेष्यांप्रमाणें विशेषणास विकृति करणें; २. नामधातु; ३. कर्मणिप्रयोग; इत्यादिकांची चर्चा मागें व्याकरणाविषयीं विवेचन करतांना केलीच आहे. ते काव्याच्या रसहानीस कारणीभूत होत नसल्यामुळें कोणीही विवेचक त्यांची दोषांमध्यें गणना करणार नाहीं. अर्थात् येथें त्यांची पुनरुक्ति करण्याची जरूरी नाहीं.

## ( ४ ) श्रुतिकटुता.

१२. अनुप्रास, यमक वगैरे शब्दचमत्कार वाङ्माधुर्यास अनुकूल आहेत ही समजूत चुकीची आहे. विशेषतः त्यांचा अतिरेक तर पदलालित्यास प्रतिकूलच होतो. त्यांतून अनुप्रास हा रसानुकूल वर्णांनीं युक्त असून त्यांत वर्णसाम्याचा कंटाळवाणा अतिरेक झालेला नसेल तर तो भाषामाधुर्यास पुष्कळ वेळां पोषक होतो. परंतु यमक व चित्रकाव्याचे अनेकविध प्रकार हे भाषामाधुर्यास अपकारकच होत. संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांपैकीं कित्येकांनीं तर यमकाविषयीं स्पष्टच अरुचि दर्शविलेली आहे. दण्डीनें यमकाविषयींची आपली नापसंती पुढीलप्रमाणें व्यक्त केली आहे.—

आवृत्तिं वर्णसंघातगोचरां यमकं विदुः ।
तत्तु नैकान्तमधुरमतः पश्चाद्विधास्यते ॥ काव्यादर्श. १. ६१.

‘ यमक हें नियमानें मधुर असतेंच असें कांहीं नाहीं, ’ असा या प्राचीन आलंकारिकानें यमकाविषयीं जरा सौम्य परंतु प्रतिकूल अभिप्राय दिला आहे. मम्मटाचार्यांचें मत तर याहीपेक्षां स्पष्ट आहे. ‘ तदेतत्काव्यान्तर्गडुभूतम्—इति नास्य भेदलक्षणं कृतम् ’ ‘ हें ( यमक ) काव्यांतल्या गांठीसारखें आहे म्हणून याच्या

भेदप्रभेदांच्या व्याख्या येथें आम्ही करीत नाहीं,' ( का. प्र. उल्लास ९ )—असें त्यांनीं म्हटलें आहे. हा अलंकार वाईट, तो चांगला, अशीं मतें देत न बसतां अलंकारादिकांचें स्वरूपलक्षण करणें एवढेंच ज्याचें काम ते साहित्यशास्त्रकार सुद्धां, कवीं नव्हे ते आपल्या मर्यादेबाहेर जाऊन यमकाविषयीं नापसंती व्यक्त करतात यावरून यमक हें रसास्वादास किती विघातक होत असलें पाहिजे हें लक्षांत येईल. संस्कृतांत यमकाचें बंड मुळींच नाहीं. कालिदासभवभूत्यादि महाकवींनीं त्याचा विशेष आदर केलेला दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. इतर कांहीं कवींनीं कृत्रिम शब्दचमत्कार केले आहेत. परंतु त्यांना काव्याच्या एकाद्या सर्गांतच बहिष्कृतांप्रमाणें डांबून ठेवलें आहे; त्यांना सर्वत्र काव्यांत मोकळेपणानें वावरूं दिलें नाहीं. यमकांचें बंड कायतें आमच्या मराठींतच आणि तेंही संस्कृत श्लोकवृत्तांचा प्रचार महाराष्ट्र वाङ्मयांत झाल्यानंतर माजलेलें आहे. मराठींतल्या वाङ्माधुर्याची जणू ओतीव मूर्तिच अशी जी ज्ञानेश्वरी तिच्यांत शब्दचमत्कारांचा थाट यत्किंचित्‌ही दिसून येत नाहीं हें सांगावयास नको.

माझा मऱ्हाटाचि बोल कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंके ।
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ १४
जिये कोंवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे । ( पाडें—तुलनेनें )
वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ॥ १५ ( बीक—महत्व, तेज )
ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा । (कळंभा—कलह)
बोलें इंद्रियां लागे कळंभा । एकमेकां ॥ १६. ज्ञानेश्वरी अ० ६.

आपल्या वाणीच्या मंजुळ नादानें गुंगून जाऊन ज्ञानेश्वरांनीं स्वतःच आपल्या भाषेच्या अलौकिक मोहकपणाविषयीं जे हे उद्गार काढले आहेत तेच त्यांच्या भाषेच्या मोहकपणाची व सौंदर्याची उत्कृष्ट साक्ष देत आहेत. आणि त्यांत यमकादिकांचा थाटमाट तर काठेंच दिसत नाहीं !

वर्ण्यविषय सुंदर व काव्यमय असला आणि त्या विषयाशीं कवीच्या हृदयाची तन्मयता झालेली असली म्हणजे भाषेंत माधुर्य, रसाळपणा व अवश्य तेवढें पदलालित्य आपोआपच उतरतें. यमकादि शब्दचमत्कारांमुळें हें माधुर्य येत तर नाहींच पण नाहींसें मात्र होऊन भाषा निस्तेज, श्रुतिकटु व कर्कश बनते. हीं दोन तत्वें लक्षांत घेतलीं म्हणजे पंतकाव्य हें श्रुतिकटुत्वदोषास कां पात्र झालें आहे हें सहज लक्षांत येईल. पंतभाषेंतील श्रुतिकटुत्वासंबंधीं, वरील विवेचनावरून पुढील

सिद्धान्त सहज बांधता येतील.---१. जेथें जेथें यमकादि शब्दचमत्कृतीविषयींचा पंतांचा हव्यास वाढलेला दिसून येतो. तेथें तेथें पंतांची भाषा नीरस व कटु झालेली दिसून येते; उदाहरणार्थ: कृष्णविजय पूर्वार्ध, कुशलवचरित, महाभारतांतील कित्येक आर्या इ०. २. ज्या ज्या काव्यांत वर्ण्य विषय सुंदर असून पंतांची त्याच्याशीं तन्मयता झाली आहे तेथें यमकांचा हव्यास कमी होऊन पंतांची भाषा कोमल, रसाळ व मधुर अशी उतरली आहे. उदा०---महाभारतांतील बरेच भाग, मंत्ररामायण युद्धकांड, मंत्रभागवत स्कंध १०, ११, श्लोक व आर्या केकावलि, भीष्मभक्तिभाग्य, कृष्णविजय अ० ८०-९०, इ० इ०. ३. जेथें यमकादिकांचा हव्यास फारसा नाहीं, परंतु वर्ण्यविषयांतली तन्मयताही विशेष प्रतीतीस येत नाहीं तेथें भाषा फार सुंदर नाहीं व अगदीं नीरसही नाहीं अशी सामान्य वठली आहे. उदा०---हरिवंश, मं भा. १-९, इ०. असो. श्रुतिकटुत्वानें युक्त अशीं पंतांच्या सर्व काव्यांतलीं पद्ये येथें एकत्र करणें अर्थात्‌च शक्य नाहीं. यास्तव त्याचे कांहीं थोडेसे मासले देऊन याविषयींचें विवेचन आटपतें घेणें इष्ट होईल.

( १ ) ' विधु! तुम्हि हे तुच्छ, विरे । न जड, निषाल्पद्रवैकहेतुच्छवि रे! ।
जिंतुनि तिसहि पळवि रवीं; । हरिमुखविधु अजित कठिनहृदुपळ विरवी '॥
कृ. वि. ७. ३९.

( २ ) श्रुतिविश्रमदा त्याली । पद्मपरागांगराग समदाल्याली । कृ. वि. १५.१४.

( ३ ) देवकि कुक्षिकंकुब्जा, । मित्रा नलिनी नमी सकौतुक कुब्जा ।
देहीं वक्रा सरळी । मनिं, तीसीं हचलि गोपशकास रळी ॥ कृ.वि. ४२.१.

( ४ ) शाल्वाशीं गांठि घाली हरि तंव, अहितप्रेरिता शक्ति आली
व्यालीची काय आली विभुविशिखतती तीस पीतां न घाली ।
श्रीमत्कृष्णाशुगालिक्षतरिपुरुधिरें तीं रणक्षोणि न्हाली ।
सौभाची शौर्यशालिप्रभुशरनिकरें चालनी व्यक्त झाली ॥ कृ वि. ७७. ७.

हा शेवटला श्लोक शाल्व व कृष्ण यांच्या युद्धाच्या वर्णनांतला आहे. येथें वीररस मुळींच पुष्ट झाला नसून भाषा कटु व कर्कश झाली आहे व श्लोक कांबलचक असल्यामुळें अधिकच कंटाळवाणा वाटत आहे. सबंध पद्यांखेरीज भाषेस कटुत्व आणणारे, जंबूद्रो, कृ. वि. ३०. १२; भूतवारिरुहर्यकीं, ३९. ८; भवद्घृदोकच्छेदें, ४५. ७७; हरओकामभुनो, १६. ५१; मूर्च्छद्रूपांशुच्छटीं, ६५. २४; असे शब्दप्रयोगही किती तरी काढून दाखवितां येतील. परंतु केवळ दिग्दर्शन करण्यापलीकडे त्याचा जास्त विस्तार करण्याची जरुरी नाहीं.

१३. पंतांच्या काव्यांमध्यें कटु व श्रुतिदुःखद अनुप्रास पुष्कळच दिसून येतात.

१. खळबळ खळबळ करि सखि ! सकळ विकळ धरिति न पळ बळ मळधी ॥
म्हणति सुर, ' पळति जळचर, विभुशरशुचि कडवि रिपुकटकजळधी ॥
कृ. वि. ८३. १४५.

२. सति अति नति रतिपतिमति भजनीं नैवेद्य मूर्तिचा खावा ।
कृ. वि. ८३.१६७.

३. होय चतुर्भुज मजवरि करि हरि अरिकरिहरी सदनुकंपा ।
कृ वि. ८३. १६७.

४. पतिप्रातिनिधिप्रति प्रभुवरस्त्रिया पाहती । कृ. वि. ५५. २७.

५. गळीं चुंबिति, भेटति, नाचविति सुशब्द पढविति ब्रह्मा ।
गोपीं सिकविति नति यतिपतिमतिरतिदा यदात्मज ब्रह्मा ॥ मं.भा.१०.१५८

या सर्व अनुप्रासांमध्यें वर्णांच्या आवृत्तीचा अतिरेक झाल्यामुळें ते दुःसह झाले आहेत. यमकांविषयीं तर विचारावयासच नको ! त्यांच्यामुळें भाषेस कटुता नेहमींच येते. वर कृष्णविजय पूर्वार्धांतलीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांत बहुतांशीं यमकच कटुतेस कारण झालें आहे. आणखी महाभारतांतील थोडींशीं उदाहरणें.—

१. तुरवि करुनि परकवचा अंगप तितउ पळसमय मनि मानें ।
भीमानें शर गणिलें अंगपतित उपळसम यमनिभानें ॥*द्रोणपर्व १२.१०४.

येथें १५ अक्षरीं यमक आहे. भाषेच्या कुरूपतेची सीमा झाली आहे. बारा अक्षरीं यमक —

२. समुपेक्षिलें ठकविलें पूतनामहिमानका पिरया सहसा ।
म्यां मारावें खळ ते कृतनामहि मानकापिस्यासह सा ॥* द्रोणपर्व २६. ६.

खालील उदाहरण वरच्यापेक्षां पुष्कळ बरें आहे. यमक १२ अक्षरांचें असूनही भाषेचा स्वाभाविकपणा पुष्कळ अंशानें कायम आहे.

३. मातेची सरि येना उपमातेला, अगाधबळ बा ! हा ।
काय तुपाची साजे उपमा तेला अगा धवळवाहा ॥ द्रोणपर्व. २४. २८.

## ( ५ ) यमकामुळें व मंत्ररचनेमुळें उत्पन्न झालेले व इतर कांहीं दोष.

१४. यमकें जुळविण्यासाठीं पंतांना नाना तऱ्हेच्या लटपटी लढवाव्या लाग-

* हीं उदाहरणें मांगारकरांच्या पुस्तकांतून घेतलीं आहेत. मो.च. पृ. ५४० ४१*

तात. पुढें दिलेला हा एक प्रकार होय.—' काळ ' पदोत्तर ' कूट ' । कूट तसा उसळला बळावर कूट ॥ कृ. वि. ४४. ११. येथें पुढच्या कूट शब्दाशीं यमक्या-करितां काळकूट शब्दाचा भंग करून त्यांतील ' कूट ' हा अवयव चरणाच्या शेवटीं आणला आहे. तसेंच—' दीर्घपूर्व प्रसाद ' ( ज्याचें पूर्वाक्षर दीर्घ आहे असा प्रसाद, म्हणजे ' प्रासाद ' ) कृ. वि. ५५. १३; ' परापूर्वमूर्ती ' कृ. वि. ५६. २८; ' गोपूर्वविंदा ' कृ. वि. ५७. ५०; ' अरापूर्वसंघ ' कृ. वि. ५१. ३, ' दंपतीच अपकार; ' इ० इ०.

पण यमकापेक्षां मंत्राचीं अक्षरें जुळविण्याकरितां पंतांना असल्या कोट्या फारच अधिक प्रमाणांत करणें भाग पडलें आहे. अशा कोट्यांचीं उदाहरणें अर्थात् मंत्ररामायण, मंत्रभागवत अशा मंत्रखचित काव्यांतच आढळतात. पैकीं नमुन्याखाल कांहीं दिलीं आहेत.—' सु ' दुजा ' व ' वर्ण आधीं, मग ' देव ' जयाचिया नामीं । ( वासुदेव ) मं. भा. २. ७४; ' वासु ' असा जो ' देव, ' मं भा. २. १०६; ' य ' विरामांसि म्हणे प्रभु, (जय, विजय), मं. भा ३. ७७; ' गर्त ' पुढें प्रथम ' अजी, ' ( अजीगर्त ), मं. भा. ९. १०३; ' यम ' उलटा जो, ( मय ), मं. भा. १०. ४७३; ' य ' प्रथम बंधु जीचा देह, अशी, । ( य अक्षरांतील प्रथम भाग ? ज्याचा बंधु असा, म्हणजे वाकलेला जिचा देह, अशी ) मं. भा. १०. ५१७. ' यगण ' जसा एक मुर्ती मात्र सरळ ( ।ऽऽ हें यगणाचें चिन्ह त्याप्रमाणें मुर्ती मात्र सरळ ), मं. भा. १०. ६३८. ' व ' पुढें मागें 'रा' ज्या, ( रावण ), मं. रा. ६.

शब्दांच्या अक्षरविन्यासाचा भंग करून त्यावर कोट्या करण्याची ही पद्धत कोणत्याही दृष्टीनें समर्थनीय ठरणें शक्य नाहीं. पंतांच्या शिवाय इतर कोणाही मराठी कवीनें असा प्रकार केला असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं खुद्द हंस व पांगारकर यांनाही पंतांच्या या प्रवृत्तीचें समर्थन करणें अशक्य वाटून त्यांनीं तिला दोषांमध्यें गणलें आहे. अर्थात् तिचें दोषरूपत्व केवळ निर्विवाद आहे.

१५. यमकाकरितां व वृत्तास जुळण्याकरितां शब्दांचीं स्वाभाविक रूपेंही पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं बदलून टाकिलीं आहेत; व मनास लागतील तशीं अपभ्रष्ट रूपें योजिलीं आहेत. 'दुगें' (दुर गे), भीष्म १. ४४; 'दोघ' (दोघे); ' होनि ' (होउनि) 'उंचलिता'( ऊचलिता ), हे शब्द पांगारकरांनीं दिले आहेत. यांशिवाय पुढील अपभ्रष्ट रूपें नजरेस आलीं.—कृ. वि.—' ऊजति ' ( लाजति ) ५. ४;

महिका ( महिका ) ८. १०, २९. १६; समर्डी ( सेवडी ) १२. १०; कच्छा ( कच्छाळया ) ११. २७; पवे ( पावे ) १३. ४७; लशी ( लाची ) १६. ४,५२; नद्या ( नद्या ) १७. १७; मना ( माना ) २५. ४४; सजि ( सजवि ) ३१. ३; रीती ( रिती ) ३१. ८; दिसा ( दिवसा ) ३१. १५; तां ( त्वां ) ३२. ८ ३७. ३०; अंवीं ( अवशीं–सायंकाळीं ) ३४. १८; बाहे ( बाहु ) ३६. ७; डावा ( डाव ) ३६. २०, ३७. १०; दोघ ( दोघे ) ३८. ३०; कवाप (कवाव) ३८. ४८; लाहे ( लाही ) ३९. १५; सर्नी ( स्वर्नी ) ४१. १३; तजी ( त्वजी ) ४९. ३८; तां ( त्वां ) ४७. ३५, बहुदीन ( दिन ) ४७. ३१; तीं (तीन) ५४.३०; घतो (मारो, हा शब्द चमत्कारिकच आहे) ५४.३२; मं.भा.– बाविस (बावडीस-विहिरीस) ४.१४१; वार्धक (वार्धक्य) ६.७;नवाजा (नावाजा-वाजाणा) ६.७१; लिपूनि (लिंपूनि) ७ ८८; कंची (कैची) ९.१० हे असले प्रकार उघडपणे यमकाकरितां व वृत्ताकरितां मुद्दाम केले असल्यामुळें भाषेच्या अशुद्धतेमध्यें गणतां येणार नाहींत. ते काव्यदोषांमध्येंच गणले पाहिजेत. पंतां-प्रमाणें इतर श्लोकबद्धरचना करणाऱ्या कवींच्या काव्यांतही असले प्रकार आढळून येतात हेंही लक्षांत ठेवणें अवश्य आहे.

१६. आणखी डोळ्यांत तेल घालूनच वसावयाचें म्हटलें तर,

१. सखि ! सुकृतगणकृत शुश्रूषो–।–पचरण निवविल कसें दरिद्रातें ।

कृ. वि. ८३. २९.

२. तेथें शोभति कुटिला–।–ककुंडलमुकुटमणि रुचिस्तोम ।

मं. भा. १०. ११२८.

३. तेथें पार्षद नंद सु–।–नंद, सुदर्शन वरायुधें मूर्ते । मं भा.१०. ११२७.

यासारखे यतिभंग, अथवा चरणभंग, कृ. वि. ३१. १९ प्रमाणें अगदींच क्वचित् आढळणारे वृत्तभंग, वाचकास मधून मधून आढळतील. परंतु या अगदीं क्षुल्लक दोषांमुळें रसास्वादास फारसा व्यत्यय येत नसल्यामुळे त्याच्याकडे कोणीही सहृदय वाचक करडी नजर करून पाहणार नाहीं हें उघड आहे.

---

[ २ ]

१७. आतांपर्यंत केवळ भाषादोषांविषयीं विचार केला. आतां 'औचित्यहानि' व 'ग्राम्यता' हे दोन वर्ण्यविषयगत दोष पंतांच्या काव्यांत विशेष दिसून येतात;

त्यांचा विचार करून हें दोषांचें प्रकरण संपवून टाकूं. संस्कृत साहित्यशास्त्रकारांनीं अपुष्टता, कष्टता, व्याहतता इ० अर्थदोष पुष्कळच सांगितले आहेत. परंतु एकतर ते सर्व दोष पद्यकाव्यांत पुष्कळ प्रमाणांत दिसून येत नाहींत; दुसरें, ते सर्व अतिशय सूक्ष्म अवलोकनानेंच लक्षांत येण्यासारखे असे असून सामान्य रसिक वाचकाच्या टकपणें नजरेस येण्यासारखे नाहींत; व तिसरें म्हणजे, ते सर्व औचित्यहानि या व्यापक दोषांत अंतर्भूत होण्याजोगे आहेत. यास्तव त्यांचें पृथक् विवेचन येथें करण्याचा उद्देश नाहीं.

## ( ६ ) औचित्यहानि.

१८. ' औचित्यहानि ' हा दोष अत्यंत व्यापक आहे. याच्या पोटांत इतर सर्व दोष येतात असें म्हटलें तरी चालेल. कारण कोणताही दोष झाला तरी तो तेवढ्यापुरती काव्यांतील औचित्याची हानि करतोच. क्लिष्टतेमुळें, कृत्रिमतेमुळें व इतर भाषागत दोषांनीं तरी काय, भाषेच्या औचित्याचीच हानि होते. अर्थ दोषांनीं तरी अर्थाच्या औचित्याचीच हानि होते दुसरें कांहीं होत नाहीं. यासाठींच काव्यमर्मज्ञांनीं म्हटलें आहे--' अनौचित्यादृते नान्यद्रसभङ्गस्य कारणम्,' 'औचित्यहानीखेरीज रसभंग होण्यास दुसरें कांहींच कारण असत नाहीं.' अनौचित्य दोष याप्रमाणें अत्यंत व्यापक असल्यामुळेंच त्याचें लक्षण करणें फार कठीण आहे. काव्यांतील रस हा जसा सर्वस्वीं सहृदयहृदयसंवेद्य असतो त्याप्रमाणें त्या रसाचा भंग करणारें अनौचित्य देखील सहृदयसंवेद्यच होय. त्याची रेखीव व्याख्या कधीं करतां यावयाची नाहीं. भातांत लागणाऱ्या खड्याप्रमाणें काव्याचा रसास्वाद घेतांना जी गोष्ट डाचते ती गोष्ट औचित्यहानि करणारी होय असें सामान्यतः म्हणतां येईल. अमुक एका ठिकाणीं औचित्यहानि झाली आहे कीं नाहीं हें ठरविण्यास काव्यशास्त्रज्ञ सहृदयाचेंच मत प्रमाण होय. एकच गोष्ट एका ठिकाणीं उचित ठरेल तर दुसऱ्या ठिकाणीं अनुचित व काव्यसौंदर्यास विघातकही ठरेल. त्याला देखील कांहीं कारणें सांगतां येतील हें खरें; पण तीं कारणेंही बहुधा सहृदयहृदयसंवेद्यच असतात. अर्थात् सहृदयाच्या अंतःकरण-वृत्तीवरच शेवटीं सर्व येऊन ठेपतें. एकच गोष्ट एका ठिकाणीं अत्यंत समर्पक तर दुसऱ्या ठिकाणीं अगदीं अनुचित व वैरस्यकारक कशी ठरते हें पुढील उदाहरणा-वरून लक्षांत येईल.-पाळक तूं विश्वाचा बाळकसा तोंड पसरितो बा ! मी । आर्या-केका ७२. येथें परमेश्वराची प्रार्थना करीत असतां तोंड पसरणाऱ्या बाळकाची

कवीनें स्वतःला घेतलेली उपमा फारच प्रेमळ व सहृदयतेची आहे. परंतु—कन्येथि तसें रोदन आलें तें पसरवीच आ ज्ञात्या ॥ मं. भा. ११. ५८३. येथें उद्धवकृष्णांच्या वियोगप्रसंगाला रडणाऱ्या कन्येचा दिलेला दृष्टान्त किती अप्रयोजक व विरस करणारा आहे हें आपण मागें पाहिलेच आहे. अशो.

१९. पंतकाव्यामध्यें औचित्याची हानि झालेली जी आढळते ती पुष्कळ वेळां ग्राम्यतेमुळें झालेली आढळते. ग्राम्यतेचा विचार पुढील सदरांत केलाच आहे. येथें फक्त ज्यांच्यामध्यें ग्राम्यतेचा व अश्लीलतेचा कांहीं अंश नाहीं अशा वर्णनगत औचित्यहानीच्या प्रकाराचा विचार करावयाचा आहे. अशीं ग्राम्यताविरहित अनौचित्याचीं उदाहरणेंही पंतकाव्यांत कांहीं सांपडतात. कोठें कोठें शब्दप्रयोग अनुचित असतो, कोठें कोठें वर्ण्यविषयाला दिलेले दृष्टान्त विरस करणारे असतात, कोठें कथानकाचें वर्णनच औचित्यहानि करणारें असतें. मागें चवथ्या विभागांत भागवती काव्याचें अंतर्निरीक्षण करतांना औचित्यहानीचीं अनेक उदाहरणें प्रसंगोपात्त आलीं आहेतच. पुढील विभागांत अलंकारांचें विवेचन करतांनाही अशीं दोषयुक्त स्थळें कांहीं दाखल केलीं आहेतच. येथें आणखी थोडींशीं उदाहरणें देणें बस होईल.

जो झडपि समग्राशी, कृष्णा अहिला खगेश्वरसम ग्रासी । कृ.वि.११.२४.

येथें बकनामक असुराला गरुडाची उपमा देऊन कृष्णाला सर्पाची दिली आहे ती अत्यंत दुष्ट आहे. गरुड जसा सर्पाचा तात्काळ नाश करतो त्याप्रमाणें बकानें कृष्णाचा नाश केल्याचा ध्वनि येथें उत्पन्न होतो तो अत्यंत अनुचित होय. त्या असुरानें बक पक्ष्याचें जरी रूप घेतलें होतें तरी त्यामुळें त्याला खगेश्वराची उपमा शोभेल असें नाहीं.

' ऐश्वर्यच्युत हो ' हा दे त्या शिष्यास शाप शुक्र मुनी ।
पावोचे पालकाज्ञेप्रति दंडोचित दशा पशु क्रमुनी ॥ वामनचरित १०९.

हेही एक अशाच दुष्ट उपमेचें उदाहरण आहे. बळीनें शुक्राचार्यांची आज्ञा मानिली नाहीं व वामनास दान दिलें; तेव्हां शुक्राचार्यांनीं त्याला शाप दिला. या गोष्टीस ' पालकाची आज्ञा मोडणाऱ्या गुराला मार बसतोच,' असा अनुचित दृष्टांत पंतांनीं दिला आहे ! शुक्राचार्यांना गुराख्याची व बळीला गुराची उपमा कितपत शोभते याचा वाचकांनींच विचार करावा. सात अक्षरीं यमक जुळविण्यासाठीं केवळ पंतांनीं हा प्रकार केला आहे.

हंसांनीं आपल्या पंतांवरील निबंधांत अनौचित्याचीं कांहीं चांगलीं उदाहरणें पंतकाव्यांतून काढून दाखविलीं आहेत. त्यांपैकीं तीन चार उदाहरणें येथें उतरून घेणें इष्ट वाटलें.

चितेनें नीज नसे स्वप्न नव्हे, हा नखाक्ष मायावी। (नखाक्ष–विंशतिनेत्र रावण.)

कपिरूपें आलासे पीडाया, 'यास कां क्षमा यावी?' ॥ मं. रा. सुंदरकांड ५६.

अशोकवनांत मारुती आला त्यास पाहून सीतेस, प्रथम, हा रावणच कपिरूपानें छळण्याकरितां आला आहे कीं काय असें वाटलें;—असें या आर्येंत वर्णन आहे. 'क्षमा' हा शब्द येथें अगदीं अनुचित व अप्रयोजक आहे. "मायावी राक्षसानें क्षमा करावी असा तिचा हेतु नसून, केवळ दया करावी इतकाच हेतु होता. पण क्षमेच्या ठिकाणीं दया शब्द घातला असतां यमकचमत्कृति नाहींशी होते येवढ्या-करितांच पंतानें अर्थहानि होऊं दिली असें वाटतें"—हंस.

मुनि त्यासि म्हणे होती सावित्री नाम अश्वपतितनया।

तच्चरित श्रवण करीं ऐकाया योग्य साधु पतित न या ॥ ॥ वनपर्व १३. २.

येथें द्वितीयार्धांतील वर्णन अनुचित आहे, व तेंही यमकाधतेमुळेंच केलें आहे. याविषयीं हंस म्हणतात—" यांत सावित्रीचें चरित्र ऐकावयास साधूच योग्य, पतित योग्य नाहींत असें म्हटलें आहे. तें पंतासही संमत असेल असें आम्हांस वाटत नाहीं. कारण साध्वीचें चरित्र पतितांनीं ऐकूं नये असा नियम असेल तर पतितांचा उद्धार होण्याचा मार्गच बंद करून टाकला असें होऊन, पुण्यफळरूप इमारतीस पायापासून खणल्यासारखें होईल." शिवाय पंतांनीं पुढल्याच आर्येंत अगदीं याविरुद्ध वर्णन केलें आहे.

होय प्राप्त विधिस्त्री सावित्रीच्या वरोचि ती राया।

यत्कीर्ति जना म्हणती, 'कर देत्यें रे अघाब्धितीरा या' ॥ वनपर्व १३.३.

यांत कीर्ति पातकसमुद्रांत बुडणाऱ्यांस हात देते असें वर्णन आहे. परंतु तेंही यमकाकरितांच केलें असल्यासारखें दिसतें. यावरून लागोपाठच्या दोन आर्यांत परस्परविरुद्ध वर्णन करावयास लावून पंतांच्या यमकांधतेनें औचित्याचा कसा खेळखंडोबा केला आहे तें लक्षांत येईल.

अस्थिरता जे श्रीची ती तुझ्या शत्रुजीवनीं राहो।

संतत कल्याण असो विपक्षलोकप्रतापरविराहो! ॥ मं. रा. युद्ध. ७५५.

ही दशरथानें रामास दिलेल्या आशीर्वादांतील आर्या आहे. येथें रामशत्रूच्या प्रतापास नित्यतेजस्वी सूर्याची उपमा देऊन विजयशाली व सूर्यवंशज रामाला राहूची उपमा देण्यांत पंतांच्या हातून मोठाच औचित्यभंग झाला आहे. या आर्येचा पांगारकरांनींही उल्लेख केला आहे. ( मो. च. २४९ ).

आणखीही औचित्यहानीचीं कित्येक उदाहरणें हंसांनीं आपल्या निबंधांत व पांगारकरांनीं आपल्या चरित्रांत दिलीं आहेत. प्रस्तुत पुस्तकांतही पंतांच्या भागवतीकाव्यांत दिसून येणाऱ्या औचित्यहानीच्या प्रकारांचा प्रसंगानुसार कोठें ना कोठें तरी परामर्श घेण्यांत आला आहेच; ( पहा. पृ. ७०, नाम्यु. २१; ६० ) तेव्हां येथें आणखी विस्तार करण्यांत तात्पर्य नाहीं. बहुधा प्रत्येक स्थळीं औचित्यहानि करण्याचा प्रसंग यमकांच्या हव्यासामुळेंच पंतांवर ओढवलेला आहे हेंही वरील विवेचनावरून ध्यानांत येईलच.

## ( ७ ) ग्राम्यता व अश्लीलता.

२०. पंतकाव्यामध्यें पुष्कळ वेळां औचित्यहानि ग्राम्यतेमुळेंच झालेली आढळते तेव्हां ग्राम्यतेचा येथें थोडा विचार करूं. ग्राम म्हणजे खेडें व ग्राम्य म्हणजे खेड्यांतलें खेडवळ. अर्थात् सभ्य, शिष्ट व विदग्ध अशा लोकांना पसंत न पडण्याजोगें व खेडवळ समाजांत मान्य होण्याजोगें असें जें असेल तें ग्राम्य होय. सामान्य वागणुकीला ही व्याख्या ज्याप्रमाणें लागू पडेल त्याप्रमाणें भाषेला व वाङ्मयालाही लागू पडेल. सभ्यजनसमाजांत जी जी वागणूक, किंवा ज्या अवयवांचें व हावभावांचें प्रदर्शन ग्राम्य समजलें जातें त्याच वागणुकीचा, अवयवांचा व हावभावांचा उच्चार करणारी भाषा ही ग्राम्य समजली जाते. वाङ्मयांतील ग्राम्यतेचें क्षेत्र तर याहूनही व्यापक बनविण्यांत आलें आहे. भाषेचें सारसर्वस्व वाङ्मय व वाङ्मयाचें सारसर्वस्व काव्य होय; अर्थात् यांमध्यें ग्राम्यतेची व्याख्या उत्तरोत्तर अधिकाधिक कडक बनत जाऊन शुद्धतेविषयींचा व सुसंस्कृततेविषयींचा कटाक्ष अधिकाधिक वाढत गेला असल्यास त्यांत नवल नाहीं. पहिल्या प्रतीचे दरबारी व राजावलासी असे जे आमचे संस्कृत कवि त्यांनीं तर अशिष्टपणाचा दुरून सुद्धां आपल्या कवितेस वास येऊं नये यासाठीं अतिशय काळजी घेतलेली दिसून येते. त्यांच्या इतकी जरी नाहीं तरी साधारणपणें आपल्या कवितेचें स्वरूप शिष्टपणाचें राहील येवढी तरी काळजी आमच्या मराठी कवींनीं घ्यावी अशी अपेक्षा कोणीही करणें साहजिक आहे.

२१. या ग्राम्यतादोषाचा औचित्याच्या प्रश्नाशीं फारच निकट संबंध आहे. वाङ्मयांत अथवा काव्यांत कोणत्याही अशिष्ट समजला गेलेल्या उद्गारापासून औचित्याची हानि होत आहे कीं नाहीं हेंच मुख्यतः बघावयाचें असतें. औचित्याची हानि होत असल्यास तो दोष, अन्यथा अदोष होय. व्यक्ति, स्थळ, काळ, प्रसंग या सर्वांचा विचार करितां जर कांहीं आपाततः ग्राम्य वाटणारे उद्गार काव्यांत उचित व सौंदर्यपोषक ठरले तर ते दोषरूप न मानितां गुणरूपच मानिले पाहिजेत. आपण उदाहरण घेऊन पाहूं. श्री. वा. म. जोशी यांच्या 'नांव बदलीन' नामक एका गोष्टींत पुढील वर्णन आहे;—"यमुनेनें लागलीच डोळे पुसले व गालावरचे अश्रु पुसून आणि **नाकां-तला शेंबूड आंत ओढून** ती जोराजोरानें पावलें टाकीत... घरांत गेली"! पंधरा सोळा वर्षांच्या इंग्रजी शाळेंत जाणाऱ्या मुलीचें, स्वभावोक्ति करण्याच्या भरांत, हें जें लेखकांनीं वर्णन केलें आहे तें सर्वस्वीं अनुचित व घृणाकारक आहे असेंच कोणीही म्हणेल. परंतु पंतांनीं पुढील आर्येंत वर्णिलेला एकनाथस्वामींचा महिमा पहा—

अंत्यजतोक कडे घे, उष्णीं ज्या फार लाळ शेंबुड, तें।
अद्भुत सुकृत न गातां साधूंची रीति, आळसें बुडते ॥ साधुरीति १९.

मागच्या उताऱ्यांतीलच घृणाकारक शब्द व वर्णन येथें योजिलें आहे. परंतु अंत्यजाच्या मुलाचें अगदीं गलिच्छ व अनुकंपनीय असें वर्णन करणें हें एकनाथस्वामींचा महिमा उज्ज्वल करण्यास उपकारकच होणारें असल्यामुळें तें येथें दोषरूप न ठरतां गुणरूपच ठरतें. असो; तेव्हां सर्व ठिकाणीं गुणदोषविवेक कर-तांना औचित्याची कसोटी हीच मुख्य मानून तिला सर्वत्र अनुसरलें पाहिजे. संस्कृत साहित्यशास्त्रकारांनींही 'शमकथास्वश्लीलत्वं गुणः' 'वैराग्याचें प्रति-पादन करणें असल्यास अश्लीलत्व हा गुणच ठरतो' असे कित्येक अपवाद सांगि-तले आहेत ते औचित्याच्या तत्वावर लक्ष ठेवूनच सांगितले आहेत.

२२. ही औचित्याची कसोटी लक्षांत ठेवली म्हणजे निबंधमालाकारांनीं 'अश्लीलता' हा जो पंतकवितेतील मोठा दोष म्हणून निरूपण केला आहे त्यांतील ग्राह्यांश निवडणेंही फार सुलभ होईल. या दोषाचें विवरण मालाकारांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे.—'अश्लीलता म्हणजे प्रौढ काव्यांत न खपण्यासारख्या ग्राम्य शब्दांचा प्रयोग व केवळ व्यावहारिक दाखले हे होत. सत्कवींची शब्द-

पद्धति व अर्थपद्धति लक्षपूर्वक पाहिली असतां ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे. दोहोंमध्ये ग्राम्यतेचा लेशहि त्यांस खपत नसतो; मुख्ती वाक्यरचनाही कवितेंत व्यावहारिक भाषेहून निराळी असावी लागते. आणि त्यांतून शब्द व दृष्टान्त हे तर प्राकृत व्यवहारांतले व ग्राम्य भाषेतले मुळींच उपयोगी नाहींत.' मालाकारांचें हे विवेचन विशेष शास्त्रशुद्ध व सहृदयांस ग्राह्य होण्यासारखें आहे असें म्हणवत नाहीं. काव्यामध्यें अगदीं प्राकृत व्यवहारांतले दृष्टान्त येतां कामा नयेत, आल्यास ते दोषावह होतात हें म्हणणें कोणाही काव्यमर्मज्ञास पटणें शक्य नाहीं. अशा अगदीं क्षुल्लक व व्यावहारिक दृष्टांतांचीं कित्येक उदाहरणें विख्यात महाकवींच्या उत्तमोत्तम मानलेल्या काव्यांतून काढून दाखवितां येतील. पंतांची तर असे दृष्टान्त योजण्याकडे विशेषच प्रवृत्ति आहे. पंतकाव्यांत दिसून येणाऱ्या अशा व्यावहारिक व क्षुल्लक दृष्टान्तांविषयीं पुढील विभागांत विस्तृत विवरण केलें असून, तें पाहिल्यास असे दृष्टान्त समर्पक रीतीनें योजण्याचें पंतांचें चातुर्य किती अनुपम होतें याची सहज खात्री पटेल. काव्याच्या इतर अंगांस जी औचित्याची कसोटी लावावयाची तीच कसोटी असल्या दृष्टांतासही अर्थात् लावावयाचीच. एखाद्या उदात्त, गंभीर किंवा करुणरसपूर्ण प्रसंगाच्या वर्णनांत क्षुल्लक व हास्यकारक दृष्टांताची योजना केल्यास ती केव्हांही दोषास्पदच ठरेल. परंतु तसा विशेष गंभीर प्रसंग नसतां सामान्य वर्णनांत एखादी क्षुल्लक परंतु चटकदार व समर्पक अशी कोणी उपमा घातली तर ती सौंदर्यपोषकच ठरेल यांत संशय नाहीं. तेव्हां या विचारसरणीस अनुसरून मालाकारांनीं दिलेल्या उदाहरणांपैकीं

तूं जेंवि देवकीला भेटसि तैसेंचि भेट आतेला ।
आम्हांहुनि तूंचि अधिक, घृत सोडुनि कोण करिल आ तेला ॥ उद्योगपर्व ५.
आम्हा व्यसनार्तांची धर्मस्थिति हेचि बाज पावे गा । ( व्यसन—संकट )
त्वां मोडावें न इला स्वस्वास्थ्यसुखार्थ बा जपावें गा ॥ सभापर्व ५.

हीं दोन उदाहरणें औचित्यास्तव काव्यसौंदर्यास पोषक अशींच गणलीं पाहिजेत. त्यांच्यामुळें काव्याचा कोणत्याही बाजूनें विरस होत नसून चमत्कृति मात्र उत्पन्न होते. आणि याच कसोटीस अनुसरून

त्यांच्या प्रभुमूर्तिरतद्गुपमेसि सितारता गमो मासी । मं. भा. १०
होय सुदुःसह शाका जैसें बाळासि रायतें नाकीं । आदिपर्व १०.

हीं दोन उदाहरणें दोषयुक्त होत असेंही ठरतें. पहिला माशीचा दृष्टान्त घृणाकारक म्हणून दूषणीय होय व दुसरा, इंद्राची दु:सह स्थिति उत्कट रीतीनें प्रकट करण्यास असमर्थ म्हणून त्याज्य होय.

जो न्याय क्षुल्लक, व्यावहारिक दृष्टांतांस लागू तोच ग्राम्यतेसही लागू आहे. तो कसा, हें लौकिकांत किळसवाणा गणला गेलेल्या एका शब्दाच उदाहरण घेऊन वरतीं स्पष्ट करून दाखविलेंच आहे. सामान्यत: ग्राम्य शब्द किंवा अश्लील वर्णनें हीं रसहानिकर होत, कवीनें त्यांच्यापासून सर्वथा अलिप्त रहावें,हा सिद्धान्त कोणासही कबूलच आहे. परंतु या सामान्य सिद्धान्तास अपवाद असून त्या अपवादात्मक प्रसंगीं ग्राम्यता ही गुणावहच होते हेंही त्याबरोबर लक्षांत ठेवलें पाहिजे. असो. ग्राम्यतेचे मुख्य दोन विभाग पडतात — १. शब्दगत ग्राम्यता व २ अर्थगत ग्राम्यता. अर्थगत ग्राम्यतेचे दोन भाग पडतात;—१ दृष्टान्तगत ग्राम्यता; २. सामान्यवर्णनगत ग्राम्यता. या विभागांचीं क्रमानें कांहीं उदाहरणें सादर करूं.

**२३. शब्दगत ग्राम्यता**:—' थान' हा ग्राम्य शब्द पंतांचा विशेष आवडता आहे. भागवती काव्यांत तरी याचा प्रयोग वारंवार येतो. ' थान ' हा शब्द ' स्तन ' या शिष्टसंमत शब्दापासूनच निघाला असला तरी त्याला एक प्रकारची ग्राम्यता आली आहे हें मर्मज्ञास सांगावयास नको.' दीनजना थानातें लाविल कीं' कृ. वि. ४९.१;'कुंकुम माथानींचें' कृ वि. ३८.१६;' थानें श्रीचीं जेणें त्यजावीं' कृ. वि. ७७.८; ' श्री (लक्ष्मी) चीं थानें ' हा शब्दप्रयोग किती सुरस आहे याचा वाचकांनींच विचार करावा दुसरा शब्द 'विणे' होय. 'तो तया (पुत्राला) देशिक ( गुरु ) वी ' कृ. वि. ४५. ६९, ' मी प्रहर आठ वित्यें चिंता ' कृ. वि. ४९.१७. हे दुसऱ्या वाक्यांतील शब्द कुंतीच्या तोंडीं घातले आहेत. अगोदर स्त्रीच्या, त्यांतून कुंतीसारख्या गतधवा राजस्त्रीच्या तोंडीं ' मी वित्यें ' असे शब्द घालणें म्हणजे औचित्यहानीची परमावधि होय. पण वाटेल तें करून यमक जुळविल्याशिवाय पंतांच्यानें कसें राहवेल ? पुढील चरणाच्या अंतीं ' आठवित्यें ' असें क्रियापद येत आहे त्याच्याशीं हजारों दोष पत्करूनही यमक जुळविलेंच पाहिजे ! त्याचप्रमाणें--'दावि वनश्री नटोनि वरदा **गमजे** ' कृ. वि. २१.१. ' वारूनि स्त्रीकामांची **महागायी** ' कृ. वि. २२. २३ ' निजकरेंचि भारि **आवास** ' कृ. वि. ४२. ५; या उदाहरणांत अनुक्रमें गमजा, महागायी, आवा

( स्त्री ) या ग्राम्य शब्दांचा प्रयोग आला आहे तो दुष्ट होय. हेही शब्द व असेच इतरत्र आढळणारे ग्राम्य शब्द यमकाकरितांच आले आहेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

परंतु औचित्याच्या तत्वास अनुसरून जेथें ग्राम्य शब्द दोषावह होत नाहींत अशीं स्थळेंही आढळतात. थान आणि वी हेच शब्द पुढील उदाहरणांत अगदीं उचित व समर्पक आहेत.

सुटतां थान मुखींचें शिशुसा ध्रुव गडबडोनि जों पाहे । मं. भा. ४. ८५.
लावीन मस्तक तुज्या, पदीं तुझी भक्ति आत्मविद्या वी । आर्याकेका. ६०.

२४ कित्येक ठिकाणीं वर्णनच ग्राम्य किंवा अश्लील असतें.—

चेष्टा स्वल्प विभूहि देखत करी सर्वांकडे गांड ही । कृ. वि. ६७. ५.
वत्स क्षुद्विकळ रडे झोंबे जरि माय कंचुकी सोडी ।
गोडी आपुलि पानीं नुमजे दानीं तिची म्हणे थोडी ॥ कृ. वि. ८३-१८.

वत्साकरितांच कां होईना पण ' माय कंचुकी सोडी ' हें वर्णन शिष्टसंमत मर्यादेस सोडून दिसतें.

हीच अश्लीलता वैराग्यविषयांत गुणावह ठरते. तुकाराम, एकनाथ, रामदास इत्यादिकांच्या काव्यांत वारंवार जी अश्लीलता व निर्भीड स्पष्टोक्ति दिसून येते ती अशाच प्रकारची होय. तिला दोषास्पद ठरविण्याचें धाडस कोणीं करूं नये. स्वभावोक्तीसाठीं केलेलें ग्राम्य वर्णन हेंही क्वचित् प्रशस्त ठरतें.

शब्दें भय दे; हगत, स्वल्प खणित भूसि दावि बळ देहगत ।
ककुदाश्रितजीमूत स्तब्धाक्ष, पदोपदीं विसर्जी मूत ॥ कृ. वि. १६. ४.

बैलाचें रूप घेतलेल्या 'अरिष्ट' नामक असुराच्या खवळलेल्या स्थितीचें हें वर्णन आहे. माजलेल्या बैलाचें हुबेहूब चित्र डोळ्यांपुढें उभें करीत असल्यामुळें हें वर्णन मोठें सुंदर वठलें आहे.

२५. आतां दृष्टान्तगत ग्राम्यतेचीं कांहीं उदाहरणें सादर करून हें विवेचन संपवूं.—' जे बाळकतिलघाणी, तीची जळतांहि कोण घेतिल घाणी ? ' कृ. वि. ६. २९. बालकांना तिळांची व पूतनेला घाणीची उपमा दिली आहे. ' प्रीतीचि तो बेडि कसी सोडवि हरि, जी करासि झोंबे डिकसी' कृ. वि. ४२.९. येथें ' डिकासारखी हाताला चिकटून बसली ' असें कुब्जेचें वर्णन केलें आहे तें अगदीं वैरस्यावह आहे. पुढील आर्यांतील दृष्टांतही असेच ग्राम्यतेमुळें व

अश्लीलतेमुळें अनुचित व रसहानिकर झाले आहेत. ( हंसांचा निबंध. )

हा पल भोजन गृधीं जसा कृमि, अर्घों तसा रमे यातें ।
मी पळमात्रें वधितों, जैसा मृगकांत सारमेयातें ॥ मं. रा. सुंदरकांड. ७२.

झाले सुयोधनाला भीष्म द्रोण प्रसन्न सुरतरुसे ।
व्यर्थ असुमगा पनिशीं सुभगेचें आठवूनि सुरत रुसे ॥ भीष्मपर्व. २. २४.

पहिल्या आर्येंतील रावणासारख्या पराक्रमी शत्रूला दिलेली विष्ठाकृमीची उपमा किती अश्लील, दुष्ट व अनुचित आहे हें वर्णन करून सांगण्याची जरूरी नाहीं. दुसऱ्या आर्येंत भीष्म, द्रोण दुर्योधनाच्या बाजूला मिळाले व आपल्या बाजूला मिळाले नाहींत या आपल्या दुर्भाग्याबद्दल युधिष्ठिरानें स्वतःला जी उपमा घेतली आहे तीही असभ्य व अश्लील आहे.. हा अत्याचार यमकरूपी सैतानानें पंतांकडून करविला आहे हें ' सुरतरुसे ' या अक्षरांवरून स्पष्ट दिसतें.

पंतांच्या एकंदर काव्यविस्ताराच्या मानानें ग्राम्यता व अश्लीलता फारच थोड्या ठिकाणीं आढळून येते. मुक्तेश्वर व वामनपंडितांनंतरचे श्लोकबद्ध रचना करणारे कांहीं कवि यांच्या मानानें पंतांचें काव्य पुष्कळ सोज्वळ व भारदस्त आहे असें म्हटलें पाहिजे. आतां, ग्राम्यतेचीं जीं थोडीशीं उदाहरणें त्यांच्या काव्यांत आढळतात तीं देखील आढळलीं नसतीं तर बरें झालें असतें असें कोणासही वाटेल हें खरें. तथापि यमकांचें झट त्यांच्या मागें सदोदित लागलें होतें. शिवाय सभ्यता व शिष्टपणा याविषयींच्या त्या काळच्या कल्पनाही सध्यांच्या इतक्या नाजूक व दुसऱ्या नमुन्याच्या असें वाटल्याखेरीज रहात नाहीं.

# [ ३ ]

२६. आतांपर्यंत पंतकाव्यांतील दोषांचें दर्शन बऱ्याच कसोशीनें व शक्य तितक्या निर्भीडपणानें केलें. तसेंच पाहूं गेल्यास याच्यापेक्षांही अधिक क्लिष्टपणे एखादा काकदृष्टि मनुष्यास पंतकाव्यांतून काढून दाखवितां येतील, नाहीं असें नाहीं. परंतु, सहृदय व रसिक विवेचकांच्या दृष्टीनें, झालें आहे येवढें दोषदर्शन बहुधा परिपूर्ण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्येक दोषाचीं उदाहरणें पंतांच्या निरनिराळ्या काव्यांतून काढून वाटेल तितकीं वाढवितां येतील. परंतु दोषांचीं सदरें फारशीं वाढत करतां येतीलसें वाटत नाहीं. तरी सुद्धां, येथें केलेलें दोषांचें विवेचनच फक्त जो वाचील त्याला पंतकाव्य हें नाना दोषांचें भांडारच आहे असें वाटेल व

पंतांच्या काव्यांत चांगुलपणाचा फारच थोडा अंश आहे असा त्याचा ग्रह होईल. पंतांच्या भाषासरणींत किती तरी व केवढे मोठे ढोबळ दोष आहेत व अर्थास तर औचित्यहानिरूप सर्वव्यापी दोषानें ग्रासलेंच आहे! तेव्हां पंतकवितेंत वाखाणण्याजोगा अंश राहिला तरी कोठें ? अशी कित्येकांस पृच्छा करावीशी वाटेल यांत कांहीं शंका नाहीं.

२७. परंतु यास एक उत्तर आहे व तें मागील विवेचनांत कित्येक वेळां सुचितही केलें आहे. तें हेंच कीं आतांपर्यंत वर्णिलेले दोष पंतांच्या सर्व कवितेस सरसकट लागू नसून तिच्या कांहीं अंशांत मात्र ते दिसून येतात. आम्ही अगदीं प्रारंभींच सांगितलें आहे कीं, हीं व्यंगें पंतांच्या असमर्थतेमुळें त्यांच्या काव्यांत राहून गेलीं आहेत असें नसून यमकरचनेच्या व संस्कृतीकरणाच्या हव्यासामुळें तीं त्यांच्या कवितेंत आलीं आहेत. मुलाचे क्षुल्लक लाड पुरविल्यानें बापाला मोठें सुख होत असतें परंतु लाडामुळें मुलाच्या अंगीं वाईट खोडी व दुर्गुण येत आहेत याचें त्याला जसें भान असत नाहीं त्याचप्रमाणें पंतांची स्थिति झाली आहे. पंतांनीं आपल्या कविताकन्येचे, यमकाचे व संस्कृतमय बनण्याचे लाड पुरविले खरे; परंतु यमकादि शब्दालंकार तिला काचूं लागले व संस्कृताचें जडान्न तर फारच बाधून तिला अजीर्ण झालें. तथापि हा यमकांचा व संस्कृतीकरणाचा हव्यास पंतकाव्याच्या थोडयाशाच अंशाला भोंवला आहे हें पुनः पुनः लक्षांत ठेवणें जरूर आहे. अर्थात् तो जेवढ्याला भोंवला आहे तेवढा भाग काव्यदृष्ट्या कमी दर्जाचा ठरला आहे हें कबूल केलें तरी त्यामुळें बाकीच्या सर्व काव्यविस्ताराचें जें सौंदर्य सर्वांस प्रतीत होण्याजोगें आहे त्यास कांहींच कमीपणा येत नाहीं. पुष्कळशा काव्यांपैकीं कांहीं थोडीं कमी दर्जाचीं ठरलीं किंवा एकाच काव्यांतील कांहीं भाग टाकाऊ ठरला म्हणजे त्याकरितां सगळेंच काव्य केराच्या टोपलींत फेंकून देणें कधींही इष्ट होणार नाहीं. एकादा सडलेला भाग सर्व फळ नासून टाकतो तशी काव्याची गोष्ट नव्हे. कांहीं अंश जरी कुचकामाचा असला तरी त्याच्यामुळें बाकीच्या सर्व काव्याचा रसास्वाद घेण्यास व्यत्यय येऊं शकत नाहीं.

' स्याद्वपुः सुंदरमपि श्वित्रेणैकेन दुर्भगम् । '

' सुंदर शरीर देखील कोडाच्या एका ठिपक्यामुळें भाग्यहीन ठरतें, ' हा दृष्टान्त काव्याच्या बाबतींत मुळींच समर्पक नसून

' एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः । '

' चंद्रावरील डागाप्रमाणें एकादा दोष गुणसमूहामध्यें लुप्त होऊन जातो ' हाच न्याय काव्यास उत्कृष्टपणें लागू पडतो. भवभूतीचें ' महावीरचरित ' हें अगदीं कमी प्रतीचें नाटक आहे; परंतु त्याच्या संसर्गामुळें ' उत्तररामचरिता'स कोणी कमी लेखलें आहे असें कधीं घडलेलें नाहीं. भवभूतीचेंच ' मालतीमाधव ' म्हणून आणखी एक नाटक आहे त्यांत १, २, ३, १० अंक फारच सुंदर आहेत व ५, ७, ९, हे अंक कृत्रिम, लांबलचक व कंटाळवाणे आहेत. परंतु वाईट अंकांच्या संगतीनें चांगल्या अंकांस कोणी लघुत्व आणीत नाहीं इतकेंच नव्हे तर त्या नाटकासही सर्वजण एकंदरीनें उत्तमांतच लेखतात. फार काय, एकाद्या काव्यांत कांहीं चांगले व कांहीं वाईट असेही श्लोक असतात. पण वाईटांमुळें चांगल्यांच्या आस्वादास कांहीं व्यत्यय येत नाहीं; येवढेंच नव्हे तर केवळ त्यांच्याचमुळें सबंध काव्यही चांगलें ठरतें.

तेव्हां हाच न्याय पंतकवितेस लागू केला पाहिजे. कांहीं काव्यें व काव्यांश जरी दोषयुक्त ठरले किंवा दहावीस आर्यांमध्यें एकाददुसरी आर्या जरी वाईट लागली तरी त्यामुळें इतर काव्यांना व इतर आर्यांना तुच्छ लेखतां कामा नये. पंतकाव्याचा कांहीं अंशच तेवढा दोषयुक्त आहे व बाकीचा पुष्कळ भाग चांगला आहे हें मागें दोषविवेचनांत दिलेल्या उदाहरणांवरूनच लक्षांत येण्याजोगें आहे. निरनिराळ्या दोषांचीं आम्हीं दिलेलीं उदाहरणें जर पाहिलीं तर त्यांत भागवती काव्यांपैकीं कृष्णविजय पूर्वार्धांतील उदाहरणेंच अतिशय आहेत हें सहज दिसून येईल. यावरून कृष्णविजय पूर्वार्धांत दोषांचें प्रमाण जास्त आहे, व कृष्णविजय उत्तरार्ध आणि मंत्रभागवत यांत तें फारच थोडें आहे हें सहज लक्षांत येण्याजोगें आहे, अर्थात् दोषांच्या उदाहरणांवरून कृष्णविजय पूर्वार्ध हें क्लिष्ट व कमी दर्जाचें काव्य आहे असें जर अनुमान काढावयाचें तर कृष्णविजय उत्तरार्ध व मंत्रभागवत हीं सोज्वळ व उच्च दर्जाचीं काव्यें आहेत असेंही अनुमान निघालें पाहिजे. निरनिराळ्या दोषांनीं व्याप्त असलेली अशी पंतकविता अमदीं ढगळ मापानें जरी मोजली तरी दहा पंधरा हजारांपेक्षां जास्त भरेल असें खास वाटत नाहीं. म्हणजे पंतांच्या साठ हजार कवितेपैकीं चाळीस पंचेचाळीस हजार कविता चांगली उच्च दर्जाची व साधारणपणें निर्दोष अशी सहज शिल्लक राहील हें निर्विवाद होय.

२८.यावरूनच प्रसन्नता व माधुर्य हेंच पंतकवितेचें नेहमीचें स्वरूप होय, क्लिष्टता व कृत्रिमता हें नव्हे असें जें मागें म्हटलें आहे तें कसें खरें आहे हें दिसून येईल. पंतांचें अंत:करण तन्मय होऊन त्यांच्या वाणीचा ओघ सहज रीतीनें वाहूं लागला म्हणजे तो प्रेमळ, उदात्त, गंभीर व प्रसन्न असाच असतो. अशा वेळीं त्यांच्या वाणींत कृत्रिमतेचा लेशही उरत नाहीं; प्रसाद व माधुर्य हे गुण हात जोडून पुढें उभे असतात. त्यांची वाणी ज्ञानेश्वरांच्या प्रमाणें अलौकिक नादवती नसली तरी पुष्कळ वेळां त्यांच्या खालोखाल बसण्याजोगी रसाळ होते यांत शंका नाहीं. तेव्हां प्रसाद, माधुर्य ( व ओज ) हे जे संस्कृत साहित्यशास्त्रकारांनीं मानलेले भाषाशैलीचे गुण, त्यांचीं पंतकाव्यांतून नमुन्यादाखल काहीं उदाहरणें देऊन मग पुढें जाऊं.

खरोखर पाहिलें तर माधुर्यादि गुण हे भाषाशैलीचे गुण नव्हेत. ' आत्मन एव हि यथा शौर्यादयो नाकारस्य तथा रसस्यैव माधुर्यादयो गुणा, न वर्णानाम् ।' ( का. प्र. ९ ). ' शौर्य, धैर्य हे गुण जसे मनुष्याच्या शरीराचे नसून त्याच्या आत्म्याचे होत त्याप्रमाणें माधुर्य, प्रसाद, ओज हे काव्यात्मा जो रस त्याचे गुण होत, वर्णाचे नव्हेत,'-असा काव्यशास्त्रज्ञांचा सिद्धान्त आहे व तो तत्त्वत: खरा आहे यांत शंका नाहीं. तथापि शौर्यादिक गुण ज्याप्रमाणें शारीरिक क्रियांच्या द्वारानेंच अभिव्यक्त होतात त्याप्रमाणें काव्यांतलि माधुर्यादि गुण नेहमीं भाषासरणीमध्येंच व्यक्त होत असल्यामुळें ते भाषेचे गुण होत असें मानण्याचा प्रघात पडला आहे. व या प्रघातास अनुसरूनच त्या गुणांचा उल्लेख या प्रकरणांत केला आहे.

२९. **माधुर्य व पदलालित्य**—यमक, अनुप्रास, मंत्ररचना इ० शब्दचमत्काराच्या मागें लागल्यामुळें पंतांच्या भाषेमधील माधुर्य पुष्कळ ठिकाणीं कमी झालें आहे. ( मागें, 'कृत्रिमता,' 'बोजडपणा' व ' श्रुतिकटुता 'या दोषांवरील विवेचन पहा. ) तेव्हां ज्ञानराज, एकनाथ, तुकाराम ही अकृत्रिम उद्गार काढणारी संतमंडळी भाषामाधुर्याच्या बाबतींत पंतांपेक्षां वरचढ ठरतील हें उघड आहे. मुक्तेश्वरांच्या वाणींत माधुर्यापेक्षां भव्यपणा, खळखळाट व गडगडाट विशेष. वामनांच्या श्लोकरचनेंत पुष्कळ वेळां माधुर्य व पदलालित्य अप्रतिम आढळतें. परंतु त्यांच्या काव्यांत नीरस रचनाही तितकीच विपुल सांपडते. त्यांतून शब्दचमत्कारांचीं बंधनें वागवूनही पंतांच्या भाषाशैलीनें कित्येक ठिकाणीं जें अप्र—

तिम माधुर्य प्रकट केलें आहे तें पाहतां वामनमयूरांच्या जोडीमध्यें मयूरासच पदलालित्याच्या बाबतींत वरची जागा द्यावी लागते. खालील, श्रुतदेव ब्राह्मणानें केलेल्या कृष्णाच्या पूजेचें व प्रार्थनेचें वर्णन प्रेमरसाई, त्याचप्रमाणें भाषेच्या दृष्टीनेंही निरतिशय मधुर नाहीं असें कोण म्हणेल ?

बहु कोमल तुळशीची अशी कंठांत मंजरीमाळा ।
बाळा तद्ग्रंथि तदा वरि जाणों त्या जगत्त्रयीपाळा ॥ ५९
चरणीं कमळ समर्पी, तें जाणों आपुलेंचि हृत्कमळ ।
शमळघ्न प्रभुचें मग गद्गदगल साधु गाय यश अमळ ॥ ५६
तो सकुटुंब प्रभुचे पाय चुरी तथवा म्हणे, ' देवा ! ।
जे श्रवणादिपर जन प्रकटसि त्यांच्या मनींच तूं ठेवा ॥ ६१
ते मज कांहींच नसे घडलें प्रत्यक्ष दर्शन स्वामी ! ।
येतिल काय दयाळा ! नवनिधि सालसदरिद्रजनधामीं ? ॥ ६२
आलें असेल काय प्रेमभरें या मुखा तुझें नाम ? ।
कीं एखाद्या जन्मीं क्षण सादर पाहिलें तुझें धाम ?' ॥ ६३ कृ. वि. ८७.

त्याचप्रमाणें बलरामानें स्वस्त्रियांसह यमुनेंत केलेल्या क्रीडेचें वर्णन करणारा पुढील श्लोकही मोठा रमणीय आहे.—

कालिंदीसलिलीं शिरे स्वरमणी घेवूनि जैसा करी
क्रीडा तो मदमंथरप्रियतमासंगें महात्मा करी ।
जाणों माधव हंस, त्या कुमुदिनी, साजे न हें, तारका
त्या, राकापति राम हेंहि उपमा अन्य जगत्तारका ॥ कृ. वि. ६५.३९.

**३० प्रसाद**.—श्रवण केल्याबरोबर चित्तास व्यापून टाकून तात्काळ रसाची निष्पत्ति करणारा जो काव्यगुण तो प्रसाद होय. भाषेची सुलभता; नेयार्थता, अपुष्टता, क्लिष्टता इ० अर्थदोषांचा अभाव; रसाभिव्यक्तीस अत्यंत अनुकूल अशा शब्दांची योजना; या सामग्रीच्या योगानें काव्यांत प्रसाद निष्पन्न होतो. वर माधुर्यगुणाविषयीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे तोच प्रसादासही लागू पडतो. प्रस्तुत गुणाच्या बाबतींतही पंतांची पायरी उपर्युक्त तिघांचौघां संत-कवींच्या खालीं लागत असली तरी अत्यंत सुगम, सोज्ज्वळ व प्रसन्न अशी हजारों गमती कविता त्यांनींही निर्माण केली आहे याविषयीं कोणीही

पंतकवितेचा अभ्यासक साक्ष देईल. पुढील गंगेची प्रार्थना कोणत्याही भावेतील उत्तमोत्तम प्रसादपूर्ण काव्याला हार जाणार नाहीं.

> तुवां मत्पत्राला जननि ! दिधला मान, कळलें
> तुझें कारुण्यार्द्र ! मन मजकडे स्पष्ट वळलें ।
> सुखें येणें झालें सकळहि पथीं विघ्न टळलें
> प्रसू प्रक्षाळील त्वरित न कशी बाळ मळलें ? ॥ गंगास्तव १६.

त्यांच्या भागवती काव्यांतील व बाकीच्या काव्यसमूहांतील उत्कृष्ट व प्रसाद-पूर्ण स्थळांचा मागच्या प्रकरणांतून अनेकवार उल्लेख केलाच आहे व जेथें तेथें शक्य तेवढें उतारेही दाखल केले आहेत, तेव्हां येथें आणखी पुनरुक्ति नको.

३१. ओज. या गुणाविषयीं मागें चर्चा केलीच आहे. (पहा.पृ.२८६-८७)

३२. संवाद व भाषणें.—हा एक पंतकाव्यांचा अवश्य लक्षांत ठेवण्याजोगा विशेष होय. पंतकाव्यांतील पात्रांचीं संभाषणें नेहमींच अत्यंत उचित, जोरदार व समर्पक असतात. संभाषणांच्या बाबतींतलें पंतांचें चातुर्य केवळ अप्रतिम आहे. प्रत्येक पात्राच्या स्वभावास उचित असे उद्गार त्याच्या तोंडीं घातलेले असून जणूं काय त्या व्यक्ति आपल्या समोर प्रत्यक्ष भाषण करीत आहेत असा त्यांचें काव्य वाचतांना प्रत्येक ठिकाणीं वाचकाला भास होतो. उत्कृष्ट कादंबरीकाराच्या कादंबरींतील पात्रांचीं भाषणें वाचीत असतांना सहृदय वाचकाचें चित्त जितकें तल्लीन होऊन जातें तितकेंच पंतांच्या काव्यांतील संभाषणें वाचतांनाही वाचकाचें मन गढून जातें. प्रौढ भाषेची व कठीण शब्दांची काय क्वचित् अडचण भासेल तेवढीच, बाकी पंतांचीं भाषणें वाचून त्या पौराणिक वीरांनीं आज पुन: पृथ्वीवर उतरून आपले हर्षामर्षाचे व हटातटाचे वादविवाद पुन: आमच्या डोळ्यांसमोर सुरू केले आहेत कीं काय असा भास होतो. विशेषत: वीररसाचीं संभाषणें गुंफतांना तर पंतांच्या वाणीला फारच स्फुरण चढतें. परंतु इतर हरएक प्रकारच्या मनोभावना व मानवी व्यवहारांतील हरतऱ्हेचे प्रसंग व्यक्त करणारीं संभाषणें खुलविण्याचें त्यांचें कौशल्यही तसेंच निरुपम असलेलें दृष्टीस पडतें.. कृष्णविजयाच्या उत्तरार्धामध्यें असे नानातऱ्हेच्या संभाषणांचे सुंदर नमुने वाचकांस सांपडणारे आहेत. अ० ५५ मध्यें रुक्मिणी व नारद यांचीं वत्सल व अद्भुत या रसांनीं भरलेलीं भाषणें आहेत. अ० ६० मध्यें ' विनोदरससागरीं मनिसे रमणाऱ्या ' कृष्ण-

रुक्मिणींचीं परिहासपर भाषणें आहेत. अ० ६१ मध्यें रुक्मिणीचा नातू जो अनिरुद्ध त्याच्या रुक्मीच्या नातीशीं होणाऱ्या विवाहाकरितां सर्व यादव भोजकट शहरीं गेले असतां तेथें रुक्मीनें बळरामाशीं द्यूत आरंभलें त्या द्यूताच्या प्रसंगात एकमेकांचीं झालेलीं हर्षामर्षाचीं संभाषणें वर्णिलीं आहेत. अ० ६३ मध्यें शिवभक्त जो बाणासुर त्यास क्षमा करण्यासाठीं श्रीशंकरांनीं कृष्णाची याचना केली तो प्रसंग आहे. त्यासमयींचीं या दोघा देवश्रेष्ठांचीं परस्परांस मान देऊन केलेलीं दरबारी भाषणें फारच सुंदर आहेत. त्याचप्रमाणें अ० ६५ मधील नृगराजाचा वृत्तांत, अ० ६८ मधील कौरवांचीं व बळरामप्रदांचीं भाषणें हीं सर्व पंतांच्या संवादग्रथनचातुरीचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत. मोठ्या लांबलचक संभाषणांचा आशय अत्यंत चटकदारपणानें व समर्पक रीतीनें पंत कसा अगदीं थोडक्यांत आणतात याचें एक उदाहरण ( देवयानी व शर्मिष्ठा यांच्या संवादाचें ) पृ. १३५ वर दिलेंच आहे.

परंतु पंतकाव्यांतील संभाषणांची खरी बहार ज्यांस चाखावयाची असेल त्यांनीं पंतांच्या महाभारतांतच बुडी मारली पाहिजे. पंतांच्या कौशल्याचा खरा उत्कर्ष तेथेंच पहावयास मिळण्याजोगा आहे. श्रीकृष्ण, अर्जुन, भीम, धर्म, त्याचप्रमाणें दुर्योधन, भीष्म, द्रोण, कर्ण वगैरे कौरवपक्षीय वीर, यांच्या शतशः प्रसंगोचित, स्वभावोचित व मार्मिक अशा संभाषणांनीं त्यांचें महाभारत रुचून भरलें आहे. हें संभाषणें योजण्याचें चातुर्य सर्वस्वीं पंतांचें स्वतःचेंच आहे. मुळांतून या बाबतींत त्यांस फारच थोडी मदत मिळाली आहे. मूळ महाभारतांत काय किंवा रामायण–भागवतांत तरी काय, व्यक्तींचीं संभाषणें नेहमीं लांबलचक, कंटाळवाणीं, उपदेशांनीं, नीतिवचनांनीं अगर तत्वज्ञानानें भरलेलीं अशीं असतात. याच्या उलट पंतांचीं भाषणें नेहमीं लहान, चटकदार, मुद्देसूद, व्यक्तिस्वभावानुरूप अशीं असतात. तीं सर्वस्वीं त्यांच्या प्रतिभेचींच द्योतक आहेत याविषयीं शंका नको.

**३३. कथाकथन.**—सुंदर रीतीनें गोष्टी सांगण्याचें कौशल्य हें कित्येकांच्या अंगीं उपजतच वास करीत असतें. साधी गोष्ट सांगावयाची झाली तरी ती खुलवून व मनोरंजक करून ऐकणाऱ्याचें मन वेधेल अशा तऱ्हेनें सांगण्याचें कौशल्य कांहीं थोड्या जणांच्याच अंगामध्यें वसत असतें हें नेहमींच्या संभाषणांत देखील आपण पाहातोंच. पंत हे असेच उपजत बुद्धीचे कथाकार होते. याविषयीं

हें विवेचन मागें ३ ऱ्या प्रकरणांत पृ. ४३ वर केलेंच आहे. भारत–रामायण–भागवतांसारखे प्रचंड ग्रंथ आधारास घेऊन त्यांतील मुख्य कथानकें व बेचक गोष्टी तेवढ्या सुसंगत व मनोरंजक रीतीनें सांगण्यामध्यें त्यांचें हें कथाकथनाचें अभिजात चातुर्य उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झालें आहे.

नैसर्गिक प्रतिभा व अभिजात कौशल्य हें तर होतेंच परंतु पौराणिक कथानकांमध्यें पंतांची झालेली तन्मयता हेंही एक त्यांच्या संभाषणांमध्यें व कथानकांमध्यें रंग भरण्यास विशेष कारण झालें आहे. पंतांचें काव्य वाचतांना, तें भारती युद्धाच्या वेळचें जग आपल्या समोर अवतरलें आहे किंवा आपण तरी त्या वेळच्या जगांत प्रत्यक्ष जाऊन पडलों आहों असा जो वाचकास भास होतो तो कवीच्या वर्ण्यविषयाशीं झालेल्या तादात्म्यामुळेंच होय. असो. याविषयींचा विशेष उल्लेख पुढील भागांत केला आहेच.

**३४. यमकादि शब्दचमत्कार.** – ज्या शब्दचमत्कारांवर पंतांचा इतका जीव असे व जे साधण्यासाठीं त्यांनीं अनेक ठिकाणीं इतका अट्टाहास केलेला दिसून येतो त्यांच्याविषयीं प्रस्तुत पुस्तकांत जेथें प्रसंग आला तेथें विरुद्धच अभिप्राय व्यक्त केलेला आहे, आणि जो विवेचक काव्यसौंदर्याच्या दृष्टीनें पंतांच्या ग्रंथांचें अवलोकन करील तो सदैव विरुद्धच अभिप्राय व्यक्त करील यांत संशय नाहीं. परंतु काव्याची दृष्टि सोडून या त्यांच्या गडगंच भरलेल्या शब्दालंकारांकडे बघितलें म्हणजे केवळ अचंबा वाटावयास लागतो. केवढीं यमकें, केवढाले प्रास व किती अवघड जागीं केलेली मंत्ररचना ! तथापि या सर्वांचीं बंधनें बाळगून हा ब्राह्मण आपला सरासर ग्रंथरचना करीत चालला आहे ! मोठमोठीं अवजड ओझीं सपाट्यासरशीं वाहून नेणाऱ्या वाफेच्या इंजिनाच्या शक्तीचें जसें आम्हांला आकलन करतां येत नाहीं त्याप्रमाणें यमकादि शब्दालंकार, मंत्ररचना, नानापरीचीं विचित्र वृत्तें यांचीं ओझीं बाळगून भरभर ग्रंथरचना करणाऱ्या पंतांच्या भाषापाटवाचें यथार्थ आकलन होणें आम्हांस शक्य नाहीं.

शब्दालंकारांमध्यें प्रमुख म्हणजे यमक व अनुप्रास हे होत. त्यांतील पादांतींचें यमक हेंच पंतांचें विशेष आवडतें होतें व त्यानेंच त्यांच्या काव्यांत विशेष प्रताप गाजविला आहे हें पंतकाव्यवाचकांस सांगावयास नको. यमकांच्या नादाचा परमावधीचा काल म्हणजे महाभारतरचनाकाल होय. पंतांचें अगदीं

प्रथमचें काव्य कुशलवचरित यांतील यमकें कशीं गबाळ आहेत याचा उल्लेख पूर्वीच केला आहे. ( पृ. १९८ ) परंतु यानंतर लवकरच यमकांचा नाद त्यांस लागला असावा असें कृष्णविजयपूर्वार्ध, मदालसाचरित्र इ० काव्यांतील त्यांनीं साधलेल्या दीर्घ यमकांवरून दिसून येतें. हा यमकांचा नाद महाभारतकालीं पराकोटीस गेला व त्यानंतर त्यास ओहोटी लागली. महाभारतानंतर रचलेल्या मंत्रभागवत हरिवंश, काशीयात्रा प्रकरणें इत्यादि काव्यांत पंतांचा यमकाचा व इतरही शब्दचमत्कारांविषयींचा नाद उत्तरोत्तर कमी होत गेलेलाच दृष्टीस पडतो.

यमकानुप्रासांचें सविस्तर व सोदाहरण विवेचन पांगारकरांनीं आपल्या पुस्तकांत चांगल्या रीतीनें केलें आहे. ( मो. च. पृ.५२७–५४९ ). तेव्हां त्यावर येथें पुनः लिहून पुनरुक्तिदोषास पात्र होण्याचें कारण नाहीं.

३५. **पुनरुक्ति व अर्थसादृश्य.** विपुल रचना करणाऱ्या ग्रंथकाराच्या ग्रंथांत कांहीं गोष्टींची पुनरुक्ति झालेली आढळून येणें यांत विशेष कांहीं नाहीं, व ती पुनरुक्ति लागोपाठ किंवा वारंवार झालेली नसेल तर दोषास्पदही होऊं शकत नाहीं. पंतांच्या काव्यांत कांहीं उपमा व कल्पना वारवार येऊन कंटाळवाण्या होतात; त्यांचा उल्लेख पुढील विभागांत दोषरूपत्वानें केलाच आहे. येथें त्यांच्या अदोषरूप अशा पुनरुक्तीचे कांहीं मासले दाखविण्याचा विचार आहे. पंतांचीं कांहीं कांहीं यमकें आवडतीं असून तीं त्यांच्या काव्यांत पुन: पुन: येतात. हरि ( ईश्वर ), हरी ( सिंह किंवा हरण करी ); आली ( सखी ) व आली ( येती झाली किंवा भ्रमर ) अशा तऱ्हेच्या कांहीं शब्दांची यमकें तर नेहमीं आढळतातच; पण 'न नव राजीवा' आणि 'न नवरा जीवा;' 'पादराजीव' आणि 'आदरा जीव;' 'उदास कळकळतें' व 'मला सकळ कळतें;' 'अगारा या' व 'अगा राया;' 'जी प्रतिज्ञा तें' व 'जीप्रति ज्ञातें' वगैरे लांब यमकेंही पुन: पुनः येऊन वाचकांचें मन आकर्षण करतात. केव्हां केव्हां एकाच यमकाची थोडक्याशा अवकाशांत पुनरुक्ति होते. तेथें मात्र ती पुनरुक्ति चटकन् दिसून येऊन यमकाचा रस नाहींसा होतो. उदाहरण; कृ. वि. अ. ३० मध्यें 'बेकांता ' व ' एकांता ' हें यमक १० व्या पद्यांत येऊन लगेच पुन: १२ व्या पद्यांतही आलेलें आहे. तेथें रसनिष्पत्ति होत नाहीं. कोठें कोठें अशी पुनरुक्ति जवळपास न होतां अगदीं दूरच्या काव्यांत कोठें तरी झालेली असते. अशा ठिकाणीं रसहानि होत नाहीं. उदाहरण—

कंठीं हार विलासी अहा, प्रमादें करूनि हारविलासी । कृ. वि. ३०. ५४.
हार विलासिजनेंसा येणें कैसा प्रभाव हारविला ? । भीष्मपर्व ९. ९२.

विचारांची, अर्थाची व कल्पनांची पुनरुक्तीही पंतकाव्यांत आढळून येते. वामनचरित्रामध्यें व अमृतमथनामध्यें एक आर्यार्ध सारखें आलेलें आढळतें.

धवल सुकीर्तिदुशाला टाकवुनि अकीर्तिकांबळीला जे । अमृतमथन. १.२९.
शुद्धा कीर्तिदुशाला पावे, न कुकीर्ति कांबळीला जो, । वामनचरित्र १९२.

मंत्रभागवताच्या व कृष्णविजयाच्या त्याच कथाभागामध्यें कांहीं कल्पना सारख्या आलेल्या आढळतात. पुष्कळ ठिकाणीं त्या मुळांतून घेतलेल्या असतात. उद्धवागमनप्रसंगींची गोपींची पुढील कल्पना मुळावर आधारलेली आहे.

त्या कंसा अधमास व्रजयुवतींचा करूनियां वध मास ।
श्राद्धीं पिंड कराया, नेणार असेल तृप्तिदायक राया । कृ. वि. ४६-४४.
वाढयापुढें सकाळीं रथ पाहुनि म्हणति गोपिका गेला ।
घेऊनि जीव, कंसश्राद्धा नेणार मांसहीं मेला ! ॥ मं. भा. १०.५९०.

मंत्रभागवतामध्यें जास्तच बहारीची खुबी केलेली आहे तीं मार्मिक वाचकांच्या लक्षांत येईलच. कोठें कोठें मुळांतील कल्पना नसूनही दोन्ही ग्रंथांत त्याच कथाभागांत वर्णनाचें सादृश्य आढळतें.

१. पहिलीं अप्रिय भार स्वांगें चिंतेंत विटविलें मन फार ।
स्फुरतां करि सत्कार प्रेमें, तीं भूषणें फुलें हलुवार ॥ कृ. वि ५३.२५.
वाटे चिंता करितां जीं बाहुलता तिला महाभार ।
स्फुरतां, प्रिया गमे तीं, फार कुसुमहार जेंवि हलुवार ॥ मं.भा. १०.७१४.

२. हा व्यासा, हा ! किमर्थ श्रम करुनि तुम्हीं कांडिला व्यर्थ कोंडा ।
वाणि ! त्वद्दोष नाहीं, सुरसरिदुदरीं अंतरीं शुष्क धोंडा ॥ कृ वि. ७८.१८.
पाषाण आंत शुष्कचि, वाहो वरि देवसिंधुचा ओघ ॥ मं. भा. १०. ९७९.

हीं केवळ सारख्याच कथाभागामध्यें वर्णनसाम्यामुळें आलेलीं पुनरुक्तीचीं उदाहरणें दाखविलीं. आणखीही अशीं साम्यें मंत्रभागवत व कृष्णविजय यांमध्यें आढळतात. आतां कथासाम्य नसतांना निरनिराळ्या पंतांच्या काव्यांमध्यें दिसून येणाऱ्या साम्याचीं कांहीं उदाहरणें देतों.

१. येणें केलें मूर्त नादें त्वां, चित्त म्यां दिलें एणें ॥ वामनचरित्र ४६.
मूर्तिमती ती मंजुलगीतिव जाणों मृगव्रजीं आली । अमृतमथन ४ १७.

२. कोजे ? धर्म म्हणे ' श्रमे मन महाचिंताबळें चाकसें ' । कृ. वि. ७२. १४.
धरील, मन आधिनें बहु परिश्रमें चाकसें । केकावलि ४५.

३. सर्वस्व तुम्हीं माझें. मीं तुमचें, हें नकोचि बोलाया । कृ. वि. ८१. ३१.
सर्वस्व मी सज्जनाचें माझें सर्वस्व सज्जन । भक्तभूषण ६४.

## विभाग ८.

# काव्यतत्त्वविचार व पंतकविता.



यत्सेवनीयमसतामनृतप्रायं सुवर्णविन्यासम् ।
सुरसार्थमयं काव्यं त्रिविष्टपं वा समं विद्मः ॥

( गोवर्धन ) आर्यासप्तशती ४५.

१. नवनीतकार परशुरामपंत गोडबोले, निबंधमालाकार विष्णुशास्त्री, काव्यसंग्रहकार वामनराव ओक, पंतचरित्रकार पांगारकर यांसारख्या अनेक विद्वानांनीं, रसिकांनीं व नव्या, जुन्या, भाविक, अभाविक, वाङ्मयभक्तांनीं पंतकवितेचें गौरव केलें व तिला सर्वतोपरी उचलून धरलें यामुळें मोरोपंताविरुद्ध उघड आक्षेप काढण्यास अलीकडे कोणी धजत नाहीं हें खरें. तथापि अलीकडील सुशिक्षित समाज म्हणून आपण ज्याला म्हणतों त्या समाजाच्या मनांतला किंतु कांहीं पूर्णपणे नाहींसा झालेला नाहीं. पंतकवितेविषयींची अर्वाचीन सुशिक्षितांच्या मनांतील अढी समूळ नाहींशी झालेली नाहीं याचा प्रत्यय आम्हांस अनेकांच्या बाबतींत आला. पंतकवितेविषयींच नव्हे तर आमच्या एकंदर जुन्या कवींच्या कवितेविषयीं आमच्या आधुनिक समाजाचें मन पूर्णपणें साफ नाहीं. अव्वल इंग्रजींतल्या सुशिक्षितांस ज्याप्रमाणें आमचें जुनें वाङ्मय वेडगळ, पोरकट व टाकाऊ वाटून त्याची त्यांना लाज वाटत असे तसा प्रकार आतां उरलेला नाहीं. तथापि अजूनही ' आमची जुनी कविता केवळ परपुष्ट व भाषांतररूप आहे; आमचें जुनें वाङ्मय सर्व एकांगी आहे; तें केवळ पुनरुक्तिमय असून वेदांताच्या काथ्याकूटानें भरलेलें, निर्जीव व ऐहिक व्यवहारास सर्वथा निरुपयोगी असें आहे; '—अशा तऱ्हेचे समज पुष्कळांच्या मनामध्यें दृढ होऊन बसलेले आहेत.* पंतांच्या कवितेविषयीं तर विचारावयासच नको. ' पंतांची कविता म्हणजे महा बिकट, तिचा सरळ अर्थ कधीं लागावयाचा नाहीं; पंत निवळ भाषांतरे आहेत, त्यांच्या कवितेंत स्वतंत्र स्फूर्ति बिलकुल नाहीं; आणि पंत हे कवि तरी कसचे ! शिळ्या

* असल्या सर्व समजुतींचें आविष्करण वा. ब. पटवर्धन यांच्या ' काव्य व काव्योदय ' नामक निबंधामध्यें चांगल्या रीतीनें झालें आहे.

झालेल्या पौराणिक गोष्टी पुनः पुनः यमकानुप्रासांच्या अवडंबरानें सजवून सांगणारे 'हठादाकृष्टानां कतिपयपदानां रचयिता ।' अशापैकीं केवळ होत. उपमारूपकादि अर्थालंकारही त्यांनीं पुष्कळ चांगले साधले असतील; परंतु असले अलंकार साधले म्हणजे कांहीं उत्तम काव्य केलें असें होत नाहीं.'— असे आक्षेप अनेकांच्या मनांत आजपर्यंत दृढ धरून बसलेले आहेत.

या व असल्याच इतर आक्षेपांचें आजपर्यंत अनेकवार खंडन झालें आहे. तेव्हां त्या खंडनमंडनाच्या मानगर्डीत पुनः नव्यानें पडण्याचा आमचा मुळींच हेतु नाहीं. परंतु हे व अशा तऱ्हेचे आक्षेप निर्मूळ होण्याला निखालस रामबाण असा एक उपाय आम्हांस सुचवावासा वाटतो. तो उपाय म्हणजे या जुन्या कवितेचें प्रत्यक्ष अध्ययनच करण्यास सुरवात करणें हा होय. या शंकित मंडळींनीं जुन्या कवींच्या कवितामृतजलधीमध्यें एकदम बुडी मारून त्यांत अवगाहन करण्यास सुरवात करावी. जुन्या वाङ्मयाचें अध्ययन करा व मग त्यांत कांहीं व्यंगें आढळून आल्यास तीं खुशाल आधारांसह प्रकट करा. आमच्या जुन्या कवींच्या बाबतींत आजपर्यंत ही मोठीच गंमत होत आली आहे कीं, त्यांच्या कवितेवर आक्षेप काढणारे बहुतेक त्या कवितेशीं अनभ्यस्त असावयाचे व जे जे त्या कवितेचें अध्ययन करतील ते सर्व तिच्या अंतरंगांत रंगून जाऊन तिचे भक्त बनावयाचे! इतर कोणत्याही विषयांतले दोष दाखवावयाचे झाल्यास त्याची सांगोपांग माहिती करून घेतल्यानंतरच कोणाही व्यक्तीस दोषदर्शनाचा अधिकार प्राप्त होतो. परंतु आमच्या जुन्या कवींना नांवें ठेवणाऱ्यांस 'आपण जुन्या कवींचें कितीसें अध्ययन करून आपलीं हीं मतें बनविलीं आहेत?' असें विचारूं गेल्यास पुष्कळसा अंधारच दृष्टीस पडतो. तेव्हां क्षुल्लक गोष्टीवरून कांहीं तरी गैरसमज मनांत घेऊन न बसतां सर्वांनीं जुन्या कवींचें अवलोकन, वाचन व अध्ययन सतत करीत असावें. प्रपन्नवृत्तीनें व भक्तिभावानेंच आमच्या जुन्या संतकवींजवळ जा असें आम्ही म्हणत नाहीं. भक्तिभाव नसेल, किंबहुना सामान्य आदरभावही उत्पन्न होत नसेल तर खुशाल विरोधी भावनेनें त्यांना ह्याणून पाडण्यासाठीं त्यांची गांठ घ्या. शत्रूंस मित्र बनविण्याचें व निंदकांस स्तुतिपाठक बनविण्याचें सामर्थ्य त्या शब्दसृष्टीच्या ईश्वरांमध्यें खास वसत आहे.

२. याप्रमाणें स्वतः अध्ययन करून दुर्ग्रहांचा निरास करून घेणें हाच मार्ग जरी उत्कृष्ट व निर्विवाद असला तरी विवेचन करण्याचोचे मुद्देही या काव्यविष-

आंत अगदींच नसतात असें नाहीं. तेव्हां आजपर्यंत अनेकांनीं अनेकवार केलेल्या खंडनमंडनाचें चार्वितचर्वण करीत न बसतां जरा निराळ्या दृष्टीनें या विषयाचें विवेचन करण्याचा आमचा मानस आहे. काव्याचें स्वरूप काय, काव्याच्या भिन्न भिन्न अंगांचें स्वरूप काय, त्यांचा परस्पर संबंध कोणत्या प्रकारचा असतो, काव्य-संभारांत त्यांचें महत्व कोणतें, वगैरे गोष्टींचें दिग्दर्शन करून त्याच्या अनुरोधानें आमच्या जुन्या कवितेचें व विशेषत: पंतकवितेचें स्थान निश्चित करावयाचें आहे. काव्याच्या सहृदयहृदयाह्लादक स्वरूपाचा विचार करून त्याच्या अपेक्षेनें पंतकवितेचें व एकंदर जुन्या कवितेचें स्वरूपही वाचकांपुढें ठेवलें म्हणजे त्या कवितेच्या योग्यतेचा वाचकांस आपआपल्या पुरता स्वत: निवाडा करतां येईल. म्हणजे मताग्रहाचा प्रकार नको व भांडणांचें मूळही नको. असो. हें सर्व विवेचन करण्यांत आपल्या संस्कृत काव्यशास्त्रज्ञांचें त्याचप्रमाणें पाश्चात्य काव्यमर्मज्ञांचेंही यथेच्छ साहाय्य घेतलें आहे. तथापि त्यांच्या कडून घेतलेला भाग निराळा असा काढून दाखवितां येण्यासारखा नसल्याकारणानें व येथें केलेलें विवेचन हें लेखकाच्या अवलोकनाचें स्वतंत्र फल असल्यामुळें साहाय्यभूत झालेल्या ग्रंथकारांचा नामनिर्देश केला नाहीं.

३ आपल्या गीर्वाणवाङ्मयांत शास्त्रीयदृष्ट्या काव्यविवेचनास प्रारंभ फारच प्राचीनकाळीं झाला. इतक्या प्राचीन काळीं, कीं इतर अनेक शास्त्रांप्रमाणें काव्यविवेचनाचाही मूळ उगम सध्यां सांपडेनासा झाला आहे. यास्काचार्यांच्या निरुक्त-ग्रंथांत, म्हणजे पाणिनीय व्याकरणाच्याही पूर्वी, उपमेसारख्या अलंकारांच्या व्याख्या केलेल्या आढळतात; व पाणिनिकालीं तर अलंकारशास्त्राचा बराच उत्कर्ष झाला होता असें अष्टाध्यायींतील उल्लेखांवरून म्हणतां येतें. परंतु प्राचीन वाङ्मयांत घडून येणारा नेहमींचा प्रकार, म्हणजे उत्तरोत्तर निर्माण होणाऱ्या ग्रंथांमुळें पूर्वपूर्व ग्रंथांचा प्रचार नाहींसा होऊन ते ग्रंथ नष्ट होणें, हा काव्यविवेचनाच्या शास्त्रास फारच भोंवलेला दिसतो. त्यामुळें प्राचीन काळचे सर्व ग्रंथ नामशेष झालेले, किंबहुना ' नामापि न ज्ञायते ' अशा स्थितीप्रत पोंचलेले, आढळून येतात व उत्तरकालीन अस्तित्वांत असलेल्या ग्रंथांवरूनच शास्त्राची पूर्वीची परंपरा आजमावावी लागते. अशा रीतीनें प्रयत्न केला असतां येवढी गोष्ट निर्विवादपणें दिसून येते कीं पूर्वावस्थेमध्यें या शास्त्रांत अलंकारांचें फार प्राधान्य होतें. अलंकारांमुळेंच हें काव्यविवेचनाचें शास्त्र प्रथम उदयास आलें व

त्याचें नांव देखील ' अलंकारशास्त्र ' हेंच रूढ होऊन आजपर्यंत याच नांवाचा प्रचार विशेष चालत आलेला आहे. कवींनीं आपल्या कल्पनाविलासांनीं निर्माण केलेले नानातऱ्हेचे सुंदर अलंकार हेच काव्यविवेचकांच्या प्रथम नजरेस आले व त्यांचेंच त्यांनीं विवरण करून साहित्यशास्त्राचा पाया घातला. शृंगार, वीर इत्यादिक आठ अथवा नऊ रस हे त्या वेळच्या आलंकारिकांना माहीत नव्हते असें नाहीं. उपमादिक अलंकारांप्रमाणें शृंगारादिक रसांची कल्पनाही फार प्राचीन काळीं उगम पावली आहे. परंतु रसाचा अंतर्भाव नाट्यशास्त्राच्या विषयांत त्या वेळीं केला जात असे. नाटक ही रंगवस्तु म्हणजे प्रयोग करून प्रेक्षकांचें रंजन करण्याची गोष्ट असल्यामुळें सामान्य काव्यग्रंथापेक्षां त्यांत शृंगारादिक रसांस फारच महत्त्वाचें स्थान आहे. अर्थात् नाट्यप्रयोगाचा सर्व दृष्टींनीं विचार करणारें जें ' नाटयशास्त्र ' त्यांत रसाचा अंतर्भाव करून त्याचें विवेचन करण्यांत आलें. भाव, विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव या सर्वांचें विवरण करण्यांत येऊन, या सर्वांचा अभिनय कशा रीतीनें करावा व प्रेक्षकांच्या अंतःकरणांत रसोत्पत्ति कशी करावी याकडे मुख्य लक्ष दिलें गेलें. नाटयशास्त्रावरील भरतमुनींचा आद्य ग्रंथ पाहिल्यास त्यांत या सर्व गोष्टींचें विवेचन केलेलें दिसून येतें.* परंतु काव्य-नाटकांचा केवळ वाङ्मयग्रंथ या नात्यानें विचार करणारे जे खरेखुरे वाङ्मयविवेचक त्यांच्या ग्रंथांत अलंकारांचेंच प्रामुख्यानें विवरण केलेलें आढळतें. उपलब्ध ग्रंथकारांत प्राचीन, असा अलंकारशास्त्राचा आद्याचार्य जो भामह त्याच्या ग्रंथांत अलंकारांचेंच प्रामुख्यानें विवरण आहे. त्याच्याच इतका प्राचीन काव्य-शास्त्रमर्मज्ञ जो दंडी त्यानें आपल्या ' काव्यादर्श ' नामक ग्रंथांत काव्याचे गुण व अलंकार यांचेंच सोदाहरण विवेचन केलेलें आहे. या पूर्वकालीन आलंकारिकांना, सहृदयहृदयाह्लादक अशा काव्यांतील रसरूपी तत्त्वाची जाणीव नव्हती असें नाहीं. रसाचें अस्तित्व त्यांस ज्ञात होतें व मान्यही होतें; परंतु उपमादिक अलंकारांप्रमाणें रसाला ते अलंकारांपैकींच गणीत असत. शृंगारादि रस अथवा भाव ज्या काव्यांत आविर्भूत झालेला असेल तेथें रसवत् अथवा प्रेयस् असे अलंकार होतात असें त्यांनीं मानिलें होतें. सारांश, विशेष शास्त्रीय विचार न करितां काव्यांत जें जें कांहीं रमणीय असें आढळेल त्याची त्याची अलंकारांत गणना करून अलंकारांच्या संख्येंत भर टाकावयाची असेंच या प्राचीन आलं-

* भरतनाटयशास्त्र अ० ६, ७.

कारिकांचें सामान्यतः धोरण होतें. परंतु सहृदय व मर्मज्ञ काव्यविवेचकांच्या विचारांची जसजशी परिणति होऊं लागली तसतसें काव्यविवेचनाचा सर्वच प्रांत व्यापून बसणाऱ्या या अलंकारांचें डोईजड झालेलें प्रस्थ त्यांस मान्य होई-नासें झालें. उपमादि अर्थालंकारांच्या व अनुप्रासादि शब्दालंकारांच्या व्याख्या, त्यांचे प्रकार व त्यांचीं उदाहरणें हाच काय तो मुख्य साहित्यशास्त्राचा सांगाडा बनून राहिला होता तो या नवीन सहृदय विवेचकांनीं ढांसळून टाकला. काव्याच्या स्वरूपाविषयीं मर्मग्राही दृष्टीनें विचार सुरू झाला. काव्याचें सहृदयाह्लादक असें मुख्य अंग कोणतें, बाकीचीं गौण अंगें कोणतीं, त्या सर्वांचें परस्पर महत्त्व काय, वगैरे गोष्टींची चर्चा सुरू झाली व निरनिराळ्या रसिकांचे निरनिराळे सिद्धांत बाहेर पडूं लागले. कित्येकांनीं वक्रोक्ति हें काव्यसौंदर्याचें मूलतत्त्व म्हणून प्रति-पादन केलें तर कित्येकांनीं ' रीतिरात्मा काव्यस्य ' असें म्हणून ' रीति ' ( घाटणी, रचनाशैली ) हिलाच सर्वस्वीं प्राधान्य दिलें. या सर्व विचारमंथनांत काश्मीरस्थ ' **सहृदयां** ' नीं* केलेलें काव्याच्या मूलतत्त्वांचें विवेचन विशेष मान्यतेस पावलें, व मम्मटासारख्या वाग्देवतावतारानें त्याला उचलून धरून आपल्या ग्रंथांत कायमचें स्थान दिल्यापासून या काश्मीरक ' सहृदयां ' चींच तत्त्वें साहित्यशास्त्रांत बहुमान्य झालीं आहेत. हीं तत्त्वें अगदीं थोडक्यांत पुढील-प्रमाणें सांगतां येतील.

४. नेहमींच्या व्यवहारांतील भाषाप्रयोगामध्यें शब्दांचा जो सरळ अर्थ आपण करतों त्याला वाच्य अर्थ म्हणतात. परंतु ज्याप्रमाणें स्त्रियांच्या भिन्न भिन्न अवयवांच्या ठेवणीखेरीज त्यांचें लावण्य म्हणून कांहीं निरालेंच असतें त्याप्रमाणें महाकवींच्या वाणीमध्यें वाच्य अर्थाहून भिन्न असा ' प्रतीयमान ' किंवा "व्यंग्य'

*ध्वनीचें तत्त्व प्रतिपादणारे हे काश्मीरक विवेचक स्वतःस ' सहृदय ' म्हणवीत असत असें त्यांच्या ध्वन्यालोक नामक प्रसिद्ध ग्रंथावरून दिसतें. या 'सहृदयां'च्या पैकींच एकानें, अगर अनेक मंडळींनीं एकत्र विचार करून, ध्वनीचें प्राधान्य प्रस्थापित करण्याकरितां ध्वनिकारिका लिहिल्या. व यांच्यापैकींच आनंदवर्धन नामक सुप्रसिद्ध ग्रंथकारानें त्या कारिकांवर वृत्ति लिहून तो समग्र ग्रंथ ' ध्वन्या-लोक ' या नांवानें प्रसिद्ध केला. काव्यविवेचनाच्या शास्त्रांत या ग्रंथानें मोठीच क्रांति घडवून आणली. मम्मटांनीं आपल्या काव्यप्रकाशांत याच ग्रंथांतील तत्त्वें बहुतेक ग्रहण केलीं आहेत.

अर्थ दिसून येत असतो.* हा व्यंग्यार्थ हेंच काव्यांतील सहृदयहृदयसंवेद्य व अनिर्वचनीय असें सौंदर्यशालि तत्त्व होय. ज्या काव्यांत हा व्यंग्यार्थ प्रधान असेल तें काव्य उत्तम होय; अशा काव्यास 'ध्वनि' असेंही म्हणतात. ज्या काव्यांत व्यंग्यार्थाच्या अपेक्षेनें वाच्यार्थच विशेष आल्हादकारी असेल किंवा दोन्हेही सारखेच आल्हादक असतील तें मध्यम काव्य होय. ज्या काव्यांत व्यंग्याला कांहीं महत्त्व नसून वाच्यार्थच चमत्कृतिपूर्ण असेल किंवा जेथें केवळ शब्दरचना वैचित्र्ययुक्त असेल तें अधमकाव्य होय. त्यास चित्रकाव्य असेंही म्हणतात.

वर सांगितलेल्या व्यंग्यप्रधान काव्यरचनेचे, म्हणजे 'ध्वनी'चे, निरनिराळ्या तत्त्वांनुसार अनेक भेद केलेले आहेत. ध्वनिकाव्यांतील वाच्यार्थाच्या अवस्थेस अनुलक्षून विवक्षितान्यपरवाच्य व अविवक्षितवाच्य असे प्रथम दोन विभाग करून नंतर त्याचे अनेक प्रभेद केले आहेत. काव्यांतील व्यंग्यार्थ कोणत्या प्रकारचा आहे इकडे लक्ष देऊन व्यंग्यार्थाच्या प्रकारास अनुलक्षून भेद केले म्हणजे वस्तुरूपध्वनि, अलंकाररूपध्वनि व रसरूपध्वनि असेही भेद मानिता येतात. या सर्व ध्वनींच्या प्रकारांमध्यें रसध्वनि हाच निःसंशय महत्त्वाचा होय. शास्त्राच्या पूर्णतेकरितां ग्रंथकारांनीं इतर प्रकारांचेंहि वर्णन केलेलें असलें तरी रसध्वनींचेंच अत्यंत प्रामुख्यानें व विस्तारानें वर्णन त्यांना करावें लागलें आहे. रसिक वाचकांच्या दृष्टीनें तर इतर प्रभेदांस कांहींच महत्त्व नसून रसध्वनि हाच काव्याचें सारसर्वस्व होय. काव्यवाचकांच्या अनुभवाला येणारे जे शृंगार, वीर, करुण इत्यादि नऊ रस ते काव्यामध्यें व्यंग्यार्थाच्या रूपानेंच प्रतीत होतात. शब्दांचा वाच्यार्थ कधींही रस असूं शकत नाहीं. मेघदूताच्या उत्तर भागांत यक्षानें आपल्या प्रियेच्या विरहावस्थेचें वर्णन केलें आहे. व तिला निवेदन करण्याचा निरोप मेघास सांगितला आहे. त्या अप्रतिम वर्णनापासून विप्रलंभशृंगाराची व करुणाची निष्पत्ति होते व तो वाचकांस अगदीं चटका लावून सोडतो. परंतु हें सामर्थ्य त्या काव्याच्या शब्दार्थांत नाहीं. स्त्रीच्या विरहगलित अवयवांचें वर्णन, तिच्या विरहावस्थेंतील व्यापारांचें वर्णन वगैरे निरनिराळ्या वाच्यार्थांची सामग्री एकत्र होऊन त्याच्यामुळें वाचकांच्या मनांतील सुप्त भावना उचंबळून येऊन जो एक अनिर्वचनीय व केवळ अनुभवजन्य असा आनंद रसिकांस होतो तो अप्रत्यक्षपणें म्हणजे व्यंजनेनेंच होतो.

---

* प्रतीयमानं पुनरन्यदेव वस्त्वस्ति वाणीषु महाकवीनाम् ।
यत्तत्प्रसिद्धावयवातिरिक्तं विभाति लावण्यमिवाङ्गनासु ॥ ध्वन्यालोककारिका ४.

तें रस म्हणजे अमक्याच शब्दांचा अर्थ होय असें कधींही सांगतां येत नाहीं.

सहृदय वाचकांचें चित्त तल्लीन करून दिव्य आनंदाचा अनुभव देणारा, 'पुर इव परिस्फुरन्, हृदयमिव प्रविशन्, सर्वाङ्गीणमिव आलिङ्गन् अन्यत्सर्वमिव तिरोदधत्, ब्रह्मास्वादमिवानुभावयन्, अलौकिकचमत्कारकारी ' असा जो रस तो काव्याचा आत्मा होय. ( काव्यप्रकाश, उल्लास ४. ) मनुष्याच्या आत्म्याचे ज्याप्रमाणें शौर्य, धैर्य, इत्यादि गुण आहेत त्याप्रमाणें माधुर्य, ओज व प्रसाद हे काव्याचा आत्मा जो रस त्याला शोभविणारे गुण मानिले आहेत.* शब्दार्थात्मक जें बाह्यस्वरूप तें काव्याचें शरीर होय. आणि अनुप्रासादि शब्दालंकार व उपमादिक अर्थालंकार हे हार. केयूर इ० भूषणांप्रमाणें शब्दार्थात्मक जें बाह्यशरीर त्याचीं भूषणें होत.‡ शरीराच्या द्वारानें हे अलंकार आत्मा जो रस त्याचेही उपकारक होतात. याप्रमाणें काव्यावर मनुष्याचें रूपक करून त्याच्या निरनिराळ्या अंगांचा परस्परसंबंध व योग्यता हीं या ध्वनिसंप्रदायी आलंकारिकांनीं निश्चित केलीं आहेत.

५. अलंकारांची क्षुद्रता व काव्यसृष्टीच्या संभारांत त्यांची कांहीं योग्यता नाहीं असें दाखविण्याची प्रवृत्ति जास्तींत जास्त कोठपर्यंत जाऊं शकते हें दाखविण्याकरितांच ध्वनिसांप्रदायिकांच्या तत्त्वांचें वर विवरण केलें आहे. अलंकारांच्या रूपानें प्रकट होणारा कवींचा कल्पनाविलास म्हणजे केवळ बाह्यभूषणांप्रमाणें होय; तो असला तरी वाहवा, नसला तरी त्याच्यामुळें काव्याच्या उत्कर्षांत कांहीं कमीपणा येत नाहीं असेंच यांचें सरासरी मत आहे. साहित्याला शास्त्रीय व सुसंघटित असें स्वरूप ज्यांनीं दिलें त्या आनंदवर्धन, मम्मट इत्यादि काव्यमर्मज्ञांच्या ग्रंथांमध्येंच अलंकारांची योग्यता अशा रीतीनें कमी ठरविण्याच्या प्रवृत्तीचा कळस झाला आहे. भामह, उद्भट, दंडी वगैरे प्राचीन काव्यविवेचकांच्या ग्रंथांत अलंकारांसच सर्वस्वीं प्राधान्य होतें हें आपण पाहिलेंच आहे. परंतु मूलतत्त्वांचा शास्त्रीय दृष्टीनें विचार न करितां वरवर दिसणारे भाराभर गुण व अलं-

* आत्मन एव हि यथा शौर्यादयः, नाकारस्य, तथा रसस्यैव माधुर्यादयो गुणा, न वर्णानाम् । काव्यप्रकाश, उल्लास ८.

‡ उपकुर्वन्ति तं सन्तं येऽङ्गद्वारेण जातुचित् ।
हारादिवदलंकारास्तेऽनुप्रासोपमादयः॥ काव्यप्रकाश; उल्लास ८.
अङ्गद्वारेण='वाचक -( शब्द )-वाच्य-( अर्थ )-लक्षणाङ्गातिशयमुखेन । '

कार तेवढें सांगणें म्हणजे खरें काव्यविवेचन नव्हे असें मार्मिक सहृदयांना हळू हळू दिसून येऊं लागलें. यानंतर बरेंचसें विचारमंथन होऊन ध्वनीचें तत्व बाहेर पडलें व पुष्कळशा टीका प्रतिटीका होऊन तें कायम झालें. या ध्वनितत्वाच्या आधारावर काश्मीरांतील आलंकारिकांनीं साहित्यशास्त्राचा सर्व सांगाडा उभा केला. जुन्या मतांत क्रांति करूं पहाणाऱ्या सुधारणावाद्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या ध्वनिसंप्रदायांतील विवेचकांनीं अर्थातच लंबक दुसऱ्या टोकास नेला. गुण व अलंकार यांना कमी महत्त्वाचे लेखून अगदीं कोपऱ्यांत ढकलून दिलें व काव्याची सर्व सृष्टि एका ध्वनीच्या आंसाभोंवतीं त्यांनीं फिरावयास लाविली.

६. वस्तुत: पाहिलें तर, वर ज्यांचा सारांश दिला आहे ते मम्मटादिक काश्मीरस्थ सहृदयांचे सिद्धान्त अगदींच अयुक्तिक आहेत असें म्हणवत नाहीं. उत्कृष्ट काव्यापासून जो आल्हाद होऊन चित्तवृत्ति तल्लीन होते तो केवळ शब्दांच्या वाच्यार्थापासून खास होत नाहीं. वाच्यार्थापासून निघालेला परंतु त्याच्यापेक्षां महत्वाचा व रमणीय असा 'ध्वनि' आपल्या चित्तावर उमटतो त्याचाच तो परिणाम होय. आपण पंतांच्याच कवितेंतलें एक उदाहरण घेऊन पाहूं.——

> जगत्त्रयमनोहरा ! बलगुणैकरत्नाकरा !
> म्हणे ' कनकरंकु द्या मज, महा प्रयत्ना करा '। ( कनकरंकु-सुवर्णमृग )
> प्रियाहि अशि जाहली तुज कुकार्यं आज्ञापिनी
> सुधा त्यजुनि कामुक प्रकट अंगनाज्ञा पिती ॥ केका ८३.

साभिप्राय पदांनीं युक्त असें हें सुंदर ध्वनिकाव्य आहे. ' प्रियेनें कुकार्य करण्याची आज्ञा केली असतांही ती रामानें पार पाडली, तेव्हां कामुक लोक अमृतालाही टाकून स्त्रियांची आज्ञा पाळण्यांत कृतार्थता मानतात, ' असा येथें वाच्यार्थ आहे; परंतु कामुक लोकांच्या वर्तनाचें सोदाहरण वर्णन करण्याचा येथें कवीचा मुळींच उद्देश नाहीं. ' हे देवा, कामुकत्वाचा दोष पत्करून प्रियेनें सांगितलेलें अनुचित कार्यही करण्यास तुम्ही तयार झालां ! तर मला उद्धरण्याचें अत्यंत उचित कार्य करण्यास कां तयार होत नाहीं ? ' अशी भक्ताची आर्तोक्ति येथें प्रमुखत्वानें ध्वनित झाली आहे. व श्लोकाचें रमणीयत्व या ध्वन्यर्थांतच आहे. असो. काव्यास चारुत्व आणणारा हा जो व्यंग्यार्थ, तो मुख्यत्वेंकरून रसाच्या स्वरूपाचा असतो; व या अनुकूलसंवेदनात्मक रसा-

च्याच योगानें सहृदयाचें चित्त आनंदनिर्भर होत असल्यानें, रसास काव्याचा आत्मा म्हणण्यापर्यंत या विवेचकांची पाळी आली आहे तीही युक्तच आहे. मात्र रस या शब्दाचा जो संकुचित अर्थ जुन्या ग्रंथांत केला जातो तो योग्य नाहीं. केवळ शृंगार, वीर, करुण इत्यादि नऊ विभागांच्या साच्यांत बसला म्हणजेच तो रस नाहींतर नाहीं, असें न मानतां, ज्या भावना उत्कट स्थितीस पोंचल्या असतां मनुष्याचें चित्त वेधून त्यास तल्लीन करून सोडतात त्या सर्वांचा रस या संज्ञेत समावेश केला पाहिजे. अशा रीतीनें रस या शब्दाचा अर्थ विस्तृत केला म्हणजे रस काव्याचा आत्मा होय, निदानपक्षीं तो काव्याचा एक प्रमुख घटक आहे ही गोष्ट पटण्यास हरकत नाहीं.

७. याप्रमाणें ह्या ध्वनिसांप्रदायिकांच्या विचारसरणींत पुष्कळसें तथ्य असलें तरी काव्याच्या स्वरूपाविषयीं व्यापक रीतीनें विचार केला म्हणजे हिच्यांत बराचसा एकांगीपणा आहे असें वाटल्याखेरीज रहात नाहीं. सौंदर्यनिदर्शन करून रसिकाच्या चित्ताला अत्युच्च, उदात्त व सात्त्विक अशा आनंदाची प्राप्ति करून देणें हें काव्याचें कार्य होय. हें कार्य रसनिष्पत्तीच्या योगानें कवि पुष्कळ वेळां घडवून आणतात यांत शंकाच नाहीं. परंतु कवींच्या करामतीकडे पाहूं गेल्यास 'रसिकचित्त तर्पित' करण्याचें कार्य ते सदा सर्वदा भावनांच्या उत्कर्षानेंच घडवून आणतात असें म्हणतां येत नाहीं. भावनेच्या बरोबरच दुसरें एक साधन कवींना उपलब्ध असलेलें आढळतें व या दुसऱ्या साधनाचा सर्व देशांतील कवींनीं मनमुराद उपयोग करून घेतल्याचेंही दिसून येतें.

हें दुसरें साधन म्हणजे कवींचा कल्पनाविलास होय. कोणत्याही विषयाचें सरळ रीतीनें वर्णन न करितां रम्य कल्पनांनीं त्याला नटवून वाचकांपुढें ठेवलें म्हणजे त्याच्यापासून विशिष्ट आनंदाची प्रतीति होते. मनुष्य हा कल्पनाशाली प्राणी आहे. साध्या अर्थाचें सेवन करतांना कल्पनेचें लोणचें त्याला अवश्य लागतें. वर्तमान स्थिति कितीही उत्कृष्ट असली तरी नानातऱ्हेचीं काल्पनिक मनोराज्यें करून त्यांचें सुख अनुभविण्यांत दंग होत नाहीं असा मनुष्य कोण आहे ? प्रत्यक्षानें किंवा वस्तुस्थितीनें मनुष्याचें कधींच समाधान होत नाहीं. कल्पनेचा डोलारा उभा करून त्याचें अवलोकन करण्यांतच त्यास अप्रतिम आनंद होतो. काल्पनिक सौंदर्याची सृष्टि निर्माण करण्याची ही प्रवृत्ति

वाङ्मयाच्या प्रांतामध्येंही दिसून येतेच. सहज बोलतांना आपण कल्पनेनें सज-वलेली भाषा वापरतों. अगदीं साध्या व्यवहाराच्या बोलीमध्यें हा प्रकार कसा चालतो याचें अवलोकन केल्यास मोठी मौज वाटते. ' आंधळ्यांची माळ चालली आहे, ' ' तो वामनमूर्ति आहे. '- येथें पहिल्या वाक्यांत आंधळ्यांच्या रांगेवर माळेची कल्पना केली आहे व दुसऱ्यांत एका मनुष्याचा वामन नांवाच्या सुप्रसिद्ध ठेंगू व्यक्तीशीं सारखेपणा स्थापित केला आहे. येथें पहिल्या वाक्यांत निदर्शना व दुसऱ्यांत उपमा असे अलंकार झाले आहेत. मोठमोठे अलंकार करून आपण कवींच्या पदवीस बसत आहों असें हीं वाक्यें शेकडों वेळां तोंडांतून काढणाऱ्या माणसाच्या लक्षांत तरी येत असेल काय ? त्याच-प्रमाणें ' माझ्या अंगाची लाही झाली, ' ' तो फुटाण्यासारखा उडाला, ' 'त्यानें अधिकाऱ्यापुढें पदर पसरला, ' ' त्याला बायको मोठी फटाकडी मिळाली, ' ' कौन्सिलांतील कामकाज म्हणजे भातकुलीचा खेळ आहे, ' ' म्युनिसिपालिट्या म्हणजे खराट्याचें स्वराज्य आहे '—अशीं शेकडों अलंकारिक वाक्यें सांगतां येतील. असलीं वाक्यें मोठीं मोहक व चटकदार असतात. त्यांत थोडक्यामध्यें पुष्कळ खुबीदार अर्थ भरलेला असतो. यामुळें तीं अतिशय परिणामकारक होतात. शेवटल्याच वाक्यांतल्या 'खराट्याचें स्वराज्य' या शब्दप्रयोगाकडे लक्ष दिल्यास, विरोधाभास, कुचेष्टा, विनोद, उपहास वगैरे गोष्टींचें त्यांत किती बेमालूम मिश्रण झालेलें आढळतें ! हा शब्दप्रयोग ज्यानें प्रथम उपयोगांत आणला तो गृहस्थ मोठा चतुर व प्रतिभावान् असला पाहिजे यांत शंका नाहीं. आपल्या भाषेंतल्या शेकडों म्हणी असल्या अलंकारिक भाषासरणीचें सुंदर मासलेच आहेत. उदाहर-णार्थ—' थेंबे थेंबे तळें साचे, ' ' रडतराव घोड्यावर बसविणें, ' ' दुरून डोंगर साजरे, ' इ० इ०. माजी बिनसुधारलेल्या सुप्रीम कौंसिलांत रौलट बिलाचा वादविवाद चालू असतांना नामदार दादासाहेब खापर्डे यांनीं आपल्या भाषणांत ' रौलट बिलें हीं दोन फारच सुंदर गुलाबाचीं फुलें आहेत; मात्र त्यांचा सुवास इंग्रज सरकारला मिळावयाचा असून कांटे केवळ नेटिव प्रजेला बोंचणार आहेत. ' असा काव्यमय युक्तिवाद केला तेव्हां त्या गंभीर व त्वेषाच्या प्रसंगींही सर्वांस मोठीच मौज वाटली व सगळीकडे हंशा पिकला. तेव्हां सुंदर व समर्पक कल्पना-विलासाचे ठायीं मन प्रफुल्लित करण्याचें असें अद्भुत सामर्थ्य आहे. वर्ण्यविष-याला अशा तऱ्हेनें कल्पनेची जोड देऊन त्यांत जास्त माधुरी आणण्याची प्रवृत्ति

वाङ्मयाच्या सर्वच प्रांतांत थोडी बहुत दिसून येते परंतु वाङ्मयाच्या इतर विभागां-पेक्षां काव्यामध्यें कल्पनेचें प्राचुर्य फारच अधिक प्रमाणांत दृष्टीस पडतें. रमणी-यार्थनिष्पत्ति हें काव्याचें साध्यच असल्यामुळें कल्पनांचा विलास काव्यांत इतका दिसून येतो हें सहजच आहे. या कल्पनाशालितेवर कवींनीं आपला छाप इतका दृढ बसविला आहे कीं कोठेंही कल्पनामय व अलंकारिक असें वर्णन आढळलें कीं त्याला ' काव्यमय ' असें म्हणण्याचा प्रघातच पडून गेला आहे. कवींची कल्पनाशालिता ही सर्व भाषांच्या वाङ्मयांत इतकी प्रसिद्ध आहे कीं, बिचाऱ्या कवींना केवळ वेड्यांच्या कोटींत ढकलून देण्याची सर्वत्र रीतच होऊन बसली आहे.

ह्या कवींचा कल्पनाविलास काव्यामध्यें ज्या निरनिराळ्या प्रकारांनीं प्रकट होतो त्यांस संस्कृत साहित्यशास्त्रांत 'अलंकार' हें नांव फार प्राचीन काळापासून दिलें गेलें आहे. असदृश वस्तूंमध्यें साम्य दाखविणें, भिन्न वस्तूंमध्यें अभेद वर्णन करणें, अविरोधी गोष्टींमध्यें विरोध भासविणें, कार्याचें कल्पित कारण दर्शित करणें किंवा कारणापासून असंभाव्य असें कार्य झालेलें दाखविणें, कार्यकारणांचा विपर्यास करणें, हे सर्व कवींच्या कल्पनेचेच खेळ होत. आणि हेच सर्व प्रकार आमच्या साहित्य-शास्त्रकारांनीं अलंकार म्हणून गणिले आहेत. अर्थात् अलंकार म्हणजे दुसरेंतिसरें कांहीं नसून कल्पनाचमत्कृतीचेच निरनिराळे प्रकार होत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. रमणीय अर्थाची निष्पत्ति करणें हें काव्याचें प्रधान उद्दिष्ट होय. अशा, वाचकांस तन्मय करणाऱ्या रम्य अर्थाची निष्पत्ति कवि दोन मार्गांनीं करीत असतात. पहिला मार्ग रसनिष्पत्तीचा, म्हणजे भावनांचा उत्कर्ष करून वाचकांना आनंद-समुद्रामध्यें लीन करून सोडण्याचा होय. दुसरा मार्ग म्हणजे कल्पनाविलासाच्या योगानें अर्थामध्यें चमत्कृति उत्पन्न करून वाचकांना रमविण्याचा होय. अर्थात् भावना ( Feeling, sentiment ) व कल्पना ( Imagination ) या दोहोंचा उत्कर्ष करून तद्द्वारा केलेली रमणीय अर्थाची निष्पत्ति म्हणजे काव्य असें सामान्यतः समजण्यास हरकत नाहीं.

८. आमचे ध्वनिवादी जे मम्मटप्रमुख साहित्यशास्त्रज्ञ त्यांनीं हें अलंकारांचें महत्व मान्य केलेलें नाहीं हें मागें जो त्यांच्या मतांचा सारांश दिला आहे त्यावरून लक्षांत येईलच; परंतु आमचे सर्वच काव्यविवेचक कांहीं ध्वनिसंप्रदायाचे अनुयायी बनलेले नव्हते. ध्वनिसंप्रदायाचा प्रचार होण्याचा पूर्वी झालेल्या भामह, उद्भट, दण्डी इत्यादि ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत अलंकारांनाच सर्वांशीं प्राधान्य दिलेलें

आहे. शिवाय अलंकार म्हणजे चंद्रकळेवर बसविलेल्या आरसपानी टिकल्यांप्रमाणें किंवा खडीच्या फुलांप्रमाणें परस्पर संबंध नसलेल्या अशा कलाकुसरीच्या वस्तु नव्हेत, तर त्यांच्यामध्यें कांहीं तरी सामान्य तत्त्व वसत आहे व तें सामान्य तत्त्व काव्याचें अगदीं प्रमुख असें अंग आहे या गोष्टीची अस्पष्ट जाणीव भामह, दण्डी इत्यादिक प्राचीन आलंकारिकांना होत चालली होती. सर्व अलंकारांचें मूळ कवीचा कल्पनाविलास होय असें स्पष्ट कोणी म्हटलेलें नाहीं. त्याला चमत्कृति, वक्रोक्ति, अतिशयोक्ति अशीं निरनिराळीं नांवें निरनिराळ्या ग्रंथकारांनीं दिलीं आहेत. दण्डी ह्मणतो —

अलंकारान्तराणामप्येकमाहुः परायणम् ॥
वागीशमहितामुक्तिमिमामतिशयाह्वयाम् ॥ काव्यादर्श, २.२२०.

'वागीश्वरांनीं गौरविलेली ही अतिशयोक्ति इतर सर्व अलंकारांचेंही श्रेष्ठ आश्रयस्थान म्हणून मानिली आहे.' भामहानें या सर्व अलंकारांच्या मूलतत्त्वास वक्रोक्ति असें म्हटलें आहे.—

सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते ।
यत्नोऽस्यां कविना कार्यः कोऽलंकारोऽनया विना ॥ भामह, २.८५.

'सर्व अलंकारांत दिसून येणारी ही सर्व वक्रोक्तीच होय. हिच्या योगानें अर्थास शोभा येते. कवीनें हिच्याविषयीं यत्न करावा. हिच्याशिवाय असूं शकेल असा कोणता अलंकार आहे?' कालांतरानें इतर सर्व नांवें मागें पडून वक्रोक्ति हेंच नांव विशेष रूढ झालें. नाना तऱ्हेच्या अलंकारांना प्रसविणारी कल्पनाचमत्कृति म्हणजेच ही भामहादिक आलंकारिकांची वक्रोक्ति असें स्थूलमानानें समजण्यास हरकत नाहीं. तेव्हां रसास प्रधान मानणाऱ्या विवेचकांप्रमाणें अलंकारांस म्हणजे कल्पनाविलासास प्रधान मानणारा विवेचकांचा संप्रदायही आपल्याकडे निर्माण झाला होता हें वरील वृत्तांतावरून ध्यानांत येईल. अलंकारांस प्रधान मानणाऱ्या पक्षाची जसजशी परिणति होत गेली तसतसें वक्रोक्तीचें महत्वही वाढत गेलें व शेवटीं या वक्रोक्तीसच काव्याचा आत्मा मानण्यापर्यंत मजल गेली. म्हणजे ध्वनिवादी जसे एका टोकास गेले तसे हे वक्रोक्तिवादी अगदीं दुसऱ्या टोकाला गेले. परंतु सहृदयग्राह्य असें खरें तत्त्व दोघांच्या मधोमध असून, रस व अलंकार, व्यंग्योक्ति व वक्रोक्ति, किंवा भावना व कल्पना यांना काव्याच्या प्रांतांत एकमेकांच्या बरोबरीनें महत्त्व आहे हें वर स्पष्ट केलेंच आहे.

९. संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांच्या कल्पनांस अनुसरून येथपर्यंत विवेचन केलें. पाश्चात्य रसिकांकडे व काव्यविवेचकांकडे पाहिलें असतां तेथेंही कांहींसा असाच प्रकार दिसून येतो. म्हणजे कांहीं विवेचक काव्याचें स्वरूप वर्णन करतांना. भावना किंवा हृदयविकार यांनाच सर्वस्वीं महत्त्व देतात तर इतर कांहीं वाङ्मय-चिकित्सक कल्पनाचमत्कृतीसच विशेष प्राधान्य देतात. परंतु पाश्चात्य विवेचकांमध्यें मतभिन्नतेचा हा जो प्रकार येतो तो पक्षाभिनिवेशानें किंवा संप्रदायानुसरणामुळें आलेला नसून प्रत्येकाच्या प्रकृतिभिन्नतेमुळेंच आलेला दिसतो. उदाहरणार्थ, वर्डस्वर्थ कवीनें काव्याची व्याख्या 'Spontaneou sover-flow of powerful feelings' 'प्रबल भावनांचा सहजोद्रेक' अशी केली आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं त्याच कवीनें 'Poetry is the breath and finer spirit of all knowldge,' 'जिवंतपणानें स्फुरणारें सर्व ज्ञानाचें सारभुत तत्त्व म्हणजे काव्य' असेंही काव्याचें स्वरूप वर्णिलें आहे हीं दोन्ही वर्णनें वर्डस्वर्थच्या स्वतःच्या प्रकृतीस अनुरूप अशींच आहेत. प्रस्तुत कवीच्या ठायीं कल्पनाशालिता फारशी नव्हती, अर्थात् त्याच्या व्याख्येंत कल्पनेचा चुकूनही संबंध आलेला नाहीं याची संगति तेव्हांच लागते. त्याचें अंतःकरण भावनाप्रधान होतें; तो तत्त्वज्ञानी असून तत्वविचारप्रियही होता. या त्याच्या दोन्ही व्यक्तिगत विशेषांचें प्रतिबिंब त्याच्या दोन्ही व्याख्यांत पडलेलें उघडच दिसतें आहे. याच्या उलट अत्यंत तरल कल्पनेच्या शेली नामक कवीनें केलेली व्याख्या पहा—'Poetry in a general sense may be defined as the expression of the imagination.' 'साधारणतः काव्य म्हणजे कल्पनेचा आविष्कार अशी काव्याची व्याख्या करितां येईल.' यांत कल्पनेशिवाय इतर अंगांचा उल्लेख देखील केलेला नाहीं. याप्रमाणें बहुतेक पाश्चात्य कवींनीं व रसिकांनीं आपआपल्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून काव्याचें वर्णन निरनिराळ्या प्रकारें केलें आहे. तथापि या सर्व वर्णनांचा व व्याख्यांचा निष्कर्ष काढला तर तो 'कल्पना व भावना यांच्या द्वारा केलेली रमणीयार्थनिष्पत्ति' असाच निघेल यांत संशय नाहीं.

जगतांतलि वस्तुजातांचें सौंदर्य व त्याची अपूर्वता चित्तवेधक रीतीनें प्रकट करण्याचें कवीचें सामर्थ्य केवळ अद्भुत व अनुभवगम्य असतें हें तर खरेंच. तथापि केवळ वरवर पाहूं गेलें तरी आपल्या कल्पनाविलासाचें साहाय्य कवि किती

घेतात तें सहज दिसून आल्याखेरीज रहात नाहीं. या दृष्टीनें Leigh Hunt नामक आंग्ल टीकाकाराचा पुढील उतारा मोठा समर्पक आहे. शास्त्रज्ञाहून किंवा सामान्य मनुष्याहून कवीचा व्यापार कसा निराळा असतो व कल्पनेच्या साहाय्यानें कोणत्याही वस्तूचें सौंदर्य,अपूर्वत्व मनुष्याच्या अंतःकरणाशीं तेव्हांच समरस होईल अशा रीतीनें कवि कसें वर्णन करतात हें या उताऱ्यांत फारच सुरेख रीतीनें सांगितलें आहे.—

'Poetry begins where matter of fact or of Science ceases to be merely such......Inquiring of a gardener, for instance, what flower it is we see yonder, he answers 'a lily.' This is a matter of fact. The botanist pronounces it to be of the order of Hexandria monogynia. This is matter of science. It is the 'lady' of the garden says Spenser; and here we begin to have a poetical sense of its fairness and grace. It is 'the plant and flower of light,' says BenJonson and poetry than shows the beauty of the flower in all its mystery and splendour.'*

'बागेतल्या एकाद्या पुष्पाविषयीं माळ्याला विचारलें तर तो 'मालती' अगर 'शेवंती' असे त्याचें कांहीं तरी नांव सांगेल. वनस्पतिशास्त्रज्ञास विचारलें तर तो Hexandria monogynia वगैरे वर्गांतलें तें आहे म्हणून सांगेल. परंतु ती 'उद्यानसुंदरी' आहे असें स्पेन्सर कवि वर्णन करील. 'ती प्रकाशाची पुष्पलता आहे,' असें त्याचें बेन् जान्सन कवि वर्णन करील. तेव्हां, या कवींच्या उक्तींमध्यें त्या पुष्पाचें खरें सौंदर्य, त्यांतील अपूर्वता व शोभा यांसह आपल्याला प्रतीत होतें.'—असा वरील उताऱ्याचा भावार्थ आहे.

वरील विवेचनावरून रस किंवा भावना (feeling) यांबरोबर अलंकार-द्वारा स्फुरणारा कवींचा कल्पनाविलास याचेंही काव्यांत केवढें महत्वाचें स्थान आहे तें लक्षांत येईल. 'कांहीं सुंदर अलंकार मोरोपंतांनीं केले असले म्हणून काय झालें ! तेवढ्यावरून कांहीं तो कवि होता असें ठरत नाहीं,' असा आक्षेप अलीकडे ऐकूं येऊं लागला आहे. तेव्हां काव्यांत अलंकाराचें महत्व केवढें आहे

* वरील उतारा Hudson नामक ग्रंथकाराच्या Introduction to the Study of Literature या पुस्तकांतून घेतला आहे.

हें दाखविण्याकरितां येथें येवढा विस्तार करावा लागला. आतां पंतांचे अलंकारां-च्या द्वारा प्रकट होणारें कल्पनावैभव केवढें आहे हें पाहूं. म्हणजे कवित्वाच्या या महत्वाच्या अंगाच्या दृष्टीनें पंतकवितेची योग्यता काय आहे हे नजरेस येईल.

कवीच्या प्रतिभेच्या सारख्याच महत्वाच्या दोन शाखा ज्या कल्पना व भावना त्यां-पैकीं पहिली कल्पना ही पंतांच्या काव्यांत सर्वत्र विलसतांना दिसून येते. पंतांचें कल्पनावैभव खरोखरी फारच मोठें होतें. वरवर पाहिलें असतां कोणासही असें वाटतें कीं, पुराणांतल्या गोष्टींची चऱ्हाटें वळीत बसणारे हे साधे पुराणीक; यांच्या काव्यांत बहारीच्या कल्पना, सहृदयाह्लादक अलंकार, चमत्कृतिजनक अर्थवैचित्र्य वगैरे गोष्टी कोठून सांपडणार? परंतु पंतांचें काव्य काळजीपूर्वक कोणी वाचूं लागल्यास या बाबतींत त्यांची हटकून फसगत होईल. महाराष्ट्र वाङ्मयांत कल्पनावैभवाच्या बाबतींत पंतांची पायरी ज्ञानराजांच्या खालोखालच लागेल. संस्कृत वाङ्मयांत देखील व्यासवाल्मीकि सोडून दिल्यास इतर कवींमध्यें कालिदास व बाण हेच कायते या बाबतींत निर्विवादपणें पंतांच्या पेक्षां वरचढ ठरतील वामन दाजी ओक, राजारामशास्त्री भागवत, हंस, पांगारकर वगैरे अनेक रसिकांनीं पंतकवि-तेची अलंकाराच्या बाबतींतली ही समृद्धता कंठरवानें निवेदन केली आहे. हंसांनीं आपल्या निबंधांत एके ठिकाणीं म्हटलें आहे: —' कवितेचा आत्मा जो रस तो ज्या मायेच्या आश्रयानें राहतो ती चमत्कारिक कल्पनाही मोरोपंताच्या काव्यांत सर्वत्र भरलेली आहे. कोणत्याही विषयाचें वर्णन करतांना प्रत्येक गोष्टीचें स्वरूप दृष्टांतादि अलंकारांनीं उत्कर्षे करून दाखविण्याचा प्रत्येक पद्यांत मोरोपंतानें यत्न केलेला आढळतो. त्याच्या बहुतकरून सर्व आर्यांचीं उत्तरार्धें अलंकारमय किंवा चमत्कारिक कल्पनामय असतात. कितीएक ठिकाणीं त्याच्या कल्पना इतक्या उज्वल व उदात्त आढळतात कीं, त्या कामांत तो नामांकित संस्कृत कवींची स्पर्धा करीत आहे कीं काय असा भास होतो.' आणखी एका ठिकाणीं पंतकवितेच्या कल्पनासौष्ठवासच मुख्यत: अनुलक्षून हे रसिक म्हणतात:-'लहान लहान प्रकरणा-पासून तो मोठमोठाल्या पर्वांपर्यंत पहा, अनेक मनोरंजक कल्पनांनीं व निर्दोष शब्दार्थांनीं त्याचें पद्य मोठें हृद्य झालेलें आहे. त्यानें केलेलीं कित्येक वर्णनें इतकीं मनोहर, निर्दोष व रसभरित झालीं आहेत कीं, तीं वाचीत असतांना लवकर संपल्याचा खेद झाल्यावांचून रहात नाहीं. व एकदां वाचलेलीं वर्णनें पुनः पुनः वाचण्यांत आलीं तरी त्यांस कंटाळा न येतां उलट त्याविषयीं

प्रेमा अधिकाधिक वाढत जातो. एखाद्या सुंदर आणि चतुर कामिनीच्या लीला-विलोकनांत रसिक तरुण जसा तल्लीन व गर्क होऊन देहभान विसरून जातो, तसें मोरोपंताच्या कवितावलोकनापासून सहृदय जनांस झाल्यावांचून रहात नाहीं.'

११. पंतांच्या कल्पनाशालितेची इतकी स्तुति केल्यावर, पंतकवितेतील उदाहरणें देऊन त्या स्तुतीची यथार्थता सिद्ध करणें हें ओघानेंच येतें, व तसें करणेंही वस्तुतः अवघड नाहीं. तेव्हां पंतांच्या आल्हादक कल्पनाविलासाची थोडीशीं उदाहरणें येथें दाखल करूं. मागें चवथ्या विभागांत भागवती काव्यांचें विस्तृत विवेचन करतांना जागोजाग अनेक सुंदर पद्यें उध्दृत केलीं आहेतच. तेव्हां पंतांच्या मनोहर कल्पनाविलासाचीं स्थळें पहावयाचीं असल्यास तीं चवथ्या विभागांतच वैपुल्यानें वाचकांच्या दृष्टीस पडतील. शक्य तोंवर मागें उध्दृत केलेल्या पद्यांची पुनरुक्ति न करितां, कल्पनेच्या अगर अलंकाराच्या दृष्टीनें रम्य अशा थोडयाशा स्थलांशीं येथें वाचकांचा परिचय करून देण्याचा आमचा हेतु आहे. संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनीं सांगितलेल्या प्रत्येक अलंकाराची उदाहरणें शोधून काढून दाखल करण्याचा खटाटोप येथें केलेला नाहीं व तसा करण्याची कांहीं अवश्यकताही नाहीं.

अलंकारांच्या समुदायामध्यें सादृश्यमूलक अलंकारांचा वर्ग सर्वांत मोठा व महत्त्वाचा होय. वस्तुजातांचें परस्परांमधील केवळ कविकल्पनेस गम्य असलेलें साम्य निदर्शित करून मनोहर अर्थाची निष्पत्ति करणें हा कवींचा अत्यंत हृद्य असा व्यापार होय. यामुळें साम्यनिदर्शक अलंकारांचें विवेचन म्हणजे प्राचीन काळापासून आमच्या अलंकारशास्त्राचा केवळ गाभाच होऊन बसलें आहे. उपमा, रूपक, दीपक, अतिशयोक्ति, उत्प्रेक्षा, व्यतिरेक, अपह्नुति, समासोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, निदर्शना, दृष्टान्त, इत्यादि मनोहर अलंकार हे साम्यदर्शनाचे किंवा साम्यसूचनाचेच निरनिराळे प्रकार होत. इतर अनेक महाकवींप्रमाणें पंतांचाही या साम्यदर्शनांत केवळ हातखंडा आहे.

१२. कोठें अफाट तर कोठें सुंदर व मोहक अशा, वाचकास सानंदचकित करून सोडणाऱ्या उपमा पंतकाव्यांत अनेक आढळतात; कृष्णशत्रु शाल्व यानें द्वारका नगरींत धुमाकूळ मांडल्याचें ऐकून त्या मायावी प्रभूनें क्षणभर चिंतामग्न झाल्याचें दाखविलें तेव्हांचें वर्णन—

चिंता दाखवि तातवत्सल निर्जी चिंतातमाचा रवी
मध्यार्ही मिरवी अलीकतटिनी जैसी धरा मारवी ॥ कृ. वि. ६६.१७.

मारवाडांतील रखरखीत भूमि भर दोन प्रहरीं नदी वहात असल्याचा (मृगजळाचा) खोटाच देखावा धारण करते त्याप्रमाणें कृष्णानें खोटीच काळजी करीत असल्याचा बाहाणा केला! अगदीं अनपेक्षित परंतु समर्पक, सुंदर व अर्थोत्कर्षकारक अशी ही कल्पना आहे. शिवाय पहिल्या चरणांत 'चिंतातमाचा रवी' 'चिंता दाखवी' असें म्हटल्यानें विरोध अलंकार झाला आहे.

आधार त्रिजगन्मनोरथफळा स्वामी! असा देंठसे। कृ. वि. ७०.१४.

या कल्पनेच्या अद्‌भुततेला तर तोडच नाहीं! श्रीकृष्णानें नारदास उद्देशून हें म्हटलें आहे. सर्व त्रैलोक्याचे मनोरथ पुरविण्यास तुम्ही समर्थ आहांत; इतकेंच नव्हे तर केवळ तुमच्यामुळेंच ते मनोरथ सिद्धीस जातात. फळ हें सर्वस्वी देंठावरच आधारलेलें असतें. त्यास पोषक रसही देंठांतूनच मिळतो हें लक्षांत घेतलें असतां या उपमेचें निरुपम सौंदर्य लक्षांत येणार आहे.

पर्वी अर्णव तसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे।
संध्यारागसुरंजित शरदभ्राहूनि फार तो शोभे ॥ कृ. वि. ८६. ११.

सुभद्राहरणप्रसंगीं अर्जुनाचें कपट पाहून खवळलेल्या बळरामदादांचें हें वर्णन आहे. याच्यासंबंधीं पांगारकर म्हणतात.—' मूळांत अर्णवक्षोभाची उपमा आहे खरी, पण उत्तरार्धांतील बहारीची उपमा पंतांना केवळ स्वप्रतिभेनें सुचली आहे. बळराम गौरवर्ण होते म्हणून त्यांना शरदभ्राची दिलेली उपमा फारच योग्य आहे- संध्याकाळच्या तांबूस छटांनीं रंजित झालेल्या शरदृतूंतल्या मेघाप्रमाणें बळराम शोभले! पंतांची निसर्गप्रीति या अत्यंत मनोहर अशा उपमेवरून स्पष्ट होते.' मो. च. पृ. २६६. बलरामदादांचें वर्णन पंतांनीं कृष्णविजयांत ठिकठिकाणीं फारच सुंदर केलें आहे. त्यांची शीघ्रकोपिता, अंतःकरणाचा कोंवळेपणा, मद्यासक्तता इत्यादि गुणांचें योग्य मिश्रण करून त्यांचें स्वभाववर्णन पंतांनीं फारच मनोहर केलें आहे. बळराम क्रुद्ध होऊन यमुनेचें

वस्त्राचें करितो करें, करि हळें तैसेंचि आकर्षण। कृ. वि. ६५. ११.

चालत घातलेलें वस्त्र हातानें ओढल्याबरोबर जसें आपल्यापाशीं गोळा होतें तसी, तितक्याच अल्पायासानें नांगरानें आकर्षिलेली यमुना रामाच्या पाशाशीं गोळा झाली! त्या पादनत यमुनेसह रामाचें वर्णन—

रामाच्या पदपुंडरीकयुगळीं सेवी रसा षट्पदी
किंवा भक्तसमर्पिता सुतुळसीमाळाचि, कीं तो रवी ।
ओळे तत्पदशृंखळाचि, अथवा ते देवहंसच्छदि-
च्छाया किंबहुना दिसे प्रभुपदीं रम्याचि कृष्णानदी ॥ कृ. वि. ६५.१७.

या श्लोकास अनुलक्षून काव्यसंग्रहकारांनीं हर्षनिर्भर मनानें पुढील उद्गार काढले आहेत.—' या श्लोकास मूळांत कांहींएक आधार नाहीं. पंतांची प्रतिभा जेव्हां भरांत असते तेव्हां ती अशाच समयोचित, अलंकारमय आणि हृदयंगम कल्पनांनीं भरलेल्या श्लोकांस प्रसवते. पंतांला भाषांतरकार म्हणून नावान ठरविण्याची खटपट करणारे पंडितंमन्य आक्षेपक हा श्लोक श्रीमद्भागवतांतील कोणत्या पद्याचें भाषांतर आहे हें दाखविण्याची कृपा करतील तर किती चांगलें होणार आहे? पंतांच्या सरस्वतीचा हा प्रवाह सुरस आणि प्रसन्न नाहीं असें कोण म्हणेल? कालिंदी बळरामास शरण आली—एवढ्याच गोष्टीला अनुलक्षून...जे कल्पनातरंग पंतांच्या सरस्वतीप्रवाहांत उठले आहेत, ते चित्ताकर्षक नाहींत असें कोण म्हणेल? या पद्यांत उत्प्रेक्षामूलक विकल्प अलंकार झाला आहे.' कृ. वि. उत्तरार्ध का. सं. प्रत पृ. ११६.

ऐसें ऐकुनि नारदादि म्हणती 'प्राज्ञा भला हो भला!
बापा, हा नयराजहंस तुझिया सन्मानसीं शोभला ।
साधो उद्धव! तूं यथार्थचि, जगीं विद्वत्सभा मंडिता
झाली या तव शुद्धवृत्तगुणवाङ्मुक्ताफळीं, पंडिता! ॥' कृ. वि. ७१. ७.

या श्लोकांत, उद्धवानें जी उत्कृष्ट नीति सांगितली त्याच्यावर राजहंसाचें रूपक करून मानसीं या श्लिष्ट पदानें त्याला पुष्ट केलें आहे. शेवटच्या ओळींत उद्धवाच्या वाणीवर मुक्ताफळांचें असेंच श्लेषानुप्राणित रूपक केलें आहे.

१३. सर्व साम्यदर्शक अलंकारांमध्यें रूपक हें पंतांच्या विशेष आवडीचें दिसतें. वर्ण्यविषयाच्या सर्व अंगांशीं उपमानाचें साम्य जुळवून सांगरूपक करण्याकडे त्यांचें विशेष लक्ष होतें असें दिसतें. याचीं पुष्कळशीं उदाहरणें मोठमोठे श्लोक व्यापणारीं लांबलचक असल्यामुळें येथें देण्यास अवकाश नाहीं. एकदोनच मासले देण्यासारखे आहेत.

(१) जाणो बाण वनस्पती, भुजाहि त्या शाखाचि यज्वा हरी,
छेदी चक्रकुठारपाणें समिधा त्या युद्धयज्ञीं करी ॥ २१

पाळी बाणवनस्पतिप्रति सदा जो, शंभुमाळी म्हणे
त्या युद्धकतुर्दीक्षिता हरिस, 'हे धर्मज्ञचूडामणे ।
आंगें वाढविला दयामृतरसें सिंपोनिया तोकसा
शाखा सर्वहि तोडितां सकरुणा वाचेल तो हो कसा ? ॥२४कृ.वि.६३.

येथें बाणासुरावर झाडाचें रूपक आहे. शंकर बाणाच्या बाजूनें लढत असून बाणाशीं युद्ध करणाऱ्या कृष्णापाशीं त्याची रदबदली करीत आहेत असा विषयसंदर्भ आहे.

( २ ) ' घेऊनि निरोप वनें आज्ञारूपेंहि शीघ्रगति हो पवनें ।
रथगगनीं वेघ न ते व्रजाटवी विरहदव गिळो घे घनते ' ॥
( वनें–जलें ) कृ. वि. ४६. १३.

कृष्णानें उद्धवास निरोप देऊन व्रजाकडे पाठविलें त्या समयींचें हें भाषण आहे.

( ३ ) वेणु मधुरतर वाजे वनिं; मोहे युवति पी तदमृतरवा जे ।
हृदयसरीं मदनकरी धृतिनलिनोद्धतिस उशिर उन्मद न करी ॥
कृ. वि. २१. १०.

ही आर्यागीति फारच मनोहर आहे. हींत वेणुवादनानें झालेल्या गोपींच्या मदनविवश स्थितीचें वर्णन केलें आहे. उत्तरार्धांत मदनावर उन्मत्त हत्तीचें रूपक करून उपमेयाच्या इतर अंगांवरही तें सुंदर रीतीनें बसविलें असल्यानें हें सांग परंपरित रूपक झालें आहे.

( ४ ) स्वनाम कमळें मुनि भ्रमर ज्यांत, नाशी, तळें
तुझें यशचि, ताप, जें हरि रसें मना शीतळें ॥ कृ. वि. ६४. २१.

मुनि हेच भ्रमर ज्यांस चिकटले आहेत असें परमेशाचें नाम हींच कमळें, तुझें यश हेंच तळें, तें आपल्या शीतल रसानें मनाचें हरण करतें व ताप नष्ट करतें.– असा या सांगरूपकाचा अर्थ आहे.

( ५ ) अक्षय अमृतकलश विभु, सकरुण मुनि वैद्य, कविमना वाटे ।
भवरोगियांसि वाटुनि जोडिति पुष्कळ यशोधना वाटे ॥
कृ. वि. ८७. ८.

ईश्वर हा अमृताचा कलश व परमभक्त जे शुकनारदादि मुनि ते हा अमृतकलश लोकांमध्यें ( संसाररोगानें पीडलेल्यांमध्यें ) वाटून यशोरूपी धनाचा मोबदला घेणारे जणूं वैद्य अशी येथें सुंदर कल्पना केली आहे.

या भक्तिरसानें ओथंबलेल्या ८७ व्या अध्यायांतीलच आणखी एक उतारा

घेऊं. मिथिला नगरींतील बहुलाश्व राजा व श्रुतदेव ब्राह्मण या दोघां परमभक्तांनीं बोलाविलें असतां श्रीकृष्ण तेथें गेले त्यासमयींचें मिथिलेचें वर्णन:—

( ६ ) बहु दिवशीं पति येतां करि बहु मिथिला पतिव्रता साज ।
आज द्वारवती तज्ज्येष्ठसपत्नी मनीं धरी लाज ॥ १५ ॥
धाडी पुढें स्वजनसुत शृंगारुनि ती पतिव्रता मिथिला ।
[ स्वतः ] जावूं पाहे परि गति लज्जाभूषाभरोत्सवें शिथिला ॥ १६ ॥
मिथिलापुरवासिजनें निजनेत्रसरोरुहें उदश्रुजळें ।
प्रक्षाळिलीं प्रथम, मग भगवच्चरणीं समर्पिलीं उजळें ॥ १७ ॥
बहुलाश्व श्रुतदेव प्रेमें धांवोनि वंदिती पाय ।
काय उपायन दुसरें ? अर्पिति चरणीं स्ववाङ्मनःकाय ॥ १८ ॥

सद्भावपूर्णतेनें, वर्णमाधुर्यानें, कल्पनासौष्ठवामुळें व अलंकाराच्या सौंदर्यामुळें या आर्या नितांत मनोहर वठल्या आहेत. मिथिला नगरीवर पतिव्रता स्त्रीचें रूपक केलें आहे; अर्थात् त्यामुळें द्वारकेवर ज्येष्ठ सपत्नीचें, मिथिलेच्या नागरिकांवर पुत्रांचें व नागरिकांच्या नेत्रांवर पूजाकमलांचें आरोपण केलें असल्यामुळें हें समस्तवस्तुविषय सांग रूपक झालें आहे.

( ७ ) उडवी ती भयवात्या जिकडे त्या शंभुपुंडरीकास ।
तिकडे वृकभृंग फिरे; सद्रक्त करा, बरी धरी कास ! ॥कृ.वि.८८.३५.

शंकरानें वर दिल्यावर खुद्द शंकरावरच त्याचा प्रयोग करून पाहण्यासाठीं वृकासुर पाठीस लागला त्या वेळचें हें वर्णन आहे. भयरूप वावटळीनें उडणारें शंकर हें कमळ व वृकासुर हा भ्रमर अशी कल्पना केली आहे.

१४. साधर्म्यमूलक अलंकारांमध्यें उत्प्रेक्षेची चारुता कांहीं अलौकिक असते. मेघांत जशी वीज चमकावी किंवा सुग्रास जेवणांत खमंग फोडणीचा वास यावा त्याप्रमाणें काव्यामध्यें कवीच्या मनोहर कल्पनेची लकेर सहज प्रकाशून गेली असतां ती फार शोभादायक होते. रूपकादि अलंकार असले म्हणजे आरोप्यमाण, आरोपविषय, साधारण धर्म वगैरेंची जुळवाजुळव होऊन ते ठरीव पद्धतीनें प्रकट व्हावे लागतात. त्यामुळें काव्यौघाला संथपणा येऊन तेथें जरा मुक्काम झाल्यासारखा वाटतो. परंतु उत्प्रेक्षा म्हणजे सहज जातां जातां फेंकलेला कल्पनेचा कटाक्ष होय. पंतांचें कल्पनाचापल्य अशा बाबतींतही पूर्णपणें प्रभावी असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. भागवती काव्यांतील चमत्कृतिजनक उत्प्रेक्षांचीं उदाहरणें यांवें तवढ्या

विभागांत पुष्कळच येऊन गेलीं आहेत. उदाहरणार्थ, भी. भा. १८० ( मागें पृ. ७७ ), अमृतमथन ३. १७ ( पृ. ११७ ), मं. भा. १०. ५१४ ( पृ. १५३ ), पृथुकोपाख्यान १४ ( पृ. १६८ ) हीं अत्यंत बहारीच्या कल्पनांनीं युक्त असलेलीं पद्यें पहावीं. श्रीकृष्णानें कालिय सर्पाचा समाचार घेण्याकरितां यमुनेंत उडी घातली तेव्हां पाणी जोरानें उसळून त्याचा शब्द झाला, त्यावर पंत कल्पना लढवितात.--

( १ ) ' गोगोप पिपासु न व्यसु केले म्यां; न दोष मजपासून ' ।
प्रभुभुजदंडाहत तें जळ ऐसें विनवि काय शब्दें वितते ? ॥

कृ. वि. १६. ११.

कृष्णाचा निरोप घेऊन उद्धव गोपींकडे आला त्या वेळेस सूर्यास्ताचा समय झाला होता. सूर्याच्या अस्तास जाण्यावर पंत उत्प्रेक्षा करतात.--

( २ ) रवि बहुधा मावळला, लाजे कीं साधु नंदधामा वळला ।
आपण तापद, वारिप्रदसा तो सर्व-लोक-ताप दवारि ॥

कृ वि. ४६.१५.

श्रीकृष्ण व बाणासुर यांचें युद्ध चालू असतां बाण पराभूत होऊं लागला. तेव्हां बाणाची आई कोटरा पुत्राला वांचविण्याकरितां धावत येऊन दोघांच्या मध्यें उभी राहिली. वाटेंत तिचें वस्त्र गळून पडलें तरी तशीच नग्न स्थितींत ती कृष्णापुढें येऊन उभी राहिली.

( ३ ) आली सोडूनि अर्धे स्नपनविधि, गळे धांवतां वस्त्र वाटे
कीं वाराया प्रभूही विधि करि उघडें तें सतीशस्त्र वाटे ॥

ही कल्पना फारच चमत्कृतिजनक आहे. वस्त्र गळून पडण्यावर जणूं काय म्यानांतूनच ती तरवार बाहेर काढली अशी कल्पना केली आहे. दैवानेंच तें शस्त्र काढलें असें म्हणण्यांत त्याची अप्रतिहतता व्यक्त होत आहे.

महाभारतांत भीष्मार्जुनांचें युद्ध चाललें असतां पंत त्याचा सपाटा वर्णन करितात.

( ४ ) भीष्मश्वेताश्वांचा निरुपम मज वाटला तडाखा तो ।
कीं ब्रह्मगोल वाटे विशिखाहीं दाटला तडा खातो ॥ भीष्म ५.४६.

ही कल्पना फारच भव्य व विस्मयकारक आहे.बाणांच्या मारानें ब्रह्मगोळाला तडा जाण्याची, तो फुटण्याची पाळी आली असा याचा अर्थ करावा किंवा बाणांच्या

अवयव समूहांनीं आंतून कोंदून गेल्यामुळें ब्रह्मगोळाला तडा जाऊन तो उकलतो कीं काय असें वाटूं लागलें, असाही जास्त चांगला अर्थ करतां येईल. ' दाटला ' या शब्दावरून हाच अर्थ प्रतीत होतो. कवठ, दाळिंब, सीताफळ या फळांच्या आंतून गीर दाटला म्हणजे त्यांना तडा जातो हें आपण पाहतोच. रामरावणांच्या युद्धांत इंद्रजिताची शक्ति लागून लक्ष्मण मूर्च्छित पडला, त्यामुळें रामासही शोकानें मूर्च्छा आली. त्यावर पंत उत्प्रेक्षा करतात.—

( ५ ) बंधुहृदालयवासी रामहि दुःखास काय सांपडला ।
लक्ष्मणहृदयच्छेदें नातरि मोहाननांत कां पडला ? ॥

मं. रा. युद्ध. ६५९.

लक्ष्मणाच्या हृदयांतच जणूं रामाची वसति होती या सुंदर कल्पनेचा आश्रय करून पंतांनीं येथें तिचा शोकरसाचा उत्कर्ष करण्याकडे उपयोग करून घेतला आहे. परंतु याच कल्पनेचा आमच्या विलासी संस्कृत कवींनीं शृंगाराकडे उपयोग करून घेतला आहे, अशा श्लोकाची येथें आठवण होते.

सख्यैवं प्रतिबोधिता प्रतिवचस्तामाह भीतानना
नीचैः शंस ! हृदि स्थितो हि ननु मे प्राणेश्वरः श्रोष्यति ॥

' हे खुळे ! अगदीं मऊपणानें काय आपलें वागणें ठेवलें आहेस ? नवऱ्यासमोर जरा धिटाईनें वागत जा, रागाचा आविर्भाव आणीत जा ! ' असा उपदेश करणाऱ्या सखीला ती मुग्धा स्त्री घाबरलेल्या मुद्रेनें म्हणते, ' सगळं खरं. पण बाई, तुला काय सांगायचें असेल तें हळू सांग; नाहींतर हृदयांत असलेल्या माझ्या प्राणेश्वराला तें ऐकूं जाईल ! '

मंत्ररामायणाच्या युद्धकांडामधील निजलेल्या कुंभकर्णाचें वर्णन —

( ६ ) विंध्य तसा निजला तो; वदनदरीमाजि निबिड आंधार ।
फार भयंकर भासे पाताळाचेंचि काय तें दार ॥ मं. रा. युद्ध. ४३१.

पंतांच्या भव्य कल्पनाविलासाचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. पूर्वार्धांत उपमा व उत्तरार्धांत उत्प्रेक्षा आहे. कुंभकर्णाच्या वासलेल्या जबड्यावर पाताळाच्या द्वाराची केलेली कल्पना फार भव्य, अफाट व चमत्कृतिजनक आहे.

वाटे तुमचा उरविल कृष्णाचें जीव न स्थविर तात ।
दिसले शरांत ते नग कल्पांबुधिजीवनस्थ विरतात ॥ भीष्म. ३. १८.

१५. येथील कल्पनाही अशीच भव्य आहे. प्रलयकालच्या समुद्राच्या पाण्यांत

तरंगणाऱ्या वृक्षाप्रमाणें ( अगर डोंगराप्रमाणें ) श्रीकृष्ण व अर्जुन हे भीष्मांच्या बाणांच्या लोंढ्यांत विरून गेल्यासारखे दिसले ! भीष्म आटोपेना तेव्हां कृष्ण रथांतून उतरून भीष्मावर चालून गेला.--

जो मातृस्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली ।

तो भीष्मावरि कोपे स्वमधुहराउपरि जेंवि सरघाली ॥ भीष्म.३. १७.

मातृस्नेहाचाही विसर पाडणारें कृष्णाचें वात्सल्य वर्णन केल्यामुळें येथें व्यतिरेक झाला आहे. अशा वात्सल्ययुक्त कृष्णाचा कोप वर्णन केल्यामुळें विरोध अलंकार झाला आहे व शेवटीं मधमाशांच्या थव्याची मोठी समर्पक उपमा योजिली आहे.

यम जेंवि काळपाशें मार्कंडेयासि, नाग भोगानें ।

बांधी, बांधावें ज्या प्रभुवर्या प्रेमभक्तियोगानें ॥ मं. भा. १०. २७५.

कालिय सर्पानें कृष्णाच्या शरीरास विळखा घातला त्या प्रसंगाचें हें वर्णन आहे. मार्कंडेयाची उपमा देण्यांत पंतांनीं फारच चातुर्य दाखविलें आहे. मार्कंडेय चिरंजीव होते, अर्थात् कालपाशानें त्यांस बांधणें जसें केवळ व्यर्थ, तसें कालियसर्पाचें विळखा घालणेंही व्यर्थ होणार असें ध्वनित केलें आहे. शिवाय 'भोगानें' याच्यांत ' विषयोपभोगानें ' अशा अर्थाच्या श्लेषाची थोडी छटा असून " प्रेमभक्तियोगानें ' याच्या अर्थाशीं विरोध सूचित होत असल्यानें या आर्येस फारच मनोहरता आली आहे.

शेवटीं एकच जरा मजेदार अशी उपमा दाखल करून पुरे करूं.

त्या मयसभेंत रचना पाहुनि राजा सुयोधन भ्रमला ।

प्रौढकविकृतींत जसा बाळ म्हणे जो ' कळे अदभ्र मला ' ॥ सभा. ३. १.

मला सर्व कांहीं समजतें अशी घमेंड बाळगून प्रौढ कवींच्या काव्यांत लुडबूड करणाऱ्या बाळ ( अज्ञान ) लोकांना पंतांनीं जातां जातां सहज टोमणा मारला आहे. खऱ्या भारदस्त कवींच्या कृतींचा आस्वाद घ्यावयास वाचकांनीं आपलें मन सुसंस्कृतच केलें पाहिजे, उगाच अजाणपणानें गडबड करण्यांत कांहीं अर्थ नाहीं असेंही येथें ध्वन्यर्थानें सांगितलें आहे.

१६. साम्यदर्शक अलंकारांचे कांहीं मासले देण्यांतच येवढा विस्तार झाला. साम्यबोधक अलंकार हेच कवीच्या कल्पनावैभवाचे खरे निदर्शक होत व पंतांची कल्पना अशा अलंकारांच्या रूपानें किती नाना तऱ्हेचे आश्चर्यकारक खेळ करून दाखविते याचें वर किंचितसें दिग्दर्शन केलेंच आहे या साम्यबोधक अलंकारांमध्यें

रूपक हें त्यांतल्या त्यांत पंतांच्या विशेष आवडीचें दिसतें. विशेषतः पूर्वबाल तर कशींवशीं ओढूनताणूनही रूपकें करून तीं सर्वांगांनीं जुळवीत बसण्याची त्यांना बरीच हौस वाटत असे असें कृष्णविजयांत पदोपदीं दिसून येणाऱ्या रूपकांच्या उदाहरणांवरून म्हणतां येतें. याशिवाय अप्रस्तुत अर्थाचें प्रत्यक्ष कथन करून त्यावरून प्रस्तुत अर्थाचा बोध करण्याची ( म्ह० अप्रस्तुतप्रशंसा अलंकार साधण्याची ) लकबही त्यांस चांगली साधली होती. सामान्यविशेषभावदर्शक अर्थान्तरन्यास हा साधा अलंकार पुष्कळ ठिकाणीं आढळून येतो, यांत विशेष नवल नाहीं. विरोधमूलक विरोध व असंगति हे अलंकार पंतांचे आवडते होत. पर्यायोक्त ( चेतनोक्त ) हा अलंकारही पंतांच्या फार प्रीतींतला होय. ( या-विषयीं पुढें थोडेसें विवेचन केलें आहे. )

साम्यबोधक अलंकारांचीं जशीं कांहीं उदाहरणें दिलीं तशीं बाकीच्या उपर्युक्त अलंकारांचीही थोडीबहुत उदाहरणें देणें वस्तुतः अवश्य होय. खुद्द पंतकाव्यगहनांतच ज्यानें प्रवेश केला आहे. त्याच्या नजरेस हे पंतांच्या कल्पनाविलासाचे निरनिराळे प्रकार येऊन त्यास अप्रतिम आनंद होतो यांत शंका नाहीं. परंतु आम्हांपुढें

ते जरि पदार्थ इतरें वर्णावे ग्रंथ बहु न कां वाढे ? ।

अशी अडचण येऊन उभी राहते ! तेव्हां अलंकारासंबंधींच्याच पंतकाव्यांत दिसून येणाऱ्या कांहीं विशेषांची चर्चा करून व त्यानंतर पंतांच्या अलंकारयोजनेंतील दोषांचें विवेचन करून हें अलंकारांचें प्रकरण संपवून टाकूं.

१७.(१) भौतिक सृष्टींतल्या व्यापारांना आध्यात्मिक अथवा तात्विक दृष्टान्त देऊन पुष्कळ वेळां कवि चमत्कृति उत्पन्न करतात. एरवीं सामान्यतः कवींची पद्धत म्हणजे मानवी व्यापारांना अगर वस्तूंना भौतिक सृष्टींतलीं उपमानें देण्याची असते. उदाहरणार्थ, ' स्त्रीचें मुख कमलासारखें आहे ' अगर ' साधूचें हृदय लोण्याप्रमाणें मृदु असतें ' असें म्हणण्याची कवींची पद्धत आहे; ' कमळ ललनामुखाप्रमाणें आहे ' किंवा 'नवनीत साधुहृदयमृदु असतें' असें कोणी फार करून नाहीं व जी गोष्ट कोणी करीत नाहीं ती एकाद्यानें केली म्हणजे तिला विशेष महत्व येतें या सामान्य नियमाप्रमाणें असे उलटापालट केलेले दृष्टान्त ( अर्थात् ते उचित व समर्पक असतील तर ) नेहमींच्या दृष्टान्तापेक्षा अधिक चमत्कृतिजनक होतात. काव्य वाचीत असतांना असलीं उदाहरणें ठळक रीतीनें नजरेंत

भरतात व त्यांपासून विशिष्ट आनंद होतो. मूळ भागवतांतच असल्या प्रकारचीं मनोवेधक उदाहरणें एके ठिकाणीं आहेत. दशमस्कंधाच्या विसाव्या अध्यायांत प्रावृट्कालाचें व शरत्कालाचें अत्यंत सुंदर वर्णन आहे तें सर्व वर सांगितलेल्या प्रकारच्या उपमांनींच भरलेलें आहे. निसर्गव्यापारांना किंवा सृष्टिशोभेला मानवी व्यापारांचे खुबीदार दृष्टान्त दिलेले आहेत. व ते सर्व वैराग्यभक्तिपर असल्यानें वर्णनास उदात्तता व पवित्रता आली आहे. खालील श्लोकांवरून वाचकास या प्रकाराची कल्पना येईल.—

( प्रावृट् ) गिरयो वर्षधाराभिर्हन्यमाना न विव्यथुः ।

अभिभूयमाना व्यसनैर्यथाधोक्षजचेतसः ॥ १५ ॥

( शरद् ) शरदा नीरजोत्पत्त्या नीराणि प्रकृतिं ययुः ।

भ्रष्टानामिव चेतांसि पुनर्योगनिषेवया ॥ ३१ ॥

सर्वस्वं जलदा हित्वा विरेजुः शुभ्रवर्चसः ।

यथा त्यक्तैषणाः शान्ता मुनयो मुक्तकिल्बिषाः ॥ ३५ ॥

भा. १०. २०.

पंतांनीं आपल्या काव्यांत केवळ निसर्गाचें वर्णन असें कोठेंच केलेलें नाहीं. काव्यांतील कथानकाचें वर्णन करतांना मात्र त्यांनीं अशा तात्विक व आध्यात्मिक दृष्टांतांची कोठें कोठें योजना केलेली दिसून येते. भागवती काव्यांतील अशीं कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

( १ ) येतील स्वसुतार्थ धांवुनि तन्हीं वृष्णि स्वयें सर्वही

वार्ता ऐकुनियां, करीं धरुनियां शस्त्रें मनीं गर्वही ।

प्राणायामनिरुद्ध इंद्रियगण क्षीणत्व पावे तसें

त्यां होईल, न साधिली अविनतें स्रोतःकृशा वेतसें ॥ कृ.वि ६८.५.

प्रद्युम्नपुत्र सांबास पकडून ठेवणारे दुर्योधनादि कौरव यांची ही उद्दाम उक्ति आहे. सांबास पकडल्यामुळें श्वासाचा निरोध केल्यानें इंद्रियांची विकल स्थिति होते तशी वृष्णींची होईल अशी उपमा आहे. शिवाय चौथ्या चरणांत आणखी एक उपमा असून दुसऱ्या चरणांत तुल्ययोगिता अलंकार आहे.

( २ ) तो कामें अवलोकिला निजबळीं जैसा मृगीं लांडगा

किंवा भाग्यमदें करी बडबड ज्ञानिव्रजीं दांडगा । कृ. वि. ७७. २.

शाल्व सेनापतीला स्वसैन्यांत शिरलेला प्रद्युम्नानें पाहिलें त्या समयींचें हें वर्णन आहे. सुदामाच्या प्रासादानें वर्णन.—( मणिकलना-रत्नखचित पुतळ्या )

( ३ ) मणिलक्ष्मनाकरपर्वी मणिदीप तसे विराजती गेहीं ।
जनबुद्धिद्युतिमध्यें शुचिचित्प्रतिबिंबकें जशीं देहीं ॥ कृ वि.८१.९१.

( ४ ) दुग्धाब्धिफेनपांडुरशय्यामंडित करींद्रदंतांचे ।
पर्यंकशत विराजति, जैसे मृदु शुद्ध भाव संतांचे ॥ कृ.वि ८१.९७.

पहिल्या आर्येत रत्नदीपाचें व दुसऱ्या आर्येत हस्तिदंती पलंगाचें वर्णन आहे.

( ५ ) गर्भ, दुराग्रह अकुलज जनतेचे, तेंवि वाढती दितिचे ।म.भा.३.८१.

( ६ ) नेवूं पाहे अनलस तीस, अवियोसि जेंवि सुकवि लया ॥
मं. भा. ४.११५.

( ७ ) मोह तसा वृत्राचा कुक्षि, दृढ ज्ञान तेंवि वज्र, नृपा ! ।
झाला युक्त शतक्रतु जीव, गुरु दधीचिमूर्ति, विष्णु कृपा ॥
मं. भा. ६. १२३.

इंद्रवृत्रांच्या युद्धावर ब्रह्मज्ञानप्राप्तीचें हें रूपक केलें आहे. इंद्र हाच कोणी जीव, दधीचि हा गुरु, ज्ञान होण्यास कृपा पाहिजे तेव्हां विष्णु हीच कोणी कृपा, वज्र हें ज्ञान व वृत्रकुक्षि हे अज्ञान,-याप्रमाणें रूपकाची मांडणी आहे.

( ८ ) वरुणाच्या उद्यानीं होतें शुभ साधुहृदयसें सुसर ॥ मं.भा. ८.५.

पंतांचे सर्व ग्रंथ धुंडाळले तर अशीं उदाहरणें पुष्कळच सांपडतील हें उघड आहे.

१८. ( २ ) पण याहीपेक्षां चमत्कृतिजनक अशी लकब पंतांच्या काव्यांत ठिकठिकाणीं दिसून येते. ती म्हणजे गंभीर अगर महत्त्वाच्या गोष्टीस क्षुल्लक दृष्टांत देण्याची होय. एकाद्या गंभीर विषयाचें वर्णन चालू असतां त्याला मुळींच न शोभणाऱ्या अशा हलक्या गोष्टीचा दाखला दिला म्हणजे चमत्कृति उत्पन्न होऊन वाचकास मोठी मौज वाटते. असंबद्धता ( Incongruity ) हें विनोदाचें मूळ होय. ज्या गोष्टींच्या महत्त्वामध्यें जमीनअस्मानाचें अंतर असा गोष्टी एकत्र आणल्यानें केवळ त्यांच्या विसदृशतेमुळेंच मनुष्याच्या मनाला आनंद होतो व एकप्रकारची करमणूक होते. परवां कानपुरास इतर सर्व परिषदांबरोबरच अखिलभारतीय नापितपरिषद् भरणार असल्याचें प्रसिद्ध झालें होतें तें वाचून ज्यास गालांतल्यागालांत देखील हसूं आलें नसेल असा वाचक क्वचितच असेल. नापित समाजानें एकत्र जमून आपल्या हिताहिताच्या गोष्टींची चर्चा करणें यांत कांहीं हास्यास्पद आहे असें म्हणणें नाहीं. विनोदाची

उत्पत्ति कशी होते हें दर्शविण्यासाठीं हें एक साधें उदाहरण घेतलें आहे. परिषदा अगर सभा करावयाच्या त्या गंभीर, महत्त्वाच्या व बड्या बड्या विद्वानांनाच वेळतील अशा विषयांच्या ऊहापोहासाठीं करावयाच्या ही सर्वांच्या मनांत दृढ-बद्ध झालेली गोष्ट व न्हाव्याचें काम म्हणजे रोजच्या व्यवहारांतलें, ज्याच्या-साठीं क्षणभरही विचार करण्याची जरूरी नाहीं असें क्षुल्लक काम, अशी सर्व लोकांच्या मनांत खिळलेली भावना; यामुळें 'न्हाव्याचें काम' व 'परिषद्' या दोन अत्यंत विसदृश गोष्टी एकत्र आणल्याबरोबर त्यापासून विनोदाची निष्पत्ति झाली. कोल्हटकरांच्या 'चोरांचें संमेलन' या लेखापासून विनोद उत्पन्न होतो तोही अशाच तऱ्हेचा होय. अशा तऱ्हेनें क्षुल्लक व पोरकट गोष्टी गंभीर विषयांच्या शेजारीं आणून विनोद निष्पन्न करण्याची लवक पंतांस फार चांगली साधली आहे. या क्षुल्लक गोष्टी ते नेहमीं दृष्टांतादाखल आणतात त्यामुळें तर अधिकच चमत्कृति उत्पन्न होते. उदाहरणार्थ—

म्यां कीर्तना टपावें मार्जारें जेंवि सर्वदा दुग्धा ।

कांहीं ठिकाणीं चमत्कृति उत्पन्न होते ती दृष्टांताच्या अत्यंत क्षुल्लकतेमुळेंच होते असें नाहीं. कोठें कोठें वर्ण्यविषय व दृष्टांताचा विषय यांच्या अत्यंत विषय-भिन्नतेमुळें चमत्कार अनुभवास येतो. वर्ण्यविषय वैराग्याचा, परमेश्वरभक्तीचा असा असून दृष्टान्त चोरी, चहाडी, शिंदळकी असल्या दुर्गुणांचा असला म्हणजे ही आत्यंतिक विषयभिन्नताच चमत्कार उत्पन्न करते. उदाहरणार्थ —

हरिकीर्तनीं शिरावें, धनिकगृहीं जेंवि जपुनि चोरानें ।
न उठावें बहुकार्यें, बहुभारें जेंवि कुचर ढोरानें ॥
उलटा भाव, स्पष्ट व्यवहार दहांत दाखवी सुलटा ।
मन्मति हो तैसी परपुरुषासक्ता सदा जशी कुलटा ॥

कोठें कोठें दृष्टान्तानें उद्भूत केलेले मनोविकार अगर मनापुढें उभें केलेलें चित्र मोठें रमणीय असल्यामुळेंच वाचकाच्या मनाला आल्हाद होतो. उदाहरणार्थ—

( १ ) मतिची पडो हरिगुणीं, पतिकंठीं मिठि जशी सुदारांची ।
( २ ) सत्संगींच शिरावें, बाळ जननंचकीं जसें शिरतें ।
( ३ ) वरि संकोच असावा, आंत बहुत कृष्णकीर्तनीं काम ।
गुरुजनसमक्ष पतिचें घेतां भार्याग्रहें जसें नाम ॥

पहिल्या उदाहरणांत दृष्टांतामुळें शृंगाराचा किंचित्सा उद्भव होत असल्यामुळें

हें आल्हादास कारण होतें; दुसऱ्या व तिसऱ्या उदाहरणांत, संसारांत सर्वांच्या अनुभवास येणारीं दोन रमणीय प्रसंगांचीं चित्रें उचित शब्दांनीं वाचकांच्या डोळ्यांपुढें उभीं केल्यामुळें त्यापासून चित्तास आल्हाद होतो.

वरील सर्व उदाहरणें ' सन्मनोरथराजि' नांवाच्या पंतांच्या अत्यंत हृद्य काव्यांतून घेतलीं आहेत. प्रस्तुत काव्यांत पंतांनीं आपल्या सर्व क्षुल्लक, व्यावहारिक व संसारांत येणाऱ्या रम्य अनुभवांच्या दृष्टांतांचें भांडारच उघडलें आहे. पंतांच्या या अप्रतिम कौशल्याचा, निरुपम सहृदयतेचा व अलौकिक मार्मिकतेचा ज्यांस पूर्ण अनुभव घ्यावयाचा असेल त्यानें सन्मोरथराजि व त्याबरोबरच संशयरत्नमाला, नामरसायन वगैरे एक दोन काव्यें हीं समग्रच वाचलीं पाहिजेत. तथापि असले मार्मिक दृष्टांत देण्याची त्यांची प्रवृत्ति इतरत्रही कोठें कोठें आढळते. असलीं उदाहरणें जेवढीं लक्षांत आलीं त्यांपैकीं कांहींचा खालीं संग्रह केला आहे.*

मोदक लाडू द्यावा बाळा मज दे स्वतत्त्वबोधा त्या । मं. भा. ३. २४

मोहरि इतुकेंहि असें रज दुःसह होय लोचना पृथुला ।
त्रितदुःख तसें ज्याच्या हृदया सोसेल गुरु कसें पृथुला ॥ मं. भा. ४.११२.

भावया या दसांच्या होय, जसा क्षुधित पायसा, मान्य । मं. भा. ६.९८.

झाला अति दुःखप्रद लोकत्रयलोचनांत तो केश । मं. भा. ७. २२.

वर मिळाल्यामुळें उन्मत्त झालेल्या हिरण्यकशिपूचें हें वर्णन आहे.

भय देउनि त्रिवर्गप्रतिपादक शास्त्र पढविती विप्र ।
प्रल्हाद सिके, सारीं नियमीं कटु वाढिलें जसें क्षिप्र ॥ मं. भा. ७. ४७.

देवासि जलाशयतटनिष्ठ बकाकार असुर, सुग्रास ।
क्षुधित ब्राह्मणसा गिळि; भीति न शिशु सुर हे वळ हि उग्रास ॥
मं. भा. १०. १९६.

चंचुपुटें धरुनि चिरी जेंवि लव्हाळ्यास देवराणा या । मं. भा. १०.१९९.

मोट पिपीलिकपंक्तीं प्रलयघनघटा तशी व्रजीं ओते । मं. भा. १०. ३५४.

---

*यांशिवाय अशा क्षुल्लक दृष्टांतांचीं उदाहरणें चवथ्या विभागांतील विवेचनांतही प्रसंगोपात्त कित्येक येऊन गेलीं आहेत. पहा–मं. भा –४.४७ ( पृ. ९४ ); ४.८५ ( पृ. ९६ ); ८.१०६ ( पृ. ११९ ); ९.३१ ( पृ. १२७ ); ११.१७८,२१०, २११ ( पृ. १८० ).

ठावें पुण्य उदंड, अल्प अघ हें, तार्टी जसा पावक । कृ. वि. ६४. १९.
करापरि पढविलें, बाळा जसि माय पाजिती क्षीरा ।
धीरा ! गुरुपदनौकाश्रित तो पावे भवाब्धिपरतीरा ॥ कृ. वि. ८०. ५१.
दिधलें बहुहि अभक्षीं, तन्हि तें माझ्या न होय परितोषा ।
दोषाभिज्ञा न रुचे अत्यनुकूलाहि जारिणी योषा ॥ कृ. वि. ८१. ४.
तेव्हां तत्वाहि कथिलें परि नेणें धारणास मी मुग्ध ।

बाळा न दिलेंचि, दिलें त्याच्या अंजुळिपुटांत जें दुग्ध ॥ कृ. वि. ८१.५.
मायापटल दूर होऊन तत्वज्ञान व्हावें म्हणून श्रीकृष्णाची प्रार्थना करणाऱ्या वसुदेवाचे हे उद्गार आहेत. आर्या मोठी मनोहर असून दृष्टांत समर्पक व वसुदेवासारख्या वृद्ध पुत्रवत्सल गृहस्यास शोभणारा आहे.

र्तिहीं, जैसी दासी स्वामिपथांतील केरसा, पूर ।
दूर क्षिप्र करी बा ! काजे या त्वद्यशासि कापूर ॥ कृ. वि. ८५. १०.

दासीनें केर काढून मार्ग साफ करावा त्याप्रमाणें यमुनेनें पूर नाहींसा केला ही कल्पनाही मोठी मनोहर आहे.

तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं जसा पार्टी ।
सुचिरक्षुधित ब्राह्मण हा हा म्हणताहि वाढिल्या तार्टी ॥ कृ. वि. ८६.२२.
ही सुभद्राहरणप्रसंगींची विनोदपूर्ण आर्या सुप्रसिद्धच आहे.

अभ्रप्रदसदनातें दुरुनि धावोनि येति दुष्काळीं ।
तैसे चतुर्विधाहि जन मज्जति अमृतहृदीं जगत्पाळीं ॥ कृ. वि. ८७. १०.
बहु लाडका भ्रमकशिशु पाठी लागोनि ओंवळा शिवतो ।
स्पर्शभरें काय पळे ब्रह्मांडगृहांत सोवळा शिव तो ? ॥ कृ वि. ८८. १४.

अशा प्रकारचे कांहीं विनोदपर, कांहीं जगाच्या व्यवहारांतले, कांहीं कौटुंबिक संसारांतले, असे अनेक दृष्टांत योजून पंतांनीं आपल्या काव्यास शोभा आणली आहे. परंतु कांहीं ठिकाणीं मात्र असे दृष्टांत योजतांना मोठाच औचित्यभंग होऊन विरस झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. जेथें कोणत्याही गंभीर रसाचा अगर भावनेचा विशेष उत्कर्ष करावयाचा नसून सामान्य वर्णन असेल तेथें असले मनोरंजक व क्षुल्लक दृष्टांत शोभा देतात. परंतु जेथें गंभीर व उदात्त भावनेचा परिपोष करावयास पाहिजे अशा ठिकाणीं क्षुल्लक अगर पोरकट दृष्टांत अत्यंत वैरस्यावह होतात.

देववधूप्रतिमाला वेष्टिति त्याला, जसा मधूप्रति माळा । कृ. वि. ४७. २.

ही गोपींना दिलेली माशांची वेरास्यावह उपमा, त्याचप्रमाणें

मोहें रक्तचि गेला तो उद्धव वाळ जेंवि शाळेला । मं. भा. ११. ५८५.

कन्येसि तसें रोदन अकें तें पसरवीच आ शात्या । मं. भा. ११. ५८३.

या उदात्त प्रसंगाचा अगदीं विरस करणाऱ्या उपमा, यांचा मागें चवथ्या विभागांत उल्लेख करून त्या विषयीं विवेचन केलें आहेच. ( पहा. पृ. १८३. शिवाय विभाग ७ मधील ' औचित्यहानि 'चें विवेचन पहा. )

१९. ( ३ ) पंतांच्या काव्यांतला आणखी एक ठळक रीतीनें नजरेस भरणारा प्रकार म्हणजे पर्यायोक्त अलंकारानें वर्णन सजविण्याची तऱ्हा होय. कोणताही अर्थ सरळ रीतीनें वर्णन न करितां कांहीं तरी कोटि करून पर्यायानें तो अर्थ व्यक्त केला म्हणजे पर्यायोक्त अलंकार होतो. पंतांनीं आपल्या काव्यांत असंख्य ठिकाणीं असला कोटिबाजपणा करून क्षणिक चमत्कृति उत्पन्न केली आहे. दोन चार सुंदर उदाहरणें या ठिकाणीं देणें बस होईल.

'त्वां सूर्यवंश सुयशें सति ! धन्य केला । वैदेहि धन्य तुज पावुनि कन्यकेला'।

प्रेमें असा मज दिला बहुमान, लज्जा । सांगे मदीय नयनांसि 'पदींच मज्जा' ॥

रावणवध केल्यानंतर सीता अग्निदिव्य करून शुद्ध झाली व तिचा रामचंद्रानें स्वीकार केला. त्यावेळेस दशरथमामाजींनीं स्वर्गांतून खालीं येऊन सीतेचें गौरव करून तिला जो आशीर्वाद दिला त्याचें सीतेनेंच केलेलें हें मनोहर वर्णन आहे. ' लाजेनें सीतेची दृष्टि खालीं झाली ' या अर्थावर शेवटच्या चरणांत सुंदर पर्यायोक्त रचलें आहे.

नेत्रभुजोरुस्फुरणें चितेची सोडिली मनें वाज ।

माज प्राणांनींहि, गेल्या धैर्येंहि यावया लाज ॥ कृ. वि. ८३. ४१.

नेत्र व बाहु यांच्या शुभसूचक स्फुरणामुळें, मन चितेच्या बाजेवर रुग्ण होऊन पडलें होतें तें उठलें, प्राणांनीं बाहेर जाण्यासाठीं कंबर बांधली होती ती सोडली व धैर्य लाज सोडून परत यावयास लागलें असा आर्येचा अर्थ आहे. ' मनाची चिंता नाहींशी झाली, मरण टळलें व धैर्य गेलेलें पुनः आलें ' येवढा साधा अर्थ व्यक्त करण्यासाठीं किती चातुर्याच्या कोटया केल्या आहेत !

नयनयुग दानपतिचें घाया करुणामृतार्णवांत बुडी ।

आधीं टाकी, मग मदवहतवपु त्या रथावरुनि उडी ॥ मं. भा. १७.४८५.

दानपति म्हणजे अक्रूर. ' प्रथम अक्रूराचे नेत्र उडी टाकते झाले व नंतर त्याच्या शरीरानें रथाखालीं उडी टाकली ' असें येथें वर्णन आहे. दयामय ईश्वराच्या मूर्तीकडे अक्रूराची दृष्टि गेली या साध्या गोष्टीचें अक्रूराचे नेत्र करुणामृतार्णवांत बुडी मारण्याकरितां उडी टाकिते झाले असें वर्णन करून पंतांनीं फारच सुंदर पर्यायोक्त साधलें आहे. शिवाय ' उडी टाकी ' एकाच क्रियेमुळें तुल्ययोगिताही झाली आहे.

कोप मुनींस म्हणे, ' या गुरुकार्यार्थीच शुद्ध तप सारा '। मं. भा. ११.१२९. " गुरुकार्यार्थ, म्हणजे कृष्णानें इच्छिलेल्या कार्याकरितां, आपलें तप खर्च करा ' असें कोप मुनींस म्हणाला. क्रोधामुळें शाप देऊन मुनींनीं कृष्णाचें कार्य साधिलें असा भावार्थ. खालील आर्येचें उदाहरणही असेंच सुंदर उदाहरण आहे.

वाट मम ध्यानाची, हळूहळु अनवस, मनास जो लावी ।
विषयविरक्ति तयाच्या त्या स्वांताला सुखेंचि बोलावी ॥ मं.भा.११-३१५.

२०.(४)पंतांच्या अलंकारांविषयीं दुसरी लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे यमकरचनेशीं त्यांचें दिसून येणारें साहचर्य ही होय. आर्येच्या पूर्वार्धांत कथानकाचें वर्णन केल्यावर उत्तरार्धामध्यें एकादा समर्पक दृष्टान्त, एकादी उपमा अगर दुसरा कांहीं चमत्कृतिजनक अलंकार गोवलेला आढळावयाचा ही गोष्ट पंतवाचकांच्या परिचयाची आहेच. ही उत्तरार्धांत प्रकट होणारी कल्पनाचमत्कृति पुष्कळ वेळां यमकांच्याकरितां आलेली स्पष्ट दिसते. म्हणजे यमक साधण्यासाठीं वर्ण्यविषयाला जुळेल अशी कल्पना शोधून काढून ती आर्यार्धांत बसविण्यांत येते. पंतांच्या या प्रवृत्तीचीही कुचेष्टा केलेली कोठें आढळण्यांत येते. परंतु यमक रचण्याचा मूळ हेतु मनांत धरून त्याच्यासाठीं एकादी कल्पना ग्रथित केली तर त्यांत दोषास्पद असें वस्तुतः कांहींच नाहीं. पंतांच्या कल्पनांचें भांडार फार मोठें असल्यामुळें ते म्हणतील त्या यमकाला जुळणाऱ्या अत्यंत समर्पक व वर्ण्यविषयाला शोभविणाऱ्या वाटेल तितक्या कल्पना त्यांच्यापुढें येऊन उभ्या राहात असत. उलटपक्षीं त्यांचा यमकांचा खजिना असाच अपरंपार असल्यामुळें व भाषाप्रभुत्वही दांडगें असल्यामुळें एकादी उत्कृष्ट कल्पना त्यांना प्रथम सुचली तर ती यमकबंधांत सुंदर रीतीनें ग्रथित करणेंही त्यांना मुळींच अवघड जात नसे. तात्पर्य, यमकांच्या साहचर्याचा पंतांच्या कल्पनाविलासावर कांहीं अपायकारक परिणाम झालेला नसून त्यांच्या प्रतिभेच्या स्वच्छंदपणास त्यामुळें मुळींच अटकाव

झालेला दिसत नाहीं. ध्रुवचरित्रांतली खालील साकी पहा.—

कथितां वृत्त सविस्तर त्याच्या होय भर विलापाला ।
पुत्रविरहविषतरुचा विधिनें विपुल भरविला पाला ॥ ध्रु. च. ३७.

येथें उत्तरार्धांतील ' भरविला पाला ' हे शब्द ' भर विलापाला ' याच्याशीं जुळण्याकरितां उघड आलेले दिसतात. अर्थात् पाल्याचा दृष्टान्त यमकाकरितांच आणलेला आहे हें उघड आहे. असें असूनही त्याच्या ताजेपणांत व सौंदर्यांत कांहीं कमीपणा आलेला दिसत नाहीं.

दे प्रभुसि, कवींच्या सुख व्हाया बहु मानसां, बळी काय ।
सांगा देवावांचुनि पावे बहुमान सांबळी काय ? ॥ वा. च. १९१ ॥

येथें नऊ अक्षरांचें यमक साधलें आहे. संबळीचा दृष्टांत अर्थात यमकाकरितांच आला आहे. परंतु तो फार समर्पक व सुंदर असून रसोत्कर्षास कारण झाला आहे.

तथापि कित्येक ठिकाणीं यमकाकरितां आणिलेल्या कल्पना नीरस, कटु व अप्रयोजक असतात हें नमूद करणें अवश्य आहे. अशी स्थळें एकंदरीनें थोडीं आढळतात खरीं तथापि तीं आहेत यांत कांहीं शंका नाहीं. पंतांच्या महाभारतांत व महाभारतकालीन रचनेंत यमकांचा हव्यास विशेष दिसून येतो. अर्थात् अशीं दुष्ट उदाहरणें महाभारतकालीन रचनेंतच जास्त आढळतात. मंत्रभागवतकालीन अगर त्या नंतरच्या रचनेंत अशीं उदाहरणें बहुधा सांपडत नाहींत. अमृतमथन व वामनचरित हीं काव्यें महाभारतकालीन होत, असें आम्हीं मागें प्रतिपादन केलेंच आहे. त्यांत अशीं कित्येक उदाहरणें सांपडतात. मासल्याकरितां एकच आर्या खालीं दिली आहे.

हरि हो ! अरि हो ! यासि क्षिति देतों, म्हणुं नकोचि ' हाय ' मुने ।
मत्कीर्तिनें धवळतां विश्व, म्हणो अर्क मात्र ' हा यमुने ! ' ॥ वा. च. १०५.

या आर्येचें उत्तरार्ध केवळ यमकाकरितां दूरान्वित व विरस करणारी कल्पना खेंचून आणून लिहिलें आहे. कांहीं झालें तरी मी वामनास त्रिपाद भूमि देणारच असें म्हणत असलेल्या बळीची ही उक्ति आहे. अगोदर द्वितीयार्धांतील गर्विष्ठ उद्गार बळीच्या तोंडीं कसेसेच वाटतात. केवळ आपली कीर्ति विश्वांत व्हावी या हेतूनेंच बळी कांहीं त्रिपाद भूमि दान देत नव्हता. पण तें एक असो. बळीची कीर्ति सूर्यापेक्षांही अधिक देदीप्यमान अशी विश्वावर प्रकाशल्यामुळें सूर्य हताश होईल हेंवरेंही वर्णन सुसंगतच आहे असें क्षणभर मानूं. पण त्यानें यमुनेचेंच नांव घेऊन

' हा, यमुने ' असे उद्गार काढण्याला केवळ पंतांच्या यमकाच्या अत्यासक्तीशिवाय दुसरें कांहीं कारण दिसत नाहीं ! उलट बळीच्या शुभ्र यशानें सर्व जगाबरोबर यमुना काळ्याची गोरी झाली तर तिला तो प्रसंग आनंददायकच होईल !

असो. यमकांच्या हव्यासामुळें पंतांच्या भाषासरणींत व एकंदरीनें काव्य-रचनेंत जीं व्यंगें उत्पन्न झालेलीं आहेत त्यांचा विचार पूर्वीं केलाच आहे. येथे फक्त यमकांचा त्यांच्या कल्पनाविलासाशीं कसा व कितपत संबंध आलेला दृष्टीस पडतो येवढ्याचाच विचार कर्तव्य असल्यानें तेवढ्यापुरता उल्लेख केला आहे.

२१. पंतांच्या कल्पनाविलासाचें व त्यांच्या काव्यांतील अलंकारांचें बहुतांशीं स्वरूपदर्शन मात्र आतांपर्यंत केलें.आतां या अलंकारांच्या सजावटींत दिसून येणारे, ज्यांच्यामुळें काव्याची आल्हादकता कांहीं अंशीं कमी होते, असे दोष दाखवून हें अलंकारांचें विवेचन आटपतें घेऊं.

( १ ) नेहमीं येणाऱ्या कंटाळवाण्या उपमा. पंतांच्या काव्यांत कांहीं ठराविक दृष्टान्त व उपमा इतक्या वारंवार येत असतात कीं त्यांचा पुढें अगदीं वीट येऊन जातो. सिंह व हत्ती; सूर्य व कमळें; मेघ व मोर: मेघ व चातक; चंद्र व चकोर; माता व स्तनास लाविलेलें बालक; गाय व वत्स वगैरे जोड्यांचे दृष्टान्त इतके पुनः पुनः येतात कीं,कांहीं सांगतां सोय नाहीं. पराक्रमी पुरुषाचें व लढाईचें वर्णन असलें कीं, तेथें सिंह व हत्ती यांची उपमा ठेवलेलीच म्हणून समजावें. जखमी झालेल्या लढाऊ पुरुषाचें वर्णन आलें कीं, फुललेल्या पळसाच्या झाडाची उपमा आलीच. कोणाच्याही भक्तीचें अगर उत्कंठित मनःस्थितीचें वर्णन आलें कीं, मेघ व मयूर किंवा मेघ व चातक या ठरीव जोड्यांचा दृष्टान्त यावयाचाच. पंतांनीं आपल्या ' मयूर ' या नांवाचा उपयोग करून व परमेश्वरास मेघाची उपमा देऊन पुष्कळ ठिकाणीं

> रामघन सत्प्रसादामृत जों जों बहु वळूनि वर्षतसे ।
> तों तों भक्त मयूर स्वार्यां केका करूनि हर्षतसे ॥ विराट. ७. ३७.
> दयामृतघना अहो हरि ! वळा मयूराकडे । केका.

अशा तऱ्हेचे अत्यंत प्रेमळ व हृदयंगम उद्गार काढले आहेत हें खरें. परंतु चांगल्या कल्पनेची देखील पुनरुक्ति फार वेळां झाली म्हणजे काव्य या नात्यानें तिच्यांतील स्वारस्य नाहींसें होतें. शिवाय सर्व ठिकाणीं एकाच कल्पनेचा पुनरुच्चार करतांना कवीच्या शब्दांतही तीच मनःपूर्वकता राहूं शकत नाहीं. तेव्हां पंतांनीं आपल्या

स्वतःसंबंधानें व इतरांच्या संबंधानें मयूराची उपमा योजून आपल्या काव्यांत हजारों ठिकाणीं जें वर्णन केलें आहे तें निष्फळ, इतकेंच नव्हे तर दोषावह आहे असेंच सामान्यतः विधान करणें भाग आहे. स्वतःच्या संबंधानें प्रेमळपणा व मनःप्रवेकता ज्यांत विशेष आढळण्याचा संभव त्या मयूराच्या दृष्टान्ताची जर ही कथा तर सिंह व हत्ती, माता व बालक वगैरे जोड्यांचे दृष्टान्त एकसारखे येऊं लागले म्हणजे किती कंटाळवाणे होत असतील हें सांगावयासच नको. पंतकाव्य ज्यांना बरेंच वाचण्याचा प्रसंग आला आहे त्यांच्या लक्षांत हा कंटाळवाणा प्रकार आल्याखेरीज रहात नाहीं. प्रत्येक उपमेचीं शेंपन्नास उदाहरणें येथें देणें अर्थात्च स्थलाभावामुळें शक्य नाहीं. एकाच तऱ्हेचीं थोडीशीं उदाहरणें दिग्दर्शनार्थ देतों.

सिंह व हत्ती किंवा कोल्हे.—

(१) सिंह कोपे न गर्जे जवळिहि करितो यद्यपि ध्यान फेरु । कृ. वि. ७४.२०

(२) दानार्द्रद्विपयूथनायकशिरोमुक्ताफळीं आवडी [ सिंहाची ] । कृ. वि. ७४.२६.

(३) कीं हस्तीवरि सिंह, कीं खवळला दुष्टांतकृत् काळ हा । कृ. वि. ७६.८.

(४) शरनखीं हरि तो परवारणीं । कृ. वि. ७६.९.

(५) स्वामी ज्याचा न ठाके मृगरिपुसमरीं यूथ वांचेल काय? । कृ.वि.७६.१०.

(६) मारायास जसा मृगेंद्र गहनीं दानांधदंतावळा । कृ. वि. ७७.३.

(७) ते शत्रु द्विप सांवसाग्रकिगरद्दयुग्रगंवाननीं । कृ. वि. ७७. ४.

(८) कोल्यानें हरि रोधिला विधिबळें ष्याला शिवी गांविला । कृ. वि.७७.१६.

(९) वृष्णिगव्याघ्रवेच्छु चेदिपतिवा तो मित्र भातू सशा । कृ. वि. ७७. २२.

(१०) नगाग्रगमृगाधिपें जसि विलोकितां वारणा । कृ. वि. ७८.४.

कृष्णविजयाच्या पांचच अध्यायांच्या अवकाशांत एकाच उपमेची कितीदां पुनरावृत्ति झालेली आहे हें वर दिलेल्या उदाहरणांवरून लक्षांत येईल. अशीच किंबहुना याहीपेक्षां जास्त वेळां, मेघ व मयूर, कल्पवृक्ष व याचक, फुलेला पळस, वगैरे उपमांची पुनरुक्ति होत असल्यामुळें हा प्रकार किती कंटाळवाणा होत असेल याचें सहज अनुमान होईल.

२२. (२) परमेश्वराच्या विभूतिमत्त्वाचा उल्लेख हाही असाच पुनरुक्तीमुळें कंटाळवाणा होतो. विभूतिमत्त्वाचा उल्लेख म्हणजे काय हें खालील उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

यज्चरणरेणु दुर्लभ योगिवरांतें प्रमोदरासि, शुची ।

क्षितिसि कराया करिते क्रीडा प्रभु रीते घननिशं शिशुची ॥ मं.भा.१०.१४

रामकृष्ण लहानपणीं क्रीडा करूं लागले येवढें सांगण्यासाठीं कवीनें येथें केवढें अवडंबर केलें आहे पहा. ज्यांचा चरणरज योगिवरांनाही दुर्लभ असे प्रभु लहान बालक होऊन पृथ्वीला पवित्र करण्यासाठीं क्रीडा करूं लागले असें वर्णन करून कवीनें रामकृष्णांच्या ईश्वरी सामर्थ्याचा येथें उल्लेख केला आहे. अशा वर्णनामध्यें बहुधा विरोधालंकाराची छटा असते. वरच्या आर्येतही विरोध आहेच. परंतु याहीपेक्षां स्पष्ट उदाहरण—

यतिदुष्प्रेक्ष्यब्रह्म पाहति वसुदेवदेवकी रुचिर । मं. भा. १०. ५५.

यतींनाही पहावयास मिळण्यास कठीण अशा ब्रह्माला वसुदेवदेवकी यांनीं डोळे भरून पाहिलें ! आणखी एक दोन उदाहरणें—

वत्सांचीं अवलंबुनि ते जगदवलंब चालती पुच्छें । मं. भा. १०.१५५.

सर्व जगाचे आधारभूत असे ते रामकृष्ण वासरांच्या शेपट्या धरून त्यांच्या आधारानें चालूं लागले.

वाङ्मनसागोचर जें ब्रह्म तया ती म्हणे धरीन अहा ! । मं. भा. १०. १७५.
नगर अनंत अनंतब्रह्मांडांचें तयासि बांधाया ।
लागे, दाम न पुरतां दुसरें तिसरें तरीहि सांधाया ॥ मं. भा. १०.१७७.

या उदाहरणांतील विरोधाभास स्पष्टच आहे. अशा रीतीनें परमेश्वराच्या विभूतिमत्त्वाचा व अलौकिक सामर्थ्याचा उल्लेख करून त्याचा त्याच्या प्राकृत लीलांशीं विरोध दर्शविण्यानें प्रसंगविशेषीं थोडीशी चमत्कृति उत्पन्न होते. कित्येक वेळां अशा उल्लेखांमुळें वर्णनास उदात्तता येऊन रसाचाही परिपोष होतो. उदाहरणार्थ—

ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दररक्तचक्षुच्या पातें ।
तो तूं आंगें मारूं पाहांसे मज दावुनि प्रतापातें ! ॥ भीष्मपर्व ९. १०२.

आपल्याला मारावयास श्रीकृष्ण स्वतः धांवून येत आहे हें पाहून धन्यताभरानें गहिंवरून आलेल्या भीष्मांचे हे उद्गार प्रेमळ नाहींत असें कोण म्हणेल ? तसेंच

शंभुशिरीं ज्याचें चरणोदक, वेद जयाचे बंदी ।
तो तीर्थरूप तीर्थांचाही मुनिपादोदक वंदी ॥ पृथु. २८.

मुनि=सुदामदेव. या सुंदर साकीलाही, सुदामदेवाचें पादोदक वंदन करण्याच्या कृत्याशीं परमेश्वराच्या विभूतिमत्त्वाचा विरोध दर्शविल्यामुळेंच चारुता आलेली आहे हें उघड दिसत आहे.

परंतु प्रसंगविशेषींच शोभणाऱ्या या वर्णनपद्धतीचा पंतांनीं फार अतिरेक केला असल्यामुळेंच त्याचा येथें दोषरूपानें उल्लेख करण्याचा प्रसंग आला आहे. वर सांगितलेल्या कंटाळवाण्या उपमांप्रमाणेंच या विभूतिमत्त्वाचा उल्लेख पंतांनीं अगदीं तारतम्यशून्य बुद्धीनें वीट येईल इतका केला आहे. कृष्णविजयाच्या एका लहानशा अध्यायांतील ( अ० ९ ) अशा तऱ्हेचे सर्व उल्लेख खालीं दिले आहेत. यावरून पंतांच्या सर्व काव्यगहनांत हा प्रकार कसा माजलेला आहे तें लक्षांत येईल.

( १ ) तों येवूनि रवीला । धरि, सुज्ञीं सर्व अर्थ ज्या निरवीला ।
( २ ) तृप्त उदार कथांनीं । ज्याच्या जन, तो सतृष्ण दारक थानीं ॥ ६
( ३ ) घे उत्संगावरि ती । हरविधि यवरगधूलिसंगा वरिती ।
( ४ ) पी स्नेहस्तन्यासी । नमिति जया जोडुनी स्वहस्त न्यासी ॥ ७
( ५ ) स्वसुता खोडिकराला । पाहे, सद्वृंद ज्यासि जोडि कराला ॥ १३
( ६ ) धरिन म्हणे सहसा धी । ज्या न, बळें करुनि तरिहि दुःसह,साधी॥ १५
( ७ ) प्रेमें मति विनटावी । ज्याच्या चरणीं, तयासि माय दटावी ।
( ८ ) ज्यासि यमादिक भीती । मानेपासुनि तो धरि प्रभु भीती ॥ १८
( ९ ) जीव म्हणति 'बा धांवें' । त्यासि म्हणे ते 'उखळीं बांधावें ॥ २०
( १० ) मुनि नमिति सदा मानें । उखळीं बांधी जगत्पतिस दामानें ॥ २१
( २१ ) चरिता दावुनि दामीं । गुंते कीं, भक्तवशीन मात्र सदा मीं ॥ २५
( १२ ) दामें त्या बांधावें । यमपाशेंही न यश्नता बाधावें ॥ २६ ॥

अठ्ठावीस पद्यांच्या एका अध्यायांतलीं अगदीं ठळक उदाहरणें काढलीं तीं इतकीं भरलीं ! यावरून सर्व पंतकाव्य वाचणारांस असले उद्गार वारंवार येऊन किती त्रास उत्पन्न करीत असतील याची कल्पना होईल.

२३. ( ३ ) याशिवाय पंतकाव्यांतील अलंकारांमध्यें औचित्यहानि, रसभंग, ग्राम्यता इत्यादि दोषही कुठें कुठें आढळून येतात. या सर्व दोषांमध्यें औचित्यहानि हाच दोष प्रमुख असून इतर सर्व दोष याच व्यापक दोषाचीं निरनिराळीं स्वरूपें होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. औचित्यहानीचें विवेचन मागें सातव्या विभागांत केलेंच आहे. ( पहा; पृ. ३०२–३१०. )

एकंदरीनें पंतकाव्यांतील इतर दोषांप्रमाणेंच त्यांतील अलंकारांचे दोषही तारतम्याचा व सफाईचा अभाव जो त्यांच्या काव्यांत सर्वत्र दिसून येतो त्यामुळेंच उत्पन्न झाले आहेत असें नजरेस येतें. आणि हा तारतम्याचा व सफाईचा जो

थोडाबहुत अभाव त्यांच्या काव्यांत दिसून येतो तो सुश्लिष्ट काव्य निर्माण करण्याकडे त्यांनीं सर्वस्वीं लक्ष पुरविलें नाहीं, यामुळेंच होय; स्वभावतःच त्यांच्या अंगीं तारतम्य कमी होतें म्हणून नव्हे. त्यांच्या अंगीं तारतम्य पुष्कळ होतें व रसिकमान्य काव्य रचण्याचा त्यांचा केवळ एकच हेतु असता तर त्यांनीं काव्याच्या सफाईविषयीं जास्त काळजी घेऊन सध्यां जे दोष त्यांत आपणाला प्रतीत होतात ते मुळींच उरूं दिले नसते. परंतु त्यांचा हेतु कालिदासादिकांप्रमाणें सर्वस्वीं सुंदर काव्यनिर्मितीचाच नसल्यामुळें त्यांनीं या रसिकांस डाचणाऱ्या गोष्टींकडे आस्थापूर्वक लक्ष पुरविलें नाहीं.

[ २ ]

२४. काव्याचें एक महत्त्वाचें अंग जें **कल्पनाविलास** त्याचा आतांपर्यंत विचार केला. आतां दुसरें तितकेंच किंबहुना त्याहीपेक्षां अधिक महत्वाचें अंग जें **रसाविर्भाव** त्याचें विवेचन करावयाचें आहे. कवींचा कल्पनाविलास काव्यामध्यें अलंकारांच्या द्वारा प्रकट होत असतो; अर्थात् अलंकारांचें विवेचन केलें म्हणजे कवींच्या कल्पनाशक्तीचा परामर्श घेतल्यासारखेंच होतें. यासाठींच आतांपर्यंत वर जें विवेचन केलें आहे तें अलंकारांसच अनुलक्षून केलें आहे. त्यावरूनच वाचकांस कवीच्या कल्पनाशक्तीचें स्वरूप चांगल्या रीतीनें ध्यानांत येण्याजोगें आहे.

२५. काव्याचें स्वतंत्र व महत्त्वाचें अंग या नात्यानें कल्पनाविलास व तद्द्योतक अलंकार यांचें महत्त्व आहेच. परंतु त्यांचा दुसरा आनुषंगिक उपयोगही काव्यामध्यें होत असतो. अलंकारांचा रसपरिपोषासाठींही आनुषंगिक रीतीनें कुशल कवि उपयोग करून घेतात. एकाद्या कारखान्यांत मुख्य मालाची निपज होत असतांना अनायासें कांहीं उपपदार्थही ( bye-products ) निघत असतात त्याप्रमाणें अलंकारांचा हा आनुषंगिक रीतीनें करून घेतलेला उपयोग होय. अलंकाराच्या द्वारानें कवींची मनोहर कल्पना तर प्रकट होतेच परंतु सहृदयतेनें व मार्मिकपणानें जर अलंकाराची योजना झाली तर त्याच्यापासून रसनिष्पत्तीचें मोठेंच कार्य घडवून आणतां येतें. एकाद्या साध्याच परंतु वाचकांच्या मनास चटका लावून सोडणाऱ्या उपमेनें ( अगर उत्प्रेक्षेनें ) रसाचा अतिशय उत्कर्ष झाल्याचीं उदाहरणें कालिदासादि कवींच्या काव्यांतून शेंकडों काढून दाखवितां येतील. शास्त्रीय विवेचन करतांना रसाला काव्याचा आत्मा म्हणा व अलंकारांना बाह्यभूषणांच्या जागीं कल्पून अगदीं गौण ठरवा; प्रत्यक्ष पाहूं गेलें म्हणजे खुद्द रसनिष्पत्तीचें

काम देखील पुष्कळ ठिकाणीं अलंकारांच्याच द्वारा होत असलेलें आढळतें. आमच्या संस्कृत साहित्यशास्त्रकारांना देखील अलंकारांचा रसनिष्पत्तीसाठीं होणारा उपयोग अमान्य आहे असें नाहीं. ' अलंकार हे वाच्यार्थात्मक जें काव्याचें शरीर त्याला शोभिवंत करतात व त्याच्या द्वारानें मुख्य रसाचाही उत्कर्ष करतात ' *—असा खुद्द काव्यप्रकाशकारांचाच अभिप्राय आहे. ध्वनीविषयींच्या अभिमानाच्या भरांत या काश्मीरक आलंकारिकांनीं कल्पनाचमत्कृतीला गौण लेखून अलंकारांची योग्यता अगदीं कमी ठरविली, तथापि त्यांनाही अलंकार पुष्कळ वेळां रसोत्कर्षाला उपकारक होतात ही गोष्ट अमान्य करतां आली नाहीं. सत्कवींनीं अलंकार टाकून दिले असते तर त्यांच्या काव्यांतील अर्धा अधिक रस नाहींसा झाला असता असें म्हटल्यास अतिशयोक्ति होण्याचा मुळींच संभव नाहीं. परिचितत्वामुळें वाचकांच्या अंतःकरणाला तात्काळ स्पर्श करील व भावना उचंबळून सोडील अशी कल्पना योजून उत्कृष्ट कवि आपलें रसनिष्पत्तीचें काम फारच कौशल्यानें साधून घेतात. आपण एक उदाहरण घेऊन पाहूं—

मनोरागस्तीव्रं विषमिव विसर्पत्यविरतं
प्रमाथी निर्धूमं ज्वलति विधुतः पावक इव ।
हिनस्ति प्रत्यङ्गं ज्वर इव गरीयानित इतो
न मां त्रातुं तातः प्रभवति न चाम्बा न भवती ।।मालतीमाधव,अंक २.

हें पद्य काव्यप्रकाशकारांनींच अलंकार हे रसोत्कर्षास कसे कारणीभूत होतात हें दर्शविण्यासाठीं उदाहृत केलें आहे. तथापि आपण आणखी एक स्वतंत्र उदाहरण घेऊं—( कुमारसंभव ४. ४६. )—

अथ मदनवधूरुपप्लवान्तं व्यसनकृशा परिपालयांबभूव ।
शशिन इव दिवातनस्य लेखा किरणपरिक्षयधूसरा प्रदोषम् ।।

मदनाच्या वियोगानें रतीची झालेली करुणास्पद स्थिति येथें वर्णिली आहे. दिवसां, सूर्याच्या रुक्ष प्रकाशांत, निस्तेज दिसणाऱ्या चंद्रकलेचा दृष्टान्त दिल्यामुळें रतीची निस्तेजता, विरहकृशता, पांडुरता या वाचकाच्या मनांत कशा उत्कटत्वानें जाऊन भिडतात व त्यामुळें करुणरसाच्या उठावास केवढें साहाय्य होतें हें रसिकांच्या सहज लक्षांत येणारें आहे. पण येवढें दूरचेंही उदाहरण न घेतां आपण आपल्या तुकोबारायांचा एक गोड अभंग घेऊन पाहूं.—

---

* उपकुर्वन्ति तं ( रसं ) सन्तं येऽङ्गद्वारेण जातुचित् । काव्यप्रकाश, उल्लास ८.

कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे ॥
तैसें जालें माझ्या जीवा । केव्हां भेटसी केशवा ॥
चुकलिया माये । बाळ हुरुहुरु पाहे ॥
जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥

आपल्या आर्त अवस्थेचें वर्णन करण्याकरितां तुकोबांनीं येथें जे दोन साधेच परंतु वाचकांच्या मनाला तात्काळ द्रव आणणारे दृष्टान्त घेतले आहेत त्याच्यामुळें रसनिष्पत्ति होत नाहीं असें कोण म्हणेल ? आईबापांसून ताटातूट झालेली पूर्वीच्या काळची ती सात आठ वर्षांची नवरी प्रथम सासरीं जाऊं लागली म्हणजे तिची होत असलेली करुणास्पद व कातर अवस्था कोणाही सहृदय संसारिक-जनाच्या मनाला चटका लावून सोडते.आणि या अगदीं घरगुती गोष्टीचा तुकोबांनीं अत्यंत मार्मिकपणानें दृष्टान्तादाखल उपयोग करून वाचकांच्या मनाला पाझर आणील अशी रसनिष्पत्ति येथें करून दाखविली आहे. मातेचा दृष्टान्तही असाच रसपोषक आहे.

२६. अलंकारांचा रसनिष्पत्तीसाठीं उपयोग करून घेण्याचें हें कौशल्य इतर महाकवींप्रमाणें पंतांच्या अंगींहीं उत्कृष्ट वसत होतें. रसनिष्पत्तीस कारणीभूत होऊन तद्द्वारा सहृदयांस आल्हाद देणारे असे शेंकडों अलंकार त्यांच्या काव्यांतून काढून दाखवितां येतील. परंतु अशा सर्व स्थळांच्या संग्रहाचें बाड कांहीं आपल्याला तयार करावयाचें नसल्यामुळें पंतांची पद्धत लक्षांत येण्यासाठीं थोडींशीं उदाहरणें घेणें बस होईल. खालील उतारा पंतांच्या सावित्रीगीतांतील आहे.–

पतीच्या सुखार्थ बळें आणी हास्य । मयूरांचें लास्य विलोकूनी ॥ १३० ॥
विनोदवचनें पतीतें डोलवी । दावूनी बोलवी पुण्यकथा ॥ १३१ ॥
एकें नेत्रें प्रिया एकें नेत्रें काळा । पाहे राजबाळा हृष्टा भीता ॥ १३२ ॥

सत्यवानासह सावित्री वनांत जात असतां तिची स्थिति कशी झाली होती त्याचें वर्णन करणारें हें सुंदर शब्दचित्र आहे. हे तीन्ही अभंग हृदयभेदक आहेतच पण त्यांतही शेवटच्या अभंगांतील मार्मिक वर्णनानें करुणरसाची हद्द दाखविली आहे. येथें सावित्रीच्या मनाच्या दोन परस्परविरुद्ध अवस्था एकत्र दाखविल्या असल्यामुळें असंगति अलंकार झाला आहे. परंतु या चमत्कृतिजनक अलंकारिक वर्णनानें सावित्रीच्या त्यावेळच्या भयचकित स्थितीचें जें चित्र वाचकाच्या मना-समोर उभें राहतें त्याच्यापुढें नामांकित चित्रकारांचे कुंचले केवळ रद्द होत असें

वाटल्याखेरीज रहात नाहीं ! अगदीं निकट येऊन ठेपलेल्या अनर्थामुळें झालेली भयविह्वल स्थिति व त्यांतल्या त्यांत आपण पतीच्या समागमें आहोंत यामुळें वाटणारें सुख या दोहोंचें वर्णन याच्यापेक्षां चांगलें कोणासही करतां येणें शक्य नाहीं.

रसाच्या अंगभूत असलेल्या अलंकारांचीं उदाहरणें पंतांच्या केकावलींत पुष्कळच सांपडतात. केकावलि हें एक सबंच अत्यंत उत्कृष्ट ध्वनिकाव्य आहे. त्यांत भक्ति व वत्सल हे रस परिपुष्ट झालेले असून नानातऱ्हेच्या कल्पनांनीं, कोटिक्रमांनीं, लाडवीपणाच्या व सलगीच्या मनोहर उद्गारांनीं तें काव्य अलंकृत झालेलें आहे. अशा सर्व उद्गारांमधून कवीची आर्तता व भक्तिभाव ध्वनित होत असून हें काव्य सर्व भक्तिप्रेमरसमय होऊन बसलें आहे.

धना परिजना गृहीं तुमचिया उणें कायसें
न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें ।
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती
गुणा न म्हणतां उणा, अधिक आदरें सेविती ॥ केका. २३.

येथें परमेश्वराची रत्नभांडारवान् पृथ्वीपतीशीं तुलना केल्यामुळें प्रथमार्धात प्रतिवस्तूपमा हा अलंकार झाला आहे. उत्तरार्धांत श्रीमंत लोकांची सर्व वस्तु संग्रहीं ठेवण्याची रीत वर्णिली असून परमेश्वरानेंही तसेंच करावें असें सुचविलें असल्यामुळें अप्रस्तुतप्रशंसा झाली आहे. किंवा ' प्रभु ' शब्द द्व्यर्थी मानल्यास समासोक्तीही होईल. या अलंकारांमुळें श्लोकास अत्यंत मनोरमता तर आली आहेच. परंतु ' मी अगदीं दीन, गुणहीन, निरुद्रवी असा पामर आहें; तथापि कसें तरी करून आपण माझा अंगिकार करा ' असा जो अर्थ यांतून ध्वनित होत आहे व त्यावरून कवीच्या उग्र शरणागतीचा प्रत्यय येत आहे ती येथें मुख्य आहे. तिच्यामुळेंच प्रस्तुत श्लोक वाचकांचें मन वेधून घेतो यांत शंका नाहीं.

न जें प्रिय सदोष तें, प्रिय सदोषही चांगलें
स्वतोक पितरां रुचे जरिहि कर्दमीं रांगलें ।
तुलाचि धरि पोटिशीं कशि तशा यशोदा अरे !
जरी मळविशी रजोमलिनकाय तूं अंबरें ॥ केका. ८७

हाही श्लोक वात्सल्यानें व भक्तिभावानें केवळ ओथंबलेला आहे. येथें प्रथम ' नावडती वस्तु कितीही चांगली असली तरी सदोष भासते व आवडती वस्तु सदोष असली तरी चांगली वाटते ' हा सामान्य सिद्धान्त पहिल्या चरणांत कथन केला

असून ' आपलें धुळीनें भरलेलें मूलही आईबापांस गोजिरवाणें वाटतें ' या विशेष विधानानें त्याचें समर्थन केलें आहे. अशा रीतीनें हा अर्थान्तरन्यास अलंकार झाला आहे. पुन: दुसऱ्या चरणांतील विधानाचें समर्थन करणारें परमेश्वराच्या बाळपणींचें विशिष्ट उदाहरण शेवटच्या दोन चरणांत दिल्याकारणानें तेथें दुसरा अर्थांतरन्यास झाला आहे. व या सुंदर कोटिक्रमाचें पर्यवसान शेवटीं ' हे देवा, अशा रीतीनें ' आवड गोड ' हा न्याय सर्वत्र लागू असून, आपलें मूल किीहि घाणीनें भरलेलें व मलिन असलें तरी तें मातापितरांना आवडतें असें जर तुज-विषयींच्या यशोदामाईच्या आवडीवरून दिसून येतें, तर मग हा मी तुझें लेंकरूं अगदीं अपंग व अनाथ असें असून, माझा कां तूं अंगीकार करीत नाहींस ? ' अशा ध्वन्यर्थांत होत असल्यामुळें श्लोकास अनुपम चित्तवेधकता आली आहे.

२७. सहृदय अलंकारांच्या योजनेमुळें रसपरिपोष झाल्याचीं उदाहरणें येथें आणखी देत बसण्याचें कारण नाहीं. प्रत्येक वाचकास तीं सहजासहजीं वाटेल तितकीं आढ-ळून येणारीं आहेत. या बाबतींत मुख्य लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं, कल्पना व भावना हीं दोन काव्याचीं भिन्न अंगें असलीं म्हणून तीं एकमेकांस विरोधी आहेत असें मात्र नाहीं. भावनांचा उल्लास व कल्पनांचा विलास हीं दोन्ही उत्कृष्ट-काव्यांत एकत्र झालेलीं आढळतात, व काव्याचीं हीं दोन्ही अंगें पुष्कळ अंशीं एकमेकांस पूरक असलेलीं आढळून येतात. जगांतील बहुतेक पहिल्या दर्जाचे कवि या दोन्ही अंगांनीं परिपूर्ण व दोन्ही बाबतींत सारखेच सामर्थ्यवान् असलेले आढळ-तात. कल्पना व भावना हीं दोनही अंगें ज्याचे ठायीं अत्यंत उत्कर्षाप्रत गेलेलीं दृष्टीस पडतात, अशा कवींमध्यें प्रथमच निर्देश करण्यास योग्य असा आमचा कविकुलगुरु कालिदास होय. अत्यंत हृद्य अशा कल्पनाविलासाबरोबरच मानवी हृदयांतील नाजूक भावनांच्या तारा छेडून त्यांतून मधुरकोमल सूर काढणारें रसाभि-व्यक्तिचातुर्यही त्याच्या काव्यांत दिसून येतें. महाराष्ट्र कवि ज्ञानेश्वर हेही कल्पना व भावना या दोन्ही तारांवरतीं अप्रतिम करामत करून दाखविणारे अभिजात कारागीर होत. मनोहर कल्पना आणि उदात्त भावना यांचें असें कांहीं अपूर्व मीलन ज्ञानेश्वरींत झालें आहे कीं त्याचें वर्णन करण्यास सर्वसामान्य उपमा दृष्टान्त पुरे पडण्याजोगे नाहींत. ज्ञानेश्वरांनींच म्हटल्याप्रमाणें

जैसा पंचमालाप सुगंध । कीं परिमळ आणि सुस्वाद ।

अशा रीतीनें लौकिक सृष्टींत एकत्र आढळत नसलेल्या गुणांचा एकत्र समवाय

करून मगच त्याची उपमा ज्ञानेश्वरांच्या वाणीस द्यावी लागेल. अशा कालिदास अगर ज्ञानेश्वर यांच्यासारख्या सव्यसाची वाग्वीरांच्या जोडीस न बसावेत येण्याजोगे एकांगी प्रतिभेचेही कवी प्रत्येक वाङ्मयांत दिसून येतात. परंतु त्यामुळे कल्पना व भावना यांचें विरोधित्व दिसून न येतां त्या एकमेकांपासून भिन्न आहेत येवढेंच सिद्ध होतें. गीर्वाणसाहित्यांत भवभूति हा कवि केवळ भावनाप्रधान असा आढळतो तर बाणासारखे कल्पनातरल परंतु भावनेच्या बाबतींत दरिद्री असेही कवि दिसून येतात. आंग्लवाङ्मयांतही बायरनसारख्या कल्पना व भावना या दोन्ही अंगांनीं समृद्ध असलेल्या कवींप्रमाणें शेली इत्यादि कल्पनाप्रधान कवि व वर्डस्वर्थ, कोलरिज इत्यादि भावनाप्रधान कवि आढळतातच. महाराष्ट्रवाङ्मयांत पाहूं गेलें तर काव्याच्या दोन्ही अंगांत सारखेच निपुण असे कवि ज्ञानेश्वरांखेरीज तुकोबाराय, मुक्तेश्वर व मोरोपंत हेच आढळतील असें वाटतें. एकनाथांच्या काव्यांत कल्पनाचापल्यापेक्षां भावनेचें प्राधान्यच विशेष दृष्टीस पडतें. वामनपंडित तर कल्पनेच्या बाबतींत दरिद्रीच आहेत; व अनंत, आनंदतनय साम्राज्यवामन वगैरे श्लोकरचनेच्या बाबतींत वामनपंडितांचे अनुयायी कविमंडळही साधारणतः तसेंच आहे असें म्हटल्यास चालेल. नामदेवादिक प्रासादिक अभंगकारही भावनाप्रधान कवींच्या वर्गांत प्रामुख्यानें मोडणारे होत.

२८. महाराष्ट्रकवींच्या वरील वर्गीकरणांत मोरोपंतांचें नांव दोन्ही अंगांनीं परिपूर्ण असणाऱ्या कवींच्या वर्गांत दाखल केलें आहे तें थोड्याशा अवलोकनाअंतीं कोणासही पटण्यासारखें आहे. कल्पनेच्या बाबतींतले पंतकवितेचें अभिजात वैभव केवढें अपार आहे याचें सूचक दिग्दर्शन आतांपर्यंत केलेंच आहे. त्यावरून पंत हे, पोथी खाकोटीस मारून लगबग करणाऱ्या व देवळांतल्या आजीबाईपुढें तोंडाचा पट्टा सोडणाऱ्या सामान्य पुराणिकांपैकींच एक जड व मतिमंद पुराणिक नसून, अभिजात कवि होते व निसर्गदत्त कल्पनाशालिता फार मोठ्या प्रमाणांत त्यांच्या ठायीं वसत होती हें दिसून येईल. कल्पनेप्रमाणेंच भावनेचा उठाव करून रसपरिपोष करण्यांतही ते तितकेच कुशल होते. आतांपर्यंतच्या विवेचनांत कल्पनेच्या बरोबरीचें महत्त्वाचें अंग म्हणून रसाचा अनेकवार उल्लेख आला असला तरी पंतकवितेंतील व जुन्या महाराष्ट्रकवितेंतील रसाविर्भावाचें स्वतंत्र विवेचन केलेंच नाहीं. तें याच्या पुढें करून या बाबतींतील वस्तुस्थितीचें ज्ञान वाचकांस करून देण्याचा उद्देश आहे.

२९. ध्वनिप्राधान्यवादी शास्त्रकार काव्यामध्यें रसालाच आत्मा मानून अलंकारादिकांस गौण ठरवितात हें आपण मागें पाहिलेंच आहे. याच संप्रदायाचे अनुयायी व रसाला, त्यांतल्या त्यांत शृंगाराला, काव्याचें सर्वस्व मानणारे आचार्य गोवर्धन हे आपल्या आर्यासप्तशतींत म्हणतात—

रसरीतिवीतवसना प्रियेव शुद्धापि वाङ् मुदे सरसा ।
अरसा सालंकृतिरपि न रोचते शालभंजीव ॥

' अलंकाररहित परंतु सरस अशीच वाणी आनंदास कारण होते, तीच नीरस असून अलंकारांनीं खचलेली जरी असली तरी ती सजवलेल्या बाहुलीप्रमाणें आल्हाददायक होत नाहीं. ' अलंकारांचें व्यर्थत्व प्रतिपादन करण्यासाठींच लिहिलेल्या या आर्येंत आपल्या बाहावलेल्या कल्पनेचें साहाय्य घेऊन कवीनें स्वतःच समर्पक अशा दोन अलंकारांची योजना केली आहे ही मोठी पाहण्यासारखी मौज आहे. परंतु ही विसंगति, व ही विसंगति ज्यामुळें उत्पन्न झाली तें एकांतिक मताचें प्रतिपादन जर सोडून दिलें तर या गोवर्धनाचार्यांच्या म्हणण्यांत बराच तथ्यांश आढळतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. काव्यामध्यें कल्पनाविलास व अलंकार यांना जरी कितीही महत्त्व असलें तरी रसाचा पूर्णपणें अभाव असल्यास तें काव्य टाकाऊच ठरेल यांत संशय नाहीं. मानवी अंतःकरणाच्या भावनांशीं तादात्म्य पावून सुंदर शब्दांत, इतर सर्व जनांना त्यांच्याशीं समरस होतां येईल अशा रीतीनें त्यांचें वर्णन करणें हें काव्याचें एकमेव नसलें तरी एक मुख्य कार्य आहे यांत संशय नाहीं. अर्थात् ज्यांत रसोल्लास मुळींच आढळत नाहीं, तें काव्य अगदीं निकृष्ट प्रतीचें होय असा कोणीहि रसिक अभिप्राय देईल. तेव्हां पंतकवितेची व जुन्या महाराष्ट्र कवितेची योग्यता ठरवावयाची असल्यास या जुन्या कवींनीं आपल्या काव्यांत कांहीं रसनिष्पत्ति केली आहे कीं नाहीं, केली असल्यास तिचें स्वरूप एकंदरीनें कशा प्रकारचें आहे या मुद्यांचा विचार करणें अवश्य आहे.

३०. आमच्या बहुतेक सर्व जुन्या मराठी कवींची रचना भक्तिरसपरिप्लुत असते हें सुप्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम इत्यादिक प्रासादिक संतमंडळींच्या काव्यांत तर ईश्वरविषयक रतिजन्य भक्तिरस व निर्वेदजन्य शांतरस यांखेरीज दुसरा रस प्राय: आढळतच नाहीं. वामन, मोरोपंत, श्रीधर वगैरे जे भाविक परंतु प्रत्यक्ष संतमंडळींत सामील न होणारे कवि आहेत त्यांच्या काव्यामध्यें शृंगारादिक रसांचा प्रसंग विशेषीं प्रादुर्भाव झालेला आढळतो. परंतु त्या सर्व रसोल्लासामध्यें

भक्तीचें नेहमीं प्रतीत होणारें वेड्न असतें. त्यांनीं वर्णन केलेल्या सर्व कथा ईश्वर-विषयक असल्यामुळें व ईश्वराविषयीं पूर्ण भक्ति त्यांच्या हृदयांत नेहमीं वागत असल्या-मुळें त्यांच्या सर्व ग्रंथांवर परमेश्वरभक्तीची छाया एकसारखी पडलेली असते; व प्रसंग असो वा नसो भक्तिपरच उद्गार त्यांच्या तोंडांतून बाहेर पडतात. भाग-वत दशमांत एके ठिकाणीं यशोदामाता ताक घुसळीत बसली असतां तान्हा कृष्ण तिच्याजवळ स्तनपानाच्या उद्देशानें येऊन तिचें घुसळणें थांबवितो असें वात्सल्य-पूर्ण वर्णन आहे. मूळ भागवतांत—

तां स्तन्यकाम आसाद्य मथ्नंतीं जननीं हरिः ।
गृहीत्वा दधिमंथानं न्यषेधत्प्रीतिमावहन् ॥

येवढेच बालकाच्या चरित्रास शोभणारे उद्गार आहेत. परंतु पंतांना या गोष्टीचें वर्णन करितांना देखील भक्तीचा उमाळा आला आहे.

बसवी बळेंचि तीस स्तन्यार्थी देव तो धरूनि रवी ।

असें सरळ मूळाचें रूपांतर करून पुढें--

शिशुपण तिच्या न केवळ उद्धारा आमुच्याहि तें मिरवी ॥ मं. भा. १०.१५०

असे भक्तिरसाचा उद्भाव करणारे स्वतःचे उद्गार त्या वर्णनास जोडून दिले आहेत. आतां वात्सल्य व भक्ति या दोन रसांचा परस्पर विरोध नसल्यामुळें हे उद्गार येथें उत्कृष्ट शोभतात हें सांगण्यास नकोच. परंतु पंतांसारख्या भगवद्भक्तांचे भक्तिप्रेममय उद्गार कोठेंहि आले तरी ते काव्यास मार्दव व शोभाच आणितात; त्याचा विरस करीत नाहींत, ही सर्व रसिकांच्या अनुभवाची गोष्ट आहे.

३१. अगोदर मूळ भागवत हा ग्रंथच भक्तीनें ओतप्रोत भरलेला आहे. त्यामध्यें व त्याच्याबरोबरच पंतकृत मंत्रभागवत व कृष्णविजय यांमध्यें शृंगारादि नव-रसांचा आविर्भाव दृष्टीस पडत नाहीं असें नाहीं. परंतु शृंगारादि रसांचा कितीही विलास भागवतांत दिसून येत असला तरी तो नेहमीं भक्तीच्या पायावर उभार-लेला असतो किंवा सरतेशेवटीं भक्तीमध्यें परिणत होतो, हें उदाहरणें घेऊन दाख-वितां येईल. पहिलें उदाहरण कालियमर्दनाचें ( मूळ भागवत अ. १६ मंत्रभागवत १०.२७०ते २९१). कालियमर्दनाच्या कथेमध्यें भागवतकारांनीं अद्भुतरसाची वाच-कांना उत्कृष्ट मेजवानी केली आहे. परंतु तें अद्भुतरसपूर्ण वर्णन संपल्यानंतर लगेच कालियपत्न्यांनीं केलेली कृष्णाची भक्तिभावपूर्ण स्तुति सुरू होऊन एकंदर कथानकाचें भक्तिरसामध्यें पर्यवसान होतें. दुसरें उदाहरण रासक्रीडेमधील शृंगाराचें

( भा. स्कं. १० अ० २९-३३. मं. भा. १०. ३७६ ते ४०७ ). रासक्रीडेमध्यें श्रीकृष्णरूपी परमेश्वराचा व गोपींचा अप्रशस्त शृंगार भागवतकारांनीं वर्णन केला आहे असें कित्येक प्राकृतांचें म्हणणें आहे. परंतु असल्या वाचाळ लोकांस उत्कृष्ट उत्तर म्हणजे त्यांना दृष्टि जरा शुद्ध करून रासक्रीडेचा भाग वरील दोन्ही ग्रंथांतून वाचावयास सांगणें हेंच होय; रासक्रीडेचें वर्णन वाचतांना शृंगारापेक्षां गोपींच्या मधुर भक्तिभावाचीच जास्त उत्कटतेनें प्रतीति होते इतकी परमेश्वरभक्तीची दाट छाया त्या कथानकावर सर्वत्र पडली आहे. रुक्मिणीविवाहकथेचें उदाहरण तर याहूनही समर्पक आहे. ( मूळ भागवत व कृ. वि. अ. ५२, ५३. शिवाय कृ. वि. अ. ८३ पहा. ) त्या विवाहकथेचें वर्णन वाचून रुक्मिणीला, स्वपतीविषयीं अस्फुट शृंगाराचा उद्गम जिच्यामध्यें झाला आहे अशी विवाहोत्सुक प्रेममय वधू समजावी कां परमात्म्याच्या कैवल्यप्रद दर्शनाविषयीं सोत्कंठ असलेली व तन्मय वृत्ति होऊन स्वत्व विसरलेली भक्तश्रेष्ठा समजावी याचाच विचार पडतो !

अभयप्रदपदपद्मीं म्यां तेव्हां घातली मिठी घट्ट ।
घट्ट क्षणभरि झाल्यें केली स्वाभाविक त्रपा गट्ट ॥ कृ. वि. ८३. ९७

हे रुक्मिणीचे उद्गार, किंवा

चामर ढाळित पार्श्वीं विनयें प्रेमें सदा उभी राहें ।
पाहें श्रीपद, नेणें बसल्यें मीं काय कीं उभी आहें ॥ कृ.वि. ८३.१६८.
तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा ।
हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा ॥ कृ. वि. ८३.२११.

हे इतर कृष्णस्त्रियांचे उद्गार केवळ शारीरिक विषयोपभोगामध्यें पर्यवसान पावणारें पतिपत्नीविषयक प्रेम व शृंगार यांपेक्षां निष्काम भक्तिभावाचीच अधिक प्रतीति उत्पन्न करीत नाहींत काय ? वीररसाचीही तीच गोष्ट. दशमाच्या छप्पन्नाव्या अध्यायामध्यें स्यमन्तक मण्याकरितां श्रीकृष्णाचें व जांबवानाचें झालेलें युद्ध वीररसाचा प्रादुर्भाव करणारें आहे. परंतु तें युद्ध संपतें न संपतें तोंच जांबवानाला कृष्णाची ओळख पटून तो भक्तीनें नम्र होऊन कृष्णाची स्तुति करूं लागतो. अशा रीतीनें वीररसाचीही शेवटीं भक्तिरसांत परिणति होते. पंतांनीं तर कृष्णजांबवानांच्या युद्धाचें चांगलेंसें वर्णन केलेंही नाहीं. जांबवंतकृत स्तुति मात्र पृथ्वीवृत्तांत सहा श्लोकांमध्यें सुंदर वर्णिली आहे. ( कृ. वि. अ. ५६. श्लोक २९–३४. )

३२. अशा तऱ्हेनें पंतकाव्यांत जेथें तेथें भक्तिरसाचा उत्कर्ष दिसून येतो असें

वर प्रतिपादन केलें खरें. पण सगळेंच मुसळ केरांत! भक्तीला मुळीं आमच्या साहित्यशास्त्रकारांनीं रसच मानलेलें नाहीं; मग भक्तिरसाचा उत्कर्ष झाला असें म्हणण्याची गोष्ट तर दूरच. आमचे संस्कृत साहित्यशास्त्रकार शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र व शान्त असे नऊ रस मानतात हें प्रसिद्धच आहे. हे रस कसे उत्पन्न होतात याचें स्पष्टीकरण येणेंप्रमाणें आहे. रति (प्रेमाख्यश्चित्तवृत्तिविशेषः), उत्साह, शोक, विस्मय, हास, भय, जुगुप्सा, क्रोध, निर्वेद या ज्या मनुष्यामध्यें कायमच्या स्थित असणाऱ्या नऊ अंतःकरणवृत्ति त्या अनुकूल परिस्थितीच्या योगानें उद्दीपित होऊन बाहेर व्यक्त झाल्या म्हणजे त्यांस रस म्हणतात.* मनुष्याच्या अंतःकरणामध्यें वासनारूपानें स्थिर असणाऱ्या या रति, उत्साह इत्यादि ज्या नऊ भावना आहेत त्यांस प्रत्येकीं **स्थायिभाव** अशी संज्ञा आहे. वाचकांच्या मनांत बीजरूपानें नेहमीं स्थिर असणारे स्थायिभाव काव्यांतील आलंबन–उद्दीपन–विभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव यांनीं परिपुष्ट होऊन व्यक्त झाले म्हणजे रसत्वाप्रत प्राप्त होतात. अनुकूल कारणांच्या योगानें कोणताही स्थायिभाव परिपुष्ट होऊन उचंबळून आला म्हणजे अंतःकरणास जो अनिर्वचनीय असा अनुकूलसंवेदनात्मक अनुभव घडतो तो **रस** होय.¶ अर्थात् स्थायिभाव हेच रसरूपानें परिणत होत असल्यामुळें, स्थायिभावाशिवाय कोणताही रस असूं शकत नाहीं व जितके स्थायिभाव तितकेच रस असूं शकतील हें उघड आहे.

३३. आतां रति आदिकरून जे स्थायिभाव मानले आहेत त्यांत भगवद्भक्ति किंवा ईश्वरविषयक प्रेम असा स्थायिभाव जुन्या आलंकारिकांनीं मानलेला नाहीं; व जगन्नाथरायांपर्यंत जे अलीकडील अलंकारमर्मज्ञ होऊन गेले त्यांनीं जुन्यांच्या पावलावर पाऊल ठेवून भगवद्भक्तीला साहित्यशास्त्रांत शिरण्याचा जो मज्जाव होता तो कायमच केला आहे. हे सर्व विवेचक रति, म्हणजे स्त्रीपुरुषविषयक प्रेम, यालाच स्थायिभावामध्यें गणतात. इतर गुरुदेवतादिविषयक प्रेमाला स्थायिभाव न मानतां रसत्वाप्रत कधीं पोचूं न शकणारा असा कमी महत्त्वाचा भाव मानतात.§

---

* व्यक्तः स तैर्विभावाद्यैः स्थायी भावो रसः स्मृतः ॥–काव्यप्रकाश, उल्लास ४.

¶ विभाव, अनुभाव इत्यादि कारणें हीं काव्यांत प्रत्यक्ष शब्दांनींच वर्णन केलेलीं असतात. त्यांपासून जो रसानुभव घडतो तो मात्र अप्रत्यक्षपणें म्हणजे व्यंजनेनें घडतो. अशा रीतीनें रसप्रधान काव्यांत व्यंग्य प्रधान असल्यामुळें त्यास ध्वनिकाव्य म्हणतात इ० इ० विवेचन मागें आलेंच आहे.

§ रतिर्देवादिविषया व्यभिचारी तथाञ्जितः। भावः प्रोक्तः.—का. प्र. ४.

जगन्नाथरायांनीं तर त्याला 'व्यभिचारी,' म्हणजे मुख्य रसाच्या अंगभूत असणारा व क्षणकाल टिकणारा भाव म्हटलें आहे.—स्त्रीपुंसयोरन्योन्यालम्बनः प्रेमाख्यश्चित्तवृत्तिविशेषो रतिः स्थायिभावः। गुरुदेवतापुत्राद्यालम्बनस्तु व्यभिचारी ॥-रसगंगाधर. पृ. ३१-३२.

अर्थात् देवताविषयक रति, म्हणजे भक्ति, हिला स्थायिभावत्वच प्राप्त होत नसल्यामुळें ती रसाच्या पदवीपर्यंत मुळींच पोचूं शकत नाहीं हें ओघानेंच आलें. आतां भगवद्भक्तांना जि ा अनुभव घडतो अशी ईश्वररूपी आलम्बन ( आधार ) असलेली व रोमांच, अश्रुपात वगैरे अनुभावांनीं प्रतीत होणारी भक्ति रसाप्रत कां पोचूं नये व भगवंताविषयींचा जो अनुराग त्याला स्थायिभाव तरी कां मानूं नये अशी शंका येथें उत्पन्न होण्याजोगी आहे.व रसगंगाधरकारांनीं ही शंका उत्पन्न करून तिचा विचारही केला आहे. हें विवेचन संस्कृत शास्त्रकारांच्या विवेचन-पद्धतीचें एक लहानसें परंतु सुरेख उदाहरण असून इतर दृष्टींनींही मोठें उद्बोधक असल्यामुळें येथें उतरून घेतलें आहे.—

" अथ कथमेत एव रसाः। भगवदालम्बनस्य रोमाञ्चाश्रुपातादिभिरनुभावितस्य हर्षादिभिः परिपोषितस्य भागवतादिपुराणश्रवणसमये भगवद्भक्तैरनुभूयमानस्य भक्तिरसस्य दुरपह्नवत्वात्। भगवदनुरागरूपा भक्तिश्चात्र स्थायिभावः। न चासौ शान्तरसेऽन्तर्भावमर्हति। अनुरागस्य वैराग्यविरुद्धत्वात्।

उच्यते—भक्तेर्देवादिविषयरतित्वेन भावान्तर्गततया रसत्वानुपपत्तेः।

रतिर्देवादिविषया व्यभिचारी तथाञ्जितः।

भावः प्रोक्तस्तदाभासा ह्यनौचित्यप्रवर्तिताः ॥ इति हि प्राचां सिद्धान्तात्।

नच, तर्हि कामिनीविषयाया अपि रतेर्भावत्वमस्तु, रतित्वाविशेषात्, अस्तु वा भगवद्भक्तेरेव स्थायित्वं, कामिन्यादिरतीनांच भावत्वम्, विनिगमकाभावात्;—इति वाच्यम्। भरतादिमुनिवचनानामेवात्र रसभावत्वादिव्यवस्थापकत्वेन स्वातंत्र्यायोगात्। अन्यथा पुत्रादिविषयाया अपि रतेः स्थायिभावत्वं कुतो न स्यात्, न स्याद्वा कुतः शुद्धभावत्वं जुगुप्साशोकादीनाम्, इत्यखिलदर्शनव्याकुली स्यात्; रसानां नवत्वगणना च मुनिवचननियन्त्रिता भज्येत; इति यथाशास्त्रमेव ज्यायः।" रसगंगाधर. पृ. ४५, ४६.

याचा भावार्थ थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल.—

" शंका—( वर सांगितलेले नऊ ) हेच तेवढे रस असें कसें मानून चालेल ?

कारण भागवतादिपुराणांच्या श्रवणसमयीं भगवद्भक्तांच्या अनुभवास येणाऱ्या भक्तिरसाचें अस्तित्व नाकबूल करतां येणार नाहीं. भगवदनुरागरूपी भक्ति हा यांतील स्थायिभाव ( मानतां येईल ). अनुराग हा स्वभावतः वैराग्याच्या विरुद्ध असल्यामुळें या रसाचा शांतरसामध्येंही अन्तर्भाव करणें शक्य नाहीं.

'उत्तर—भक्ति, म्हणजे देवादिविषयक रति, हिचा केवळ भावांमध्यें अंतर्भाव केला असल्यामुळें ती रस होऊं शकत नाहीं. 'देवादि विषयक रति (केवल) भावरूप आहे' असाच प्राचीनांचा सिद्धांत आहे.

'शंका—तर मग दोहोंमध्यें रति ही सारखीच असल्यामुळें कामिनीविषयक रतीला देखील देवविषयक रतीप्रमाणें 'भाव' च म्हणा, किंवा भगवद्भक्तीला स्थायिभाव मानून कामिन्यादि रतींना केवळ 'भाव' माना; कारण निर्णायक कारण तुमच्याजवळ कांहींच नाहीं.

'उत्तर—असें म्हणणें बरोबर नाहीं. भरतादि मुनींचेंच वचन रसभावादिकांच्या बाबतींत प्रमाण असल्यामुळें स्वतंत्र विचारास येथें अवकाश नाहीं. नाहीं तर, पुत्रादिविषयक रतीला स्थायिभावत्व कां असूं नये किंवा जुगुप्साशोकादींना तरी केवल 'भाव' कां मानूं नये ( असे सर्वत्र फाटे फुटून ) सर्व शास्त्रामध्यें घोंटाळा माजेल; (व) मुनिवचनानें नियंत्रित केलेली रसाची नऊ ही संख्या बाधित होईल तेव्हां शास्त्रास अनुसरून असलेलें मत ( स्वीकारणें ) अधिक चांगलें होय.'

उपर्युक्त विवेचन अनेक दृष्टींनीं बोधप्रद आहे. पूज्य मानलेल्या प्राचीन शास्त्रकारांचीं वचनें म्हणजे ब्रह्मलिखित समजून त्यांच्या बाहेर होतां होईतों जावयाचें नाहीं ही जी अलीकडील संस्कृत ग्रंथकारांची प्रवृत्ति ती वरील उताऱ्यांत उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झालेली दृष्टीस पडते. स्वतंत्र रीतीनें विचार करणारे धीट गडी या काळांत आमच्यामध्यें निपजत नसत असें नाहीं. परंतु अशा अनियंत्रित भराऱ्या मारणाऱ्या लोकांच्या अमर्याद विचारांना जड दुडाच्या प्रतिष्ठित ग्रंथकारांचा चांगलाच पायबंद असे. शक्य तोंपर्यंत परंपरागत विचारसरणीच्या बाहेर जावयाचें नाहीं व जेथें फेरबदल करणें अगदींच अवश्य असेल तेथें पूर्वपरंपरेस अनुसरून अवश्य तेवढाच बदल करावयाचा अशी आमच्या ग्रंथकारांची वृत्ति दिसून येते, व हीच प्रवृत्ति जगन्नाथांच्या वरच्या उताऱ्यांत प्रकट झाली आहे. त्यांचा शंकाकार हा मूलोच्छेदी ( Radical ) व तर्कानुसारी विचारसरणीचा मनुष्य आहे. भरतादि मुनींचीं वचनें वगैरे तो कांहीं जाणत नाहीं.

त्याच्या तर्कांच्या मुसंडीच्या तडाक्यांत जें येईल त्याचा तो धुव्वा उडवणार. याच्या उलट, प्राचीन कालापासून शास्त्राची जो घडी बसली आहे तिचा उच्छेद केल्यानें सर्वत्र अनवस्था माजेल यास्तव प्राचीन मुनिवचनांना धरून चालणेंच इष्ट आहे असें पंडितराज प्रतिपादीत आहेत. पंडितरायांच्या बाजूला तर्काचें पाठबळ नाहीं. स्त्रीपुरुषांच्या प्रेमाला रस मानावयाचें व भगवद्भक्तीला ती योग्यता द्यावयाची नाहीं असा पंक्तिप्रपंच कां म्हणून? स्त्रीपुरुषांच्या प्रेमलीलांच्या वर्णनानेंच हृदय तन्मय होऊन अलौकिक आनंद होतो व भगवंताच्या प्रेमळ लीलांच्या गानानें तो होत नाहीं असें कोण म्हणूं शकेल? व म्हटलें तरी तें कोण ऐकून घेईल? परंतु जगन्नाथपंडितांना या युक्तिवादाचें काय होय! त्यांनीं स्वतः गंगालहरीसारखीं भक्तिरसपूर्ण काव्यें लिहिलीं असलीं तरी साहित्याचा शास्त्रीय वाद निघाला असतां भरतादि मुनींच्या पावलावर पाऊल ठेवून त्यांना भक्तीला रसाच्या प्रांतांत येण्यास प्रतिबंध केलाच पाहिजे!

परंतु हे भरतादि मुनि तरी असे कसे चकले? ज्यांनीं शास्त्र निर्माण केलें व अनंतकालपर्यंत अबाधित टिकावें यासाठीं शाश्वत तत्त्वावर आधारलेले नियम ज्यांनीं घालून दिले त्यांच्या हातून ही ढोबळ नजरचूक कशी झाली?—असा विचार कोणाच्याही मनांत येणें साहजिक आहे. तेव्हां रसविचारांत प्रथमपासून भक्तीला स्थान कां दिलें गेलें नाहीं याचा जरा खोल विचार करून काय निष्पन्न होतें तें पाहूं.

३४. मागें सांगितलेंच आहे कीं, रसाच्या कल्पनेचा उगम प्रथम नाट्यशास्त्रांत झाला. नाट्यशास्त्राचा प्रणेता जो भरतमुनि त्यानेंच रसांचा विचार करून प्रथम नियम घालून दिले असें नंतरचे ग्रंथकार मानतात. उपलब्ध ग्रंथांमध्यें रसाचें अगदीं प्रथम विवेचन केलेलें आढळतें तें 'भरतनाट्यशास्त्र' नामक भरताच्या नांवावर मोडणाऱ्या नाट्यशास्त्रावरील ग्रंथामध्येंच. आणि या व नाट्यशास्त्रावरील इतर ग्रंथांमध्येंच रस, त्यांचीं अंगें व उपांगें यांचें विशेष विस्तारानें विवेचन केलेलें आढळतें. तेव्हां रसाचा विचार हा प्रथम नाट्यशास्त्रामध्यें उगम पावला व तेथून पुष्कळ अवकाशानंतर त्याचें कलम अलंकारशास्त्राच्या प्रांतांत केलें गेलें. रसकल्पनेचा उगम नाटकांच्या संबंधानें झाला ही गोष्ट लक्षांत ठेवली म्हणजे पुष्कळच गोष्टींवर प्रकाश पडतो. मूळचे रस आठच होते. विक्रमोर्वशीय नाटकामध्यें (अंक २) कालिदासानें आठच रसांचा उल्लेख केला आहे. अमरकोशामध्यें आठच रसांचें

परिगणन केलें आहे. भरतनाट्यशास्त्रामध्येंही शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स व रौद्र या आठच रसांचें विवेचन आहे. तेव्हां प्राचीन काळीं रस आठच मानलेले होते हें निर्विवाद आहे. हीं आठही नांवें पाहिलीं, म्हणजे हे सर्व रस नाटकांमध्यें अभिनय, देखावे वगैरेंच्या साधनानें उद्दीपित करण्याजोगेच आहेत हें सहज लक्षांत येईल. शृंगार, वीर व करुण या रसांची खुलावट अत्यंत काव्यपूर्ण अशा वाचिक संभाषणापेक्षांही आंगिक अभिनयानें कितीतरी पट जास्त होऊं शकते हें कोणासही सहज पटण्यासारखें आहे. बाकीच्या अद्भुतादि रसांचीही तीच गोष्ट आहे. आपल्या समाजांत नाटकांचा व नाटकी लोकांचा पूर्वीपासून जो दर्जा मानलेला आहे त्यास अनुसरून केवळ सांसारिक जगांत अनुभवास येणारे असेच रस नाट्यशास्त्रकारांनीं कल्पिले होते हें उघड दिसतें. नाटकाचें वातावरणच आदिपासून अंतापर्यंत वैराग्य, भक्ति वगैरे परमार्थप्रवण वृत्तींस प्रतिकूल असतें. नाटकाचें स्वरूप अगदीं हीन झालें तर तें अचकट विचकट तमाशाच्या पायरीपर्यंतही जाऊन ठेपेल परंतु तें अगदीं उच्च झालें तरी सात्विक मनोरंजन करणारें व सामाजिक नीतीचा मनोवेधक रीतीनें बोध करणारें येथपर्यंतच त्याची मर्यादा जाऊं शकेल. ऐहिक व्यवहाराच्याही पलीकडे जाऊन केवळ परमार्थमय व शांतरसपूर्ण असें नाटकाचें स्वरूप बनूं शकत नाहीं असाच आजपर्यंतचा अनुभव आहे. अर्थात् नाट्याच्या जगांत उगम पावलेल्या रसांच्या कल्पनेंत वैराग्यभक्त्यादि भावनांस वाव नव्हता ही गोष्ट अगदीं साहजिक व समुचित कशी होती हें लक्षांत येईल. पुढें रसभावादिकांचें विवेचन साहित्यशास्त्रानें आपलेंसें करून घेतल्याबरोबर व्यापक विचारास सुरवात होऊन रसांच्या संख्येंत भर पडत चालली यावरूनही रसकल्पनेच्या संकुचिततेस नाट्यशास्त्रच कारण होतें हें दिसून येतें.

३५. रसविचाराला साहित्यशास्त्रानें मांडीवर घेतल्यावर त्याची वाढ व जोपासना सुरू झाली. नाटकाचें स्वरूप मनोविकारांस चेतविणारें, उत्तेजक असल्यामुळेंच त्याच्या विषयाला जी एक स्वाभाविक मर्यादा पडली होती तशी मर्यादा काव्याच्या साम्राज्यांत कधीं पडणेंच शक्य नव्हतें. अमुकच भावनांचा उत्कर्ष करावा व अमुक भावनांचा करूं नये असा काव्याच्या प्रांतांत कोण कोणाला निर्बंध करणार? अर्थात् सांसारिक जगांतल्या शृंगार, वीर इत्यादि भावनांबरोबरच पारमार्थिक जगांतल्या सर्वभूतात्मभाव, क्षांति, तितिक्षा, वैराग्य, भक्ति इत्यादि भावनांचीं विलसणारें

काव्यही विवेचकांच्या नजरेस येऊं लागलें; व रसाच्या अष्टविभागात्मक व्यवस्थेंत अशा काव्याची कांहीं सोय लागत नाहीं असें दिसून येतांच रसतत्वाचा शास्त्रीय व व्यापक दृष्टीनें विचार सुरू झाला. ' निर्वेदस्थायिभावोऽस्ति शांतोऽपि नवमो रसः ' असें म्हणून काव्यशास्त्रज्ञांनीं शांत या नवव्या रसाची प्रतिष्ठापना केली. भक्ति, दया, वत्सल, प्रेयान् वगैरे रस मानणारेही आणखी कांहीं आलंकारिक निघाले. परंतु हे रस कांहीं शेवटपर्यंत सर्वमान्य होऊं शकले नाहींत. रसांच्या उगमस्थानाचा जो छाप एकंदर रसविचारावर पडला तो कधींही पुसून जाऊं शकला नाहीं. हास्य, अद्‌भुत, बीभत्स हे एकंदर काव्यविस्ताराच्या मानानें अगदीं क्षुल्लक असलेले रस केवळ मुनिवचनाच्या आधारावर साहित्यशास्त्रांत काय-मचें स्थान बळकावून बसले. तर भक्ति, वैराग्य, वत्सल, या महत्त्वाच्या रसांना जगन्नाथपंडितांसारखे स्वतंत्र विचाराचे व स्वतः उत्कृष्ट भक्तिपर काव्यें लिहि-णारे रसिकही त्याच मुनिवचनाच्या मुरवतीस्तव मज्जाव करूं लागले.

३६. काव्यशास्त्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें हा विचार झाला. परंतु मानवी अंतः-करणाच्या प्रवृत्ति लक्षांत घेऊन अंतर्मुख दृष्टीनें विचार केल्यास या विषयाची दुसरीही एक उपपत्ति सुचवितां येते. शृंगार, वीर, करुण, अद्‌भुत, हास्य, भयानक, बीभत्स व रौद्र या आठ रसांच्या मुळाशीं असलेल्या भावना घेतल्या तर त्या सर्वजनसामान्य व स्वभावसिद्ध आहेत असें दिसून येईल. परस्पर सहवासापासून स्त्रीपुरुषांच्या मनामध्यें शृंगाराचा उद्‌भव होणें, आवडतें परंतु अवघड कार्य करणें असल्यास वीरवृत्तीचें स्फुरण होणें, भयानक वस्तूचें दर्शन झाल्याबरोबर भीति उत्पन्न होणें हे मनुष्यमात्राचे ठायीं अगदीं साहजिक रीतीनें दिसून येणारे विकार आहेत. हे सर्व विकार निसर्गानेंच मनुष्याच्या मनांत बीजरूपानें उत्पन्न केलेले असतात, व प्रत्येकाचे ठायीं या विकारांविषयीं एक प्रकारचें अशिक्षितपटुत्व वसत असतें. परंतु भक्ति व वैराग्य या भावना अशा नाहींत. या भावना मनुष्याच्या मनांत उत्पन्न होण्यास कांहीं एक संस्कार, पूर्वपरंपरा व परिस्थिति यांची आवश्य-कता असते. या भावना कितीही उदात्त व कल्याणकारी असल्या तरी, त्या सहज किंवा निसर्गसिद्ध नव्हेत हें कोणासही पटेल. भक्तिप्रवण मनानें जन्मांत एकदांही ईश्वरापुढें नम्र न झालेले असे लक्षावधि लोक जगांत सांपडतील.* परंतु आजन्म

* नुसतें प्रेम म्हणजे भक्ति नव्हे. त्याचप्रमाणें भक्ति म्हणजे देवाबद्दल वाटणारी भीति नव्हे किंवा सामान्य आदरही नव्हे, हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. अगदीं

एकदांही ज्याला भीति वाटली नाहीं अगर स्त्रीप्रेमानें एकदांही ज्याचें मन विकृत झालें नाहीं असा मनुष्य जगतीतलावर अत्यंत दुष्प्राप्य होय. तेव्हां यावरून मनुष्य-मात्रास सामान्य व नैसर्गिक असे जे मनोविकार तेच रसाच्या कल्पनेंत प्रथम गोवले गेले व विशिष्ट परिस्थिति किंवा संस्कार यांवर अवलंबून असलेल्या ज्या भक्ति, वैराग्य इत्यादि पारमार्थिक भावना त्या बाजूस सारल्या गेल्या अशीही उपपत्ति या बाबतींत सुचण्याजोगी आहे. भरतादि मुनींनीं बुद्ध्याहून नैसर्गिक व अनैसर्गिक असें पृथक्करण करून भक्त्यादि रसांस बाजूस सारलें असें म्हणण्याचा अर्थातच भाव नाहीं; कारण अशा तऱ्हेचा युक्तिवाद कोणींही केलेला दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. परंतु रसाची कल्पना शास्त्रीय रीत्या निश्चित करतांना साहजिकपणेंच निसर्गसिद्ध व सर्वजनसामान्य अशा विकारांकडेच त्यांचें मन वळलें असावें असें मानणें शक्य आहे. ही उपपत्ति खरोखर कारणीभूत झालेली असो अथवा नसो, रसिकांच्या व मानसशास्त्रवेत्त्यांच्या परीक्षणार्थ ती येथें निवेदन केली आहे. तज्ज्ञांच्या कडून तिचें परिशीलन होऊन तिजविषयीं चर्चा झाल्यास फायदाच होणार आहे.

३७. संस्कृत साहित्यशास्त्रकार भक्तीला रस कां मानीत नाहींत याविषयीं हा विचार झाला. महाराष्ट्र साहित्याच्या दृष्टीनें पाहतां असा विचार करण्याची कांहीं जरूरी नाहीं. सामान्यतः मराठीमध्यें आपण भक्तीचा रस म्हणून उल्लेख करतों. मराठी साहित्यशास्त्र आपण जरी संस्कृतांतून सर्व घेतलें तरी संस्कृताच्या उसनवारीस अपवाद करून त्या शास्त्रांत भक्तिरसाचा समावेश आपणास करावा लागेल या-विषयीं शंका नको. संस्कृताप्रमाणें नाट्यशास्त्राच्या परंपरेचें बंधन आपणास मुळींच असण्याचें कारण नाहीं, व भक्तीची भावना निसर्गसिद्ध आहे कीं नाहीं वगैरे वादांत तात्त्विक दृष्ट्या जरी कांहीं तथ्य असलें तरी महाराष्ट्रसाहित्याच्या प्रांतांत त्यास काडीइतकीही मातब्बरी नाहीं. कारण संतकवींच्या अपूर्व प्रभावामुळें महाराष्ट्र-वाङ्मयांत भक्ति हाच सर्वांत नैसर्गिक व पट्टाभिषिक्त रस होऊन राहिला आहे. आमच्या जुन्या कवींनीं भक्तिप्रेमाचा इतका सुकाळ करून सोडला आहे कीं,

---

रानटी किंवा संस्कारहीन माणसाच्या मनांत भक्तीची भावना नसते. संस्कारवान् समाजांतही नास्तिक किंवा अज्ञेयवादी असे अनेक लोक असतात. याशिवाय आजन्म कर्कश व्यवहाराच्या धकाडाळींत पूर्णपणें बुडून गेल्यामुळें ईश्वरविषयक विचार क्षणभरही ज्यांच्या मनास शिवला नाहीं अशा लोकांचीही संख्या या जगांत कमी भरेल असें नाहीं.

इतर रसच त्याच्यापुढें हीन व निस्तेज होऊन गेल्यासारखे भासतात. मराठी कवितेमध्यें भगवद्भक्तीचें स्थान इतकें मोठें व महत्त्वाचें आहे कीं भक्तीला रस न मानलें तर मराठींतील उत्तमोत्तम कविता बहुतेक सर्व नीरसत्वाच्या कोटींत ढकलावी लागेल. एकादे वेळेस शृंगार, हास्य, इत्यादिकांना बाजूस सारलें तर चालेल; परंतु भक्तीला ढकलून देऊन मराठी साहित्यकारांचें तरी निदान चालेल असें वाटत नाहीं.

यावें हेंचि विभो ! अभीष्टवरदा ! देवा तुझीं पावलें
चित्तीं नित्य असोत, सर्व म्हणजे या याचका पावलें ।
प्रेमें गायिन युष्मदद्भुत यशें, नाचेन युष्मज्जनीं,
पावो निर्वृति याद यादवपते ! पाथोधिच्या मज्जनीं ॥ कृ. वि. ६९.१५.

कृष्णाच्या अपार लीलांचें अवलोकन केल्यावर भक्तिप्रवण चित्तानें नारदांनीं काढलेले हे उद्गार, किंवा

तो उत्तरीय वस्त्र प्रेमभरें उडवुनी करी नृत्य ।
भृत्य प्रभुचा झाला अमित भवांत भ्रमोनि कृतकृत्य ॥ ४३
नाचे श्रुतदेव पुन्हां पूजेचा राहिला विधी अर्धा ।
गंगाधर करि तांडव, त्यासीं यासींच लागली स्पर्धा ॥ ४८ कृ. वि. ८७.

हें श्रुतदेव ब्राह्मणाच्या पूजाविधीचें भक्तीनें पाझरणारें वर्णन, किंवा

मन होंचि फार इच्छी कीं आतां सेवणें तुझे पाय ।
तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागिं होय फळ काय ॥ आर्याकेकावलि ६३.
श्रीकृष्णा ! दीनबंधो ! स्वजनसुरतरो ! पावना ! देवदेवा !
जन्मीं जन्मीं स्वलीलाग्रथनकथन हे दे मयूरासि सेवा ॥ कृ. वि. ९०. ४६.

या भक्तीच्या उमाळ्यासरशीं पंतांच्या निर्व्याज अंतःकरणांतून निघालेल्या प्रार्थना, यांच्यामध्यें व अशाच सर्व महाराष्ट्र कवींच्या शेंकडों, हजारों सद्भावपूर्ण उद्गारांमध्यें जर रसोद्गम झालेला नाहीं असें मानावयाचें, तर जगाच्या कोणत्याही उत्तमोत्तम कवींच्या उक्तींमध्यें रसाचें अस्तित्व दाखवून देणें फार कठीण जाईल असें आम्हांस वाटतें.

३८. असो. भक्तिरसाची ज्यांत छटा नाहीं असे निर्मिश्र शृंगारादि रस देखील पंतकाव्यांत कोठेंच सांपडणार नाहींत असें नाहीं. कृष्णविजयाच्या ५५ व्या अध्यायांतील मायावती व प्रद्युम्न यांची हकीकत हें एकामागून एक येणाऱ्या निर-

निराळ्या रसच्छटांचें एक सुंदर उदाहरण आहे. जन्मल्याबरोबर शंबरानें हरण करून समुद्रांत टाकलेल्या व कोळ्याच्या हातीं लागून पुनः शंबरासुराकडेच आणला गेलेल्या बालप्रद्युम्नाची हकीकत प्रथम अद्भुतरस उत्पन्न करिते. नंतर प्रद्युम्न तारुण्यांत आल्यावर मायावतीची त्यास ओळख पटून दोघांच्या प्रणयास सुरवात होते न होते तोंच मायावतीच्या तोंडून प्रद्युम्नास त्याची बालवयींची हकीकत कळल्यामुळें तो तात्काल क्रोधाविष्ट होतो व शंबराचें त्याचें युद्ध जुंपतें. येथें वाचकांस वीररसाचा अनुभव घडतो. नंतर शंबरास मारून गगनमार्गें मायावती व प्रद्युम्न द्वारकेस येतात. तेथें 'हा यदुपतिशम नरमणी' कोण हें कळल्यानंतर रुक्मिण्यादि मातांस वात्सल्याचें भरतें येतें व पुढें अध्यायसमाप्तीपर्यंत वात्सल्याचेंच पोषण होत असतें. उषाअनिरुद्धसंगमाचा ६२वा अध्यायही असाच शृंगाराच्या दृष्टीनें रमणीय वठला आहे. परंतु साठाव्या आध्यायांत पंतांनीं याहीपेक्षां बहार केली आहे. कृष्णाच्या कृतककोपयुक्त भाषणानें शोकविव्हल होऊन मूर्च्छित झालेल्या रुक्मिणीचें वर्णन व त्यानंतर सावध होऊन कृष्णाच्या अनुनयानें प्रसन्नचित्त झालेल्या रुक्मिणीचें वर्णन, हीं दोन्ही वर्णनें फार मनोरम वठलीं आहेत. ईर्ष्याजनित विप्रलंभानंतर प्रियकराच्या अनुनयानें उत्पन्न झालेल्या प्रणयाचें वर्णन फारच खुलतें आहे. मूळ भागवतांत या अध्यायांत लांबलचक व कंटाळवाणीं भाषणें आहेत. परंतु पंतांनीं परमात्मा व जगन्माता यांच्या प्रणयाचा हा प्रसंग थोडक्यांत परंतु बहारीनें व नाजूकपणानें वर्णन केला आहे.

पंतकाव्यांतल्या वीररसात्मक स्थलांचा येथें निर्देश करण्याचें किंवा त्यांतील उतारे येथें देण्याचें कारणच नाहीं. पंतांचें महाभारत किंवा मंत्ररामायणाचें युद्धकांड वाचणाऱ्यांच्या तो सहज केव्हांही लक्षांत भरण्याजोगा आहे. युद्धोत्साहाचें व रणधुमाळीचें वर्णन करितांना पंत इतके आवेशांत येतात कीं, जणूं काय ते स्वतः नुकतेच रामरावणांचें अगर भीष्मार्जुनांचें युद्ध स्वतः पाहून आले आहेत ! पंत हे पूर्व जन्मीं स्वतः कोणी तरी अद्वितीय पराक्रमशाली वीर असावेत व त्या जन्मीं त्यांची पराक्रमाची लालसा अपूर्ण राहिलेली असून ती ते या जन्मीं वीरोत्साहाच्या सळसळणाऱ्या वर्णनानें तृप्त करून घेत असावे ! एरवीं जन्मभर पुराणिकाचा धंदा करणाऱ्या या सात्त्विक ब्राह्मणाच्या काव्यांत असा अप्रतिम वीररस कर्धी उतरता ना !

शृंगार व वीर यांखेरीज इतर कांहीं रसांचीं सहज आढळलेलीं थोडींशीं उदाहरणें येथें दाखल करूं. प्रसंगीं शृंगार व वीर यांपेक्षांही प्रभावी होणारा व राती-

काचें हृदय विरघळून टाकणारा करुण रस पंतांच्या काव्यांत क्वचित् प्रसंगींच परंतु चांगल्या रीतीनें पुष्ट झालेला आढळतो. पुढील चार आर्यांचे अवतरण हें या रसाचें लहानसेंच परंतु हृदयस्पर्शी उदाहरण आहे. युद्धभूमीवर मूर्छित झालेले रामलक्ष्मण सीतेला दाखविण्यांत आले तेव्हां त्यांना मेलेले समजून सीता विलाप करते.—

हा देवर ! तुजला मीं पंचवटीमाजि गांजिलें, बापा !
न वदावें तें वदल्यें, म्हणउनि रुसलासि काय निष्पापा ? ॥ ३५५
त्रिभुवनभयहि न करिलें, स्वरत्नहरदस्यु मारिला नाहीं ।
मज टाकुनियां गेला स्वर्गाला काय न करुनी कांहीं ॥ ३५६
त्यजिलें जरि मज, तरि हें राहो, तुज विषयरुचि नसे, शांता ! ।
त्यजिली कशि धर्मता ! वृद्धा विधवेकनंदना माता ? ॥ ३५८
यापरि बाष्पजलाविलनेत्रा धात्रीसुता विलाप करी ।
त्रिजटा तेव्हां तीतें समजावी, लोचनें पुसूनि करीं ॥ ३५९ मं.रा.युद्ध.

कुंभकर्ण निजला होता. त्यास जागा करण्यासाठीं राक्षसांनीं जे दीर्घ प्रयत्न केले त्यांचें पुढील वर्णन मोठें मजेदार व हास्यरसाचें सुंदर उदाहरण आहे.

एक सहस्र महारव दुंदुभि संताडिले कितेकांहीं ।
मुद्गरमुसलें करिती ताडन परि लागती न ते कांहीं ॥ ४३६
शतसंख्याक जळाचे कुंभहि आणूनि रिचविले कानीं ।
केशोन्मूलन जालें, केले निजकंठ शुष्क हाकांनीं ॥ ४३७
चाउनियां काय बळें धांवति आंगावरूनियां, हसनी ।
मृतवन्यगजास जसे वायसगण वेष्टिती तसे दिसती ॥ ४३८
दशशत गज देहावर चालविले, ताडिला शिलाशिखरें ।
निद्रापराजयास्तव केलें त्यांहीं प्रसिद्ध युद्ध खरें ! ॥ ४३९ मं. रा. युद्ध.

अद्भुतरसाचा मासला कृष्णविजयाच्या ५५व्या अध्यायांत दिसून येतो. त्याचा मागें उल्लेख केलाच आहे. वत्सलरस तर काय पंतांच्या काव्यांत शेंकडों ठिकाणीं अत्यंत रमणीय तऱ्हेवा आढळून येतो. श्लोककेकावलि हें काव्य सर्वच सुग्धसुंदर वत्सलरसाचें उदाहरण आहे. पंत हे स्वतः वात्सल्याची मूर्तीच असे प्रेमळ पिते होते असें त्यांच्या काव्यांवरून दिसून येतें. मातापितरें व बालक यांच्यामधील दिव्य प्रेमाचें वर्णन त्यांनीं फारच स्नेहार्द्रतेनें केलें आहे.

[ २ ]

३९. आतांपर्यंत निरनिराळ्या दृष्टींनीं विवेचन करून पंतकाव्याचें स्वरूप वाचकांच्या डोळ्यांपुढें ठेवलें. काव्याचीं दोन प्रमुख अंगें जीं कल्पनाविलास व भावनांचा उल्लास तीं दोन्ही पंतांच्या काव्यांत कितपत दृष्टीस पडतात हें मुख्यतः आतांपर्यंत दर्शविलें. या दोन्ही बाबतींत पंतांची कविता किती संपन्न आहे व या संपन्नतेमुळें तिला किती मनोहारित्व प्राप्त झालें आहे हें या विवेचनावरून कोणाच्याही लक्षांत येईल. तथापि हें सर्व विवेचन बाह्य लक्षणांवरून अंतर्गत वस्तूचा अंदाज बांधावा तसें झालें. उच्च दर्जाच्या काव्याचीं सर्व लक्षणें पंतकृतींत आढळून येतात असें वर दाखविलें. अर्थातच यावरून पंतकृतीला उच्च काव्यांत गणलें पाहिजे असा सिद्धान्त वाचकांच्या गळीं बांधल्याप्रमाणें झालें. परंतु ज्या एका गोष्टीमुळें, भारतरामायणांचीं कथानकें जशींच्या तशीं उतरण्याचें भारवाहकासारखें वाटणारें काम करून सुद्धां, पंतांच्या ग्रंथांत उत्कृष्ट कवित्व प्रकट होऊं शकलें त्या गोष्टीची आतां परिस्फुटता करावयाची आहे. दूषकांच्या व आक्षेपकांच्या लक्षांत जी गोष्ट कधींच आली नाहीं व समर्थकांच्या विवेचनांतही जी गोष्ट आजपर्यंत स्पष्टपणें मांडली गेली नाहीं अशा काव्यजीवनाधारभूत गोष्टीचा किंवा तत्त्वाचा आम्हांस येथें उल्लेख करावयाचा आहे.

४०. महाभारताचें भाषांतर मुक्तेश्वरानें केलें आहे, पंतांनीं केलें आहे व अलीकडे चिपळूणकर मंडळीनेंही केलें आहे. आतां इतर दृष्टींनीं चिपळूणकरांच्या भाषांतराची जी उपयुक्तता आहे ती बाजूस ठेविली तर तें भाषांतर म्हणजे मोठा उत्कृष्ट वाङ्मयग्रंथ आहे किंवा तें फार मनोरम काव्य आहे असें म्हणणारा इरीचा लाल आजपर्यंत कोणी निघाला आहे असें दिसत नाहीं. पण हें भाषांतर अलीकडचें आहे म्हणून लोकांच्या पुराणप्रियतेस अनुसरून त्यास मान मिळत नाहीं अशी यावर कोणी कल्पना काढील. यासाठीं त्या जुन्या काळांतली पंचोपाख्यानाची बखर (पंचतंत्राचें भाषांतर) आहे तीच घेऊं. तिला शिरीं धरून वामनमयूरांच्या जोडीस बसविणारे किती वाङ्मयविवेचक आजपर्यंत निघाले आहेत? भाषांतरें कांहीं मराठींत आजवर थोडीं थोडकीं झालीं नाहींत. विशेषतः या इंग्रजी अमदानींत तर भाषांतरांचा एकसारखा तडाखा सुरूच आहे. यांपैकीं कित्येक भाषांतरें परभाषेंत उत्तमोत्तम मानलेल्या ग्रंथांचीं होतात. शेक्सपीयरच्या नाटकांपैकीं आजवर कांहीं नाहीं तरी १५।२० नाटकांचीं भाषांतरें झालीं असतील. यांतील कांहीं नाटकें चांगल्यापैकीं उतरलीं असून कांहींमध्यें स्वतंत्र कल्प-

नाशकीही थोडी बहुत प्रकट झालेली दिसून येते. मध्ये ग्रंथमाला मासिक पुस्तकांत व दाभोळकरांच्या ग्रंथमालेंत तर भाषांतरांची गर्दीच उडाली होती. गिबनचें भाषांतर करण्याचा प्रयत्न झाला. फ्रीमनचा इतिहास मराठींत आला. बर्कचा अधुनिक असंतोष मराठींत अवतरला. मिल्-स्पेन्सरादिकांना त्यांच्या भक्तांनीं मराठी पेहेराव दिला. कार्लाइलसारख्या क्रांतिकारक, ओजस्वी लेखकाच्या ग्रंथांचेंही भाषांतर करण्याचे अलीकडे प्रयत्न झाले आहेत. मग या सर्व भाषांतरबहाद्दरांना मयूरमुक्तेश्वरांच्या पंक्तीस आणून बसविण्यास काय हरकत? परंतु मयूर-मुक्तेश्वरांना एकाहून एक जाडे भक्त लाभतात व बिचाऱ्या भाषांतरांना प्रसिद्धी-नंतर कांहीं थोडक्या वर्षांनीं वास्तपुस्त करणाराही कोणी भेटत नाहीं असा प्रकार कां व्हावा?

असा प्रकार होण्याचें कारण केवळ मयूरमुक्तेश्वरांचें नशीब जोरावर आहे व इतर भाषांतरकारांचें अदृष्ट खडतर आहे, हें नव्हे. तर मयूरमुक्तेश्वरांची कृति हें खरें जिवंत वाङ्मय आहे व बाकीचीं निवळ भाषांतरें आहेत हें होय. वर्ण्यविषयाशीं तादात्म्य होऊन स्वयंस्फूर्तीनें अंतःकरणापासून निघालेले उद्गार हें वाङ्मय होय. दुसऱ्याचे विचार, दुसऱ्याच्या भावना व दुसऱ्याचा अर्थ घेऊन तो आपल्या भाषेंत उतरणें हें भाषांतर होय. असलें निर्जीव भाषांतर आमच्या मयूरमुक्तेश्वरांनीं केलेलें नाहीं.

४१.सर्व उच्च दर्जाच्या अभिजात कलेचा तन्मयता (Sincerety) हा केवळ प्राण होय असें पाश्चात्य विवेचकांचें देखील म्हणणें आहे. मनुष्यानें आपल्या श्रेष्ठ मानसिक शक्तींच्या योगानें स्वतःच्या सौंदर्यपिपासु मनाचें समाधान करण्याकरितां ज्या कला निर्माण केल्या आहेत त्यांमध्यें वाङ्मय हा सर्वांत श्रेष्ठ अशी कला होय. या वाङ्मयी कलेच्या निर्मितीस तन्मयतेची अर्थातच आवश्यकता असते. तन्मयता किंवा मनःपूर्वकता हा वाङ्मयाचा प्राण होय. विचारांनीं अगर भावनांनीं अंतः-करण भरून जाऊन अंतःप्रेरणेसरशीं ते विचार अगर त्या भावना बाहेर पाडल्या म्हणजे तें वाङ्मय होतें.

ही वाङ्मयाची उपपत्ति काव्यास तर विशेषच समर्पकतेनें लागू पडते. अंतः-करणांत उत्कट रीतीनें बिंबलेली व अंतःकरणाचा बांध फोडून बाहेर येऊं पाहणारी भावना ज्या वाङ्मयस्वरूपांत प्रकट होते तेंच काव्य होय. क्रौंच पक्ष्यांच्या जोडप्यापैकीं एकास मारलेलें पाहून वाल्मीकि मुनींस झालेला शोकच श्लोकाच्या

रूपानें बाहेर पडला अशी जी आदिकवीच्या विषयीं कथा आहे तिच्यांतील मर्म हेंच आहे. कोणताही विषय अंतःकरणांत भिनला, त्याच्याशीं मनाचें पूर्णपणें तादात्म्य झालें म्हणजे तो विषय शब्दांच्या रूपानें बाहेर प्रकट करण्याची स्फूर्ति होते. अशा स्फुरण पावणाऱ्या अंतःकरणाचे जे उद्गार तेंच वाङ्मय होय व तेंच काव्य होय. स्वतः वर्णन करणाऱ्याच्या मनाला ज्यांनीं तन्मय करून सोडलेलें असतें तेच विचार वाचणाऱ्यालाही तन्मय करून सोडतात. ज्या शब्दांमध्यें आपल्या मनाचें सामर्थ्य लेखकानें ओतलेलें असतें तेच शब्द वाचकाच्या मनाला भारूं शकतात, त्याच्या मनावर ताबा चालवूं शकतात.

४२. तेव्हां तुकारामएकनाथांना टाळकुटे किंवा मयूरमुक्तेश्वरांना भाषांतरे म्हणून त्यांची कुचेष्टा न करितां या सारग्राही दृष्टीनें त्यांच्या कृतींकडे बघितलें पाहिजे. तुकारामादि संतमंडळी एकसारखी जन्मभर टाळ कुटीत बसली असतील. पण त्या टाळकुटीमध्यें त्यांनीं आपलें अंतःकरण, आपलें सर्वस्व ओतलें होतें ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. वर्ण्यविषयाशीं त्यांचें इतकें तादात्म्य, इतकी तन्मयता झालेली होती कीं, त्यासरशीं अत्यंत करुण व भक्तिरसार्द्र असें कवन त्यांच्या कंठांतून बाहेर पडलेलें आहे. त्यांनीं हृदयाशीं धरलेल्या अखंडप्रेममय परमेश्वराच्या ठायीं

आणिक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥
विठ्ठलावांचूनी आणीक जे वाणी । नायकें मीं कानीं आपुलिया ॥
समाधानासाठीं बोलिलों हे मात । परी माझें चित्त नाहीं कोठें ॥
जिवाहूनी मज तेची आवडती । आवडे ज्यां चित्तीं पांडुरंग ॥

इतकी तदाकार वृत्ति त्यांची झाली होती. आणि या तन्मयतेचें सामर्थ्य येवढें मोठें आहे कीं, आज शेंकडों वर्षांनंतर त्यांचे उद्गार आमच्या चित्तवृत्ति हालवून टाकीत आहेत. हे त्यांचे जिवाभावाचे बोल आहेत म्हणूनच ते आमच्या जिवाशीं जाऊन भिडतात, व या कृत्रिम धडपडीच्या कालांतही अंतःकरणास समाधान व शांति प्राप्त करून देतात.

४३. जें विवेचन तुकाराम एकनाथादि संतमंडळींच्या उद्गारांस लागू पडतें तेंच भाषांतरे मानले गेलेल्या मयूरमुक्तेश्वरांच्या उक्तींसही लागू पडणारें आहे. त्यांच्या काव्यांचा विशेष परिचय करून न घेतां वरवर विचार करणारांस, त्यांनीं केवळ भारतरामायणादिकांचा तरजुमा केला आहे असें वाटण्याचा संभव आहे; परंतु खरोखर स्थिति तशी नाहीं. भारतरामायणांतल्या कथा व अनेक पुराणां-

-तल्या भगवद्भक्तांच्या कथा यांत त्यांचें मन पूर्णपणें रंगून समरस होऊन गेलें होतें. भारतरामायणांत ग्रथित केलेला इतिहास व त्यांतील अनेक अद्भुत कथा ह्या आज हजारों वर्षें आमच्या सर्व कवींच्या स्फूर्तीचा मूलाधार होऊन बसल्या आहेत.

इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ।

इदं कविवरैः सर्वैराख्यानमुपजीव्यते ।

असे प्रौढीचे उद्गार महाभारतकारांनीं स्वतःविषयीं काढले आहेत, ते सर्वस्वीं यथार्थच आहेत. शतशः धीरोदात्त पुरुषांच्या चरित्रांच्या व राष्ट्रीय विचारांच्या खाणीच असलेल्या या ग्रंथामध्यें आमचे कवि सर्वस्वीं बुडून गेले होते. त्यांचें अंतःकरण केवळ तदाकार झालें होतें. त्या भारतीय कथानकांतील, किंवा श्रीकृष्णाच्या चरित्रांतील व्यक्ति त्यांच्या डोळ्यांसमोर नाचत होत्या. तन्मय होऊन स्वतःच्या अंतःकरणवृत्तीनें श्रीकृष्णाचें चरित्र जर ते प्रत्यक्ष अनुभवीत होते तर प्रसंगविशेषीं गोपगोपींचें व यशोदामातेचें प्रेम त्यांच्या अंगीं संचरत असल्यास त्यांत काय नवल ? भीष्मार्जुनांचा तुमुल युद्धप्रसंग पंतांच्या डोळ्यांसमोर घडून येत होता व त्याचे संजयापेक्षांही उत्साही वार्ताहर ते बनले होते. भीष्मनिर्याणाचा पवित्र प्रसंग मनश्चक्षूंनीं अनुभवून त्यांचें मन आनंदोर्मींनीं भरून गेलें होतें. इतकें कीं,तो आनंद त्यांच्या मनांत मावेना ! त्या आनंदाला काव्याच्या रूपानें वाट फोडणें सरतेशेवटीं त्यांना भाग पडलें.

४४. अशा रीतीनें मयूरमुक्तेश्वरादि कवि वर्ण्यविषयांत पूर्णपणें गढून जाऊन एकतान बनले होते म्हणूनच त्यांच्या वर्णनांत एक प्रकारचा ताजेपणा, आवेश व मनःपूर्वकता आली आहे. जुन्या कथांत वर्णिलेलीं कथानकेंच जरी त्यांनीं पुनः वर्णिलीं असलीं तरी तीं अशा रीतीनें आत्मसात् करून घेऊन व स्वतःच्या अंतःकरणवृत्तींचा छाप त्यांच्यावर मारून वर्णिलीं असल्यानें त्यांस भाडोत्री तरजुम्याचें स्वरूप मुळींच आलेलें नाहीं.

काव्य करावा जित्या जिवाचें जातिवंत करणेंच हवें ।

असें एका आधुनिक कवीनें म्हटलें आहे त्याप्रमाणे आमच्या जुन्या महाराष्ट्र कवींचें काव्य हीं जातिवंत करणीच आहे. त्यांचे स्वतंत्र भक्तिपर उद्गार पहा किंवा भारतरामायणांतील कथांचे अनुवाद पहा. त्यांच्या अंतःकरणांत ज्या भावना उचंबळत होत्या किंवा त्यांच्या हृत्पटलावर जीं चित्रें उमटत होतीं त्यांचींच त्यांनीं भाषेच्या दर्पणांत प्रतिबिंब वठविलें आहे. वर्ण्यविषयाशीं झालेलें तादात्म्य

त्यांच्या वाणींत पूर्णपणें उतरलेलें दिसलें. म्हणूनच जुन्या कवींचे अभिमानी ' त्यांच्या वाणीशीं प्रत्यक्ष परिचय करून घ्या म्हणजे परपुष्टतेविषयींचे तुमचे आक्षेप आपोआप निघून जातील ' असें आव्हान आक्षेपकांना मोठ्या विश्वासानें सहज देऊं शकतात. हें तादात्म्य व ही मनःपूर्वकताच खऱ्या वाङ्मयाची खूण होय. सध्यांच्या चिकित्सेच्या काळांत जुन्या कवींच्या त्या तन्मयतेची आपणास कदाचित् कल्पनाही येणार नाहीं. सध्यांच्या सुशिक्षित समाजाची जुन्या कथांशी व परंपरागत विचारांशीं तादात्म्य पावण्याची शक्ति नाहींशी होत चालली आहे व बाहेरून आलेल्या नवीन विचारांशीं एकरस होण्याची प्रवृत्ति वाढत चालली आहे. परंतु आमच्या जुन्या कवींची अशी अर्धवट स्थिति होण्याचें कारणच नव्हतें. ते अगदीं निर्धास्त, विश्वस्तचित्त व स्थिरमति होते. त्यांचीं भाविक अंतःकरणें परमेश्वराच्या लीलांनीं व प्राक्कालीन वीरांच्या विक्रमकथांनीं गुंगून गेलीं होतीं व त्याच कथा जिवंत वाणीनें व तदाकार झालेल्या वृत्तीनें ते त्या वेळच्या श्रद्धायुक्त समाजास निवेदन करीत होते. त्यांनी वर्णिलेलीं कथानकें जुनींच आहेत म्हणून त्यांच्या वर्णनाला कांही जुनेपणा किंवा शिळेपणा आलेला नाहीं. तसें पाहिलें तर दुसऱ्याचीं कथानकें उसनीं न घेतां आपलीं स्वतन्त्र कथानकें निर्माण करणारे कवि कितीसे झाले आहेत ? आजपर्यंतच्या सर्व मोठमोठ्या कवींनी जुनी, इतरांनीं वर्णिलेलीं कथानकें घेऊन त्यांवरच आपली करामत खर्चिली असल्याचें दिसून येतें. कालिदासाच्या काव्यनाटकांपैकीं एकाही काव्याचें ( मेघदूत खेरीज करून ) अगर नाटकाचें कथानक स्वतंत्र कल्पिलेलें नाही. जी स्थिति कालिदासाची तीच शेक्सपीयर बोवांची. यांनी आपल्या नाटकांचीं कथानकें सर्व उसनीं घेतलीं आहेत. कांहीं कथानकें होलिनशेडच्या बखरींतून, कांहीं प्लुटार्कच्या चरित्रांमधून व कांहीं फ्रेंच, इटालियन, इ० भाषांतील निरनिराळ्या गोष्टींच्या पुस्तकावरून घेतलेलीं आहेत. नुसतीं कथानकें घेऊनच हे राजश्री राहिलेले आहेत असें नव्हे तर प्लुटार्कच्या चरित्रांमधून कांहीं प्रसंग व कांहीं भाषणें देखील बहुतेक शब्दशः यांनीं आपल्या नाटकामध्यें उतरलीं आहेत. मिल्टननें तर बायबलच्या जुन्या व नव्या करारांतील कथानकच आपल्या Paradise Lost व Paradise Regained या काव्यामध्यें अनुक्रमें वर्णिलें आहे, हें सुप्रसिद्धच आहे. परंतु या सर्व कवींना कोणी भाषांतरे म्हणत नाहीं कारण वर्ण्यविषयाच्या अंतरंगांत शिरून त्याच्याशीं तादात्म्य पावून त्याचें रसिकग्राह्य असें सुंदर स्वरूप. त्यांनीं वाचकांपुढें

ठेवलें आहे. मग हीच गोष्ट आमच्या मुक्तेश्वरवामनमयूरादि कवींनी केली असती ती परपुष्ट व कुचकामाची कशी ठरते हें समजणें कठीण आहे. स्वतंत्र कल्पित कथानकें रचणें हें कवित्वाचें अंग होय ही कल्पनाच मुळांत चुकीची आहे. कल्पित कथानकें रचणें ही अगदीं निराळी कला आहे. ती कादंबरीकाराच्या ठिकाणीं अवश्य आहे परंतु कवीच्या ठायीं आवश्यकच आहे असें नाहीं.

४'१. आमच्या महाराष्ट्र कवींनीं भारतरामायणांतलाच कथा आधारास घेतल्या ही गोष्ट खंती बाळगण्या जोगी झाली नसून अत्यंत योग्य अशीच झाली आहे. उलट आपल्या काव्यासाठीं स्वतंत्र कथानकें रचणें त्यांना भाग पडलें असतें तर त्यांची काव्यरचना इतकी उठावदार व इतकी सुंदर झाली नसती असेंच आम्ही म्हणतों. ' विठ्ठलावांचूनी आणीक जे वाणी । नायकें मी कानीं आपुलीया ॥ ' असें म्हणून तिन्ही त्रिकाळ हरिनामाचा गजर करणारे तुकोबा तर राहोतच परंतु काव्यनिर्मितीचा उद्देश पुष्कळ अंशीं पुढें ठेवून चालणारे जे मयूरमुक्तेश्वरादि त्यांना विधवांच्या दु:खावर एकादें करुणरस पूर्ण काव्य लिहावयास सांगितलें असतें तर काय थाट उडाला असता याची कल्पना करणें अवघड नाहीं. भारतभागवतांतील त्याच त्या कथा वर्णन करीत बसण्याच्या ऐवजीं त्या वेळच्या महाराष्ट्राच्या इतिहासाकडे लक्ष पुरवून महाराष्ट्रीय वीरांच्या अद्भुत पराक्रमांवर या कवींनीं काव्यें लिहिलीं नाहींत याबद्दल हळहळ वाटणाऱ्या रसिकांची गैरसमजूत देखील अशा तऱ्हेचीच होय. इतरांच्या प्रेरणेवरून कवि कधीं काव्यें रचीत नसतों; त्याच्या हृदयांत जें स्फुरतें तेंच काव्यरूपानें बाहेर प्रकट होतें. एकाद्यानें स्वेच्छेनें सुलक्षणी गाईचें दान दिलें असतां त्यानें घोडा कां दिला नाहीं असें म्हणून उलट त्याच्यावरच ठपका ठेवण्यासारखेंच हें राष्ट्रेतिहासप्रेमी लोकांचें रुसणें होय. शिवाजी महाराजांसारख्या राष्ट्रोद्धारक वीरपुरुषांच्या कथा त्यावेळच्या कवींच्या हृदयास उत्कटतेनें भासमान झाल्या नाहींत, त्यांत त्यांचें हृदय तन्मय होऊन गेलें नाहीं; अर्थात्च त्या कथा त्यांच्याकडून काव्यरूपानें ग्रथित होऊं शकल्या नाहींत. आतां या कथा उत्कट रीतीनें त्यांच्या मनावर न बिंबण्यास तरी काय कारणें होतीं हें पाहिलें असतां त्यांचीं प्रामुख्यानें परमार्थप्रवण बनलेलीं अंत:करणें हें एक कारण तर उघड दिसून येतेंच. त्यांचीं अंत:करणें परमेश्वरभक्तींतच मुख्यत: तन्मय होऊन गेलीं असल्या कारणानें व्यावहारिक जगांतल्या घडामोडी कितीही उदात्त वा रमणीय असल्या तरी त्या त्यांच्या मना-

वर विशेष उत्कट परिणाम करीत नसत. परंतु या एका कारणाशिवाय दुसरें कारणही महत्त्वाचें व अवश्य लक्षांत घेण्याजोगें आहे. मोरोपंतादि कवींच्या वेळेस मराठे वीरांचे पराक्रम अगदीं नवे ताजे होते. त्यांपैकीं कांहीं त्यांच्या काळाच्या पूर्वी नुकतेच घडून आले होते व कांहीं तर प्रत्यक्ष त्यांच्या डोळ्यासमोरच घडून येत होते. आणि वर्तमानकालीन, किंवा समीपवर्तिभूतकालीन वृत्तांत मनुष्याच्या मनास उत्कटत्वानें भासत नाहींत, त्यांचें सौंदर्यसर्वस्व त्याच्या डोळ्यांत भरत नाहीं, असा सामान्य नियम आहे. कोणत्याही वस्तूचें जवळून निरीक्षण केल्यास तिच्यांतील दोषच विशेष लक्षांत येतात; तिच्या सौंदर्याचा अनुभव घ्यावयाचा असल्यास दुरूनच तिचें निरीक्षण करावें लागतें. नाटक हें दिव्यांच्या झगझगाटांत दूर बसूनच अवलोकावें; अगदीं जवळ जाऊन नटांचें निरीक्षण केल्यास तोच रस उत्पन्न होईल अशी अपेक्षा कोणी धरूं नये. चित्रकारांचीं चित्रेंही विशिष्ट अंतरावरूनच पहावींत, त्यापेक्षां जवळ जाऊन पाहूं नयेत असा नियम असतो. तेव्हां या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या असतां ज्या घडामोडी पंतांच्या कालीं अगदीं निकटवर्ती होत्या किंबहुना ज्या घडामोडींमध्यें ते स्वतः वावरत होते त्यांची अद्भुतरम्यता त्यांस उत्कटत्वानें भासमान झाली नाहीं यांत त्यांचा कांहींच दोष नाहीं हें दिसून येईल. अत्यंत प्राचीन किंवा काल्पनिक कथा याच मनुष्याच्या अद्भुतरम्य भावनांचें पोषण करूं शकतात. निकटवर्ती वृत्तांतामध्यें ती अद्भुतरम्यता येऊं शकत नाहीं. आजपर्यंतच्या सर्व महाकवींचीं उत्कृष्ट काव्यें अत्यंत प्राचीन इतिहासावर व काल्पनिक कथानकांवरच रचलेलीं आहेत. तेव्हां पानपतचा वृत्तांत तर राहोच परंतु शिवाजीच्या चरित्रावरही महाकाव्य होण्याचा समय पंतकालीं आलेला नव्हता. पंत हे एक भाविक अंतःकरणाचे भोळसट पुराणिक होते (वस्तुतः ते तसे नव्हतेच) असें मानलें तरी त्यांना निरनिराळ्या विषयांवर काव्यें लिहिण्यास सांगणाऱ्या अनेक सद्गृहस्थांपैकीं एकानें तरी, सध्यां आपणास स्फूर्तिदायक व अद्भुत वाटणाऱ्या मराठ्यांच्या इतिहासावर काव्य लिहिण्यास त्यांना कां सांगूं नये? बाबा पाध्ये भर्तृहरीच्या कथानकांचें भाषांतर करण्यास सांगतात, पांडुरंगराय हरिवंश लिहिण्यास सांगतो, तर सदाशिव पाध्ये 'कृष्णामाहात्म्य' च मराठींत उतरण्याची आज्ञा करतो! तात्पर्य, त्यावेळीं घडत असलेला मराठ्यांचा इतिहास तत्कालीन समाजाच्या मनांत अद्भुतरम्य कथांच्या रूपानें बिंबलेला नव्हता असेंच दिसून येतें. शिवाय पारतंत्र्यामध्यें गढलेल्या सध्यांच्या लोकांना विरोधामुळें पूर्वीचा

हजराज्याचा काळ अत्यंत उज्ज्वल व आदरणीय वाटतो तसा त्या काळांतच वावर- णाऱ्या पंतादिकांना वाटण्याचें कारण नव्हतें. तात्पर्य पंतांचें मन ज्या प्राचीन कथां- मध्यें व विचारांमध्यें रमलें त्या कथांचा व त्या विचारांचाच त्यांनीं मनापासून एकाग्र वृत्तीनें उच्चार केला. आणि हीच गोष्ट एकंदरीनें योग्य झाली. असें ते न करते तर त्यांच्या कृति नीरस व फिक्या उतरून महाराष्ट्राच्या जिवंत वाङ्मयांत आज जें त्यांना उच्च स्थान आहे तें कधींही प्राप्त झालें नसतें. ते कांहीं धंदेवाईक ग्रंथकार नव्हते; परमेश्वरभक्तीचा किंवा वाङ्मयसेवेचा त्यांनीं व्यावहारिक दृष्टीनें धंदा चालविला नव्हता. जे विचार, ज्या भावना व जीं राष्ट्रीय कथानकें त्यांच्या मनांत दाटून बाहेर वाट शोधूं लागलीं त्यांना त्यांनीं भाषेच्या द्वारा बाहेर पड- ण्यास वाट दिली येवढेंच. हाच त्यांचा निरपेक्ष व्यवसाय होता व त्यांतच त्यांना समाधान वाटत होतें. स्वतः पंत आपल्या मनाची ही तृप्त वृत्ति पुढील सुंदर शब्दांनीं प्रकट करतात.—

सजलजलदश्यामा ! रामा ! मनीं सुख वाटतें,
चारितचि तुझें भावें गावें असें मज वाटतें ।
जनकतनयाकांता ! शांताकृते ! रघुनायका !
पुरिव सदया ! कामा या माधवा ! वरदायका ! ।।

४६. या दृष्टीनें विचार केला म्हणजे आधुनिक सुशिक्षितांमध्यें जुन्या कवितेविषयीं अनादर किंवा निदान उपेक्षाबुद्धि जी आढळते तिचें कारणही डोळ्यांना स्पष्ट दिसूं लागतें. इंग्रजी झाल्यापासून आमच्या समाजाचें अंतर्बाह्य स्वरूप एकदम विलक्षण रीतीनें पालटून गेलें आहे. समाजाचे आचार, विचार व भावना यांच्या- मध्यें आमूलाग्र क्रांति होऊन गेली आहे हें विशेष फोड करून कोणाला सांगण्याची जरूरी नाहीं. ज्ञानदेवांच्या पूर्वीच्या यादवराजांपासून इंग्रजी होईपर्यंतची ६०० वर्षांची महाराष्ट्राची परंपरा एकीकडे व इंग्रजी झाल्यापासूनची गेल्या शंभर वर्षांतील विचारपरंपरा एकीकडे अशी स्थिति झाली आहे. पूर्वीचें तें भाविक वातावरण व श्रद्धाळू विचारसरणी अलीकडच्या निदान सुशिक्षित समाजांतून तरी अजीबात नाहींशी झाली आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. जुना अनुभव, जुने विचार, जुन्या भावना या सर्व गेल्या व त्यांच्या जागीं नवीन विचार, नवीन कल्पना, नवीन आकांक्षा येऊन उभ्या राहिल्या. जुने ज्ञानाचे कांहीं मार्ग व कांहीं दिशा लुप्त झाल्या; परंतु त्याबरोबरच हजार दिशांनीं फुटणाऱ्या ज्ञानाच्या अनंत

कावांच्या वृक्षाखालीं आपण उभे आहोंत, असें दृश्य आमच्या प्रत्ययास आलें. अर्थात् जुने विचार, जुन्या भावना व जुन्या आकांक्षा टाकून देऊन आम्ही सर्वस्वीं नवीन बनलों. अशा स्थितींत जुन्या विचारांशीं संवादी असणारें व जुन्या आकांक्षांची परिपूर्ति करणारें वाङ्मय आम्हांस कसें रुचावें ? मुलास लहानपणापासून ' स्तन पाजितां निजवितां हालवितां बालकासि खेळवितां ! ' जें शिक्षण मिळावयाचें व ज्या वातावरणांत त्यानें वाढावयाचें तेंच जर सर्वस्वीं पूर्वींच्याहून भिन्न झालें तर पूर्वींच्या ज्या ज्या गोष्टी त्याच्या नजरेस येतील त्यांच्याविषयीं तिरस्कार, निदान परकी दूरी भाव तरी त्याच्या मनांत कां उत्पन्न होऊं नये ? संध्याकाळीं दिवे लागतांच हात पाय धुवून व देवास नमस्कार करून आजाआजींच्या पुढ्यांत बेऊन ' मूकं करोति वाचालं ' किंवा

गोविंदा गोपाळा कृष्णा विष्णू मुकुंद घननीळा ।
धृतकौस्तुभवनमाळा पीतांबरधारिदेवकीबाळा ।।

अशा आर्या मुग्धमधुर बोबड्या बोलांनीं मुलें म्हणत असत त्या काळीं साहजिकच सर्व समाज जुन्या कवींच्या काव्यांत रंगून जात असे. परंतु आतां मुलें पांच सहा वर्षांचीं होतांच पोक काढून व दिव्याशीं पुस्तक धरून

' एका कोळियानें एकदां आपुलें । जाळें बांधियेलें उंच जागीं ।

अशा अप्रतिम कविता वाचण्याचा जेथें त्यांच्यावर प्रसंग येतो तेथें एकंदर शिक्षण जुन्या वाङ्मयाविषयीं खरी आत्मीयता उत्पन्न करण्यास कितपत कारणीभूत होत असेल याचें सहज अनुमान होण्याजोगें आहे. तेव्हां जुन्या कवितेला नाकें मुरडण्याची प्रवृत्ति इंग्रजी झाल्यापासून सुशिक्षितांत कां उत्पन्न व्हावी याचें बीज हें आहे. आमच्या भावना व आमची मनःस्थिति इतकी पालटून गेली कीं जुन्या काव्यांतील रस व त्यांतील माधुर्य यांचा आस्वाद घेण्याचें आमचें सामर्थ्य नष्ट झालें. आम्हांला ते कवि वेडगळ, बावळट, टाळकुटे व भाषान्तरे वाटूं लागले ! त्यांच्या कवितेनें आनंद पावण्याचें सामर्थ्य आम्ही गमाविलें तेव्हां या असमर्थतेवर पांघरूण घालण्यासाठीं व स्वकीयांविषयींची आमची विमुखता लपविण्यासाठीं निरनिराळ्या सबबी काढून आम्ही त्या कवींनाच नांवें ठेवूं लागलों. ' हे कवीच नव्हेत, भाषांतरें आहेत, हे निवळ टाळकुटे आहेत, हे मूर्तिपूजक आहेत यास्तव यांचें काव्य उच्च दर्जाचें ठरण्याच्या लायकीचें नाहीं, हे मानसिक गुलामगिरींत खितपत पडलेले होते, यांचें सर्व काव्य परपुष्ट आहे,यांची प्रतिभा केवळ भारवाही होती,

यांच्या कवितेंत संस्कृत शब्द फार आहेत तर त्यांची कविता गोंधळ आहे,'* असे अनेक आक्षेप काढून आम्ही आपली नालायकी लवूं लागलों. अशा स्थितींत आमच्यापैकींच कांहीं स्वतंत्र बुद्धीचे पुरुष आमचे कान उपटणारे आम्हांला भेटले तेव्हां हा प्रकार कांहींसा कमी झाला. परंतु त्यामुळें आमच्या उपेक्षाबुद्धींत फारसा फरक पडला असें मात्र नाहीं. ही उपेक्षाबुद्धि पुष्कळ अंशानें कायमच आहे व सुशिक्षितांचा वर्ग झपाट्यानें वाढत असल्यामुळें उपेक्षाबुद्धीचें क्षेत्र दिवसानुदिवस अधिकच मोठें होत आहे. पंतवंशज रा. रामकृष्णपंत पराडकर यांनीं सर्व महाराष्ट्रभर मोठा अट्टाहास केला तेव्हां त्यांच्या समग्र पंतकाव्यप्रकाशनाच्या योजनेस जेमतेम तीन हजार ग्राहक मिळाले. पण आतां महाराष्ट्रीयांची पंतकाव्याविषयींची आस्था काय विचारावी ! पंतकाव्यांचा पहिलाच हप्ता प्रसिद्ध झाला तो

---

*अशा तऱ्हेचे सर्व शेलके आक्षेप महाराष्ट्र कवितेवर घेतलेले कोठें एकत्र पहावयाचे असल्यास वासुदेव बळवंत पटवर्धन यांचा १९०९ सालीं प्रथम प्रसिद्ध झालेला 'काव्य आणि काव्योदय' हा निबंध वाचावा. आपली संस्कृति, आपल्या राष्ट्राचा इतिहास, प्राचीन काळापासून आपल्या समाजाच्या हृदयांत दृढमूल होऊन बसलेल्या भावना, यांविषयीं फारसा खोल विचार न करितां, पाश्चात्य कवींच्यासारखी आमच्या कवींची मनोवृत्ति नव्हती व त्यांचा काव्यांत प्रकट झालेल्या कांहीं भावना आमच्या इकडील कवितेंत प्रकट झाल्या नाहींत, म्हणून आमच्या कवितेस परपुष्ट, नालायक व टाकाऊ ठरवावयाचें हा अजब न्याय आमच्या असहाय प्राचीन कवींच्या बाबतींत म्हणूनच सहन केला जातो. वर्डस्वर्थचें निसर्गाशीं झालेलें तादात्म्य व बायरनचें क्रांतिकारक वातावरण आमच्या कवींमध्यें दिसून येत नाहीं म्हणून त्यांना पांगळे, परपुष्ट, एकांगी व भारवाही असें जर म्हणावयाचें तर आमच्या वाङ्मयांतील अलौकिक भक्ति, परमार्थपरता, सर्वांभूतीं प्रेमभाव त्यांच्या कवितेंत आढळत नाहीं यासाठीं तिला विकलांग कां मानूं नये ? अत्यंत भिन्न संस्कृतीच्या दोन देशांच्या वाङ्मयांची परस्पर तुलना करून एकांतले विचार दुसऱ्यांत दिसून येत नाहींत यासाठीं त्यास हीन ठरवणें ही पद्धतीच अगोदर चुकीची होय. त्यांतून, अशी तुलना करून एखाद्यानें आपल्या देशापेक्षां दुसऱ्या देशास हीन ठरवलें तर तें दुसऱ्यास नांवें ठेवण्याच्या मनुष्यस्वभावास अनुसरून एक वेळ क्षम्य गणलें जाईल. परंतु अशी अप्रस्तुत तुलना करून तिच्यामुळें जो स्वतःलाच हीन ठरवतो त्याच्याविषयीं काय म्हणावें ?

या तीन हजारांपैकीं अवघ्या २२०० लोकांनीं नेला ! दुसरा याहीपेक्षां कमी लोकांनीं घेतला व तिसरा तर अवघ्या ७०० ग्राहकांनीं घेतला ! सर्व महाराष्ट्र-कवींच्या उद्धाराकरितां निर्णयसागर छापखान्यानें 'काव्यसंग्रह' काढला. वामनराव ओकांनीं मोठा भगीरथ प्रयत्न करून त्याच्या ग्राहकांची संख्या ६०० पर्यंत कशी बशी आणून पोंचविली. परंतु ओक वारल्यावर त्याची काय स्थिति झाली व किती हलाखीच्या स्थितींत तें उपयुक्त मासिक पुस्तक बंद करण्याची पाळी आली हें पाहिलें म्हणजे मन उद्विग्न होतें. यासंबंधीं खांबासी तुकाराम जावजी शेटजींनीं पुस्तक बंद करतांना जे हृदयद्रावक उद्गार काढले आहेत ते वाचले म्हणजे आमची उपेक्षाबुद्धि आमच्या हातून केवढे घोर अपराध करवीत आहे याची जाणीव झाल्यावांचून राहात नाहीं. "कै. ओक ह्या काव्यसंग्रहाचे संपादक असतां खास ६०० वर्गणीदार होते ते त्यांच्या पश्चात् तुटत तुटत, सध्यां २३५ वर आले आहेत; त्यांतले १९० बाहेरचे आहेत; व ४५ मुंबईतले आहेत. आणि ह्या वर्षांचे सहा महिने भरत आले आहेत तरी, ह्या ४५ पैकीं अवघ्या २ वर्गणीदारांनीं आपली वर्गणी पाठविली आहे ! हाच प्रकार बाहेर-गांवच्या वर्गणीदारांचा आहे !... आम्ही आश्रयवृद्धीची वाट पाहून पाहून दमलों आहों, आणि पैशाच्या अतिशयित घशीनें अगदीं टेकीस आलों आहों...काव्य-संग्रह पुढें चालविणें म्हणजे कसरीच्या खाद्यास भर घालणें आणि विनाकारण खर्चाखालीं येणें आहे. तें आम्हांस आतां पुरवत नाहीं. झालें तेंच अतिशयित जीवाभारी झालें आहे....अशा स्थितीमध्यें आम्ही काव्यसंग्रह बंद करण्याचा खरोखर अत्यंत दुःखप्रद निश्चय मोठ्या संकटानें केला आहे, ह्याविषयीं आम्हांस सर्व महाराष्ट्रीय रसिकजनांची सहानुभूति मिळेल, अशी आशा आहे." चार पैसे टाकून पुस्तकें नुसतीं विकत घेण्याबद्दलची ही सुशिक्षितांची आस्था ! मग तीं वाचून त्यांचें काळजीपूर्वक अध्ययन करून त्यांतील रसाचा आस्वाद घेणारे सुशि-क्षित वर्गांत किती निवळ असतील याची सहज कोणालाही कल्पना होणार आहे. ज्ञानेश्वरी, तुकोबाचे अभंग, एकनाथी भागवत वगैरे प्रासादिक ग्रंथांच्या पुष्कळ आवृत्ति निघून ते बरेच खपत असलेले दृष्टोत्पत्तीस येतात हें खरें, पण यांचे आश्रयदाते सर्व अन्न मानलेल्या समाजांतलि लोक असतात. सुशिक्षितवर्गाचा टेंभा मिरविणाऱ्या आमच्या विद्यालयीन बांधवांचें प्रमाण पाहिल्यास तें त्यांतही अतिशय थोडेंच दिसून येणार आहे. परंतु या आमच्या उपेक्षाबुद्धीबद्दल विशेष प्रमाणें दैव

बसण्याचेंही कारण नाहीं. आत्मनिरीक्षणानें ती गोष्ट प्रत्येकासच आढळून येणार आहे. विद्यालयीन अभ्यासक्रमांत झालेल्या वाचनाखेरीज प्रत्येक विद्यार्थ्यानें सर्व जुन्या कवींची मिळून ५००० तरी कविता चांगली वाचलेली असली पाहिजे तरच त्यास सुशिक्षित म्हणावें. स्वभाषेच्या अभ्यासाविषयीं ज्यास येवढी सुद्धां आस्था कृतींत दाखवितां येत नाहीं तो स्वत्व विसरून आपल्या मायभाषेशीं कृतघ्न बनला असेंच म्हटलें पाहिजे. स्वभाषेची अनास्था करून केलेली त्याची परभाषार्जिणी विद्या कशी फलप्रद होणार ?

४७. बरें, ज्यांची कास धरा असें इतक्या एकेरीवर येऊन सांगावें लागतें त्या कांहीं पारठ्या किंवा वांझ गाई आहेत काय ? तसें असतें तर जुन्या कवींची तरफदारी करणारा मनुष्य दुरभिमानी व मूर्ख ठरला असता. परंतु, त्यांचें काव्य अमृतोपम-मधुर आहे; उज्ज्वलता, सौंदर्य, अर्थगांभीर्य, उदात्तता इत्यादि गुणांत तें कोणा-सही हार जाणारें नाहीं; या गोष्टी आतां अचल आधारावर प्रस्थापित झाल्या आहेत. परंतु जगांत असें पुष्कळ वेळां घडतें कीं ज्या गोष्टी सर्वोत्कृष्ट, सर्ववंद्य म्हणून समजल्या जातात त्यांना दुरूनच नमस्कार करून बाजूला होण्याची प्रवृत्ति सर्वत्र दिसून येते. त्यांचा प्रत्यक्ष परिचय करून घेणारे फार क्वचित् व त्यांच्या अंतरंगांत शिरणारे त्याहूनही विरळा.

४८. काव्य या नात्यानें त्यांच्या उद्गारांचें सौन्दर्य अप्रतिम आहेच.परंतु आणखी एका दृष्टीनेंही त्यांची महती अलौकिक आहे. भागीरथीचें जल जसें मधुर असूनही शुभ्र आहे व शुभ्र असून पावनत्वाचा गुण त्यांत आहे त्याप्रमाणेंच आमच्या कवींची वाणी मधुर असूनही निर्मळ व पावन आहे. त्यांचें चारित्र्य निर्मळ व पवित्र, त्यांची मनें निष्कपट व प्रांजळ आणि त्यांचे उद्गार अत्यंत प्रेमळ व रसाळ आहेत. वाचकाला अधम वासनांपासून सोडवितील व त्यास उदात्त वातावरणांत संचार करावयास घेऊन जातील असे हे स्वर्गीय दूत आहेत. ज्यांची सुधारणेची बुद्धि दुसरीकडून उसनी घेतलेली नाहीं असे हे अत्यंत प्रभावशाली समाजसुधा-रक आहेत. परकीयांच्या अनुकरणाची काळी छाया जिच्यावर मुळींच पडलेली नसल्यामुळें खुरटून जाण्याचें जिला कधींच भय नाहीं अशी मनुष्याच्या उदात्त वृत्तींना सदैव स्फुरण देणारी शाश्वत तत्वांवर उभारलेली त्यांची सुधारणा आहे. आमच्या पंतांचेंच उदाहरण घेतलें तरी त्यांचें अंतःकरण किती उदार होतें व सर्वभूतात्मभाव त्यांच्या अंगीं कसा बाणला होता हें त्यांच्या काव्यांतील उद्गारां-

बरून रेखल्याप्रमाणें नजरेस येतें. खरोखर पाहिलें असतां आपल्या जातीचा, वर्णांचा व विद्वत्तेचा अभिमान अंगांत मुसमुसत असावा अशी त्यांची परिस्थिति होती. व तसा अभिमान त्यांचे ठायीं वागत असता तर तें कोणीही क्षम्यच मानिलें असतें. परंतु खरा प्रकार पाहिला तर त्याचा अगदीं उलट दिसून येतो. भारतभागवतांच्या व आमच्या संतमंडळींच्या शिकवणींत ते मुरलेले असल्यामुळें सर्वांस आलिंगन देण्यास सज्ज अशी अत्यंत प्रेमळ व निरभिमान वृत्ति त्यांची झाली होती. ईशप्रसाद होण्याच्या दृष्टीनें केवळ ब्राह्मण्य हें कसें व्यर्थ आहे हें त्यांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. हरिपदविमुख ब्राह्मणापेक्षां महार बरा असें ते स्वच्छ सांगतात—

मिरविल जरि या द्वादश सुगुणमणींचा सदा परम हार
हरिपदविमुख ब्राह्मण त्याहुनि जो भक्त तो वर महार ॥
द्विजहि प्रभुपदरेणु न वाहे जोडूनि सुगुण जो गर्व ॥
शुचि न करि आपणासहि उद्धरिल स्वकुल काय तो सर्व ॥प्रल्हादस्तुति ७,९.

ब्राह्मणजन्मामध्येंच ईश्वराविषयीं प्रेम उत्पन्न होतें इतर सर्व जन हीन आहेत, असें म्हणणें म्हणजे केवळ अन्याय आहे असें पंत आणखी ठिकाणीं सांगतात.

'हे ब्राह्मणजननींच । प्रेम शुचित्वें घडे, इतरजन नीच,' ।
म्हणतां अन्यायाची । जोडि असे; योग्यताचि अन्या याची ॥ १०९ ॥
हेतु महत्वा चरण—।—प्रसाद हरिचा; तयास जात्याचरण ।
ज्ञानहि न हेतु; भजन । प्रभुचें केवळ, तदिच्छु सर्व शुभजन ॥ १११ ॥कृ.वि.४७.

'महत्व प्राप्त होण्यास श्रीहरीचा प्रसादच कारण आहे त्याला जातिधर्माचें आचरण अगर ज्ञान हें मुळींच कारण नाहीं' असें वरच्यापैकीं दुसऱ्या आर्येत सांगितलें आहे. वस्तुत: हीं मतें म्हणजे कांहीं असामान्य आहेत असें नाहीं. परंपरागत जातिनिर्बंध समाजव्यवस्थेसाठीं पाळावयाचे, उच्चनीचतेचा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं अशीच भावना आमच्या समाजांतील समंजस लोकांची पूर्वीपासून चालत आलेली आहे. भागवतकारांची शिकवण तर याहीपेक्षां उदारतेची आहे व पंत हे तिचेच चेले असल्यामुळें त्यांनीं असे उद्गार काढावे यांत विशेष कांहींच नाहीं. परंतु या साध्या गोष्टी देखील सध्यां मुद्दाम नजरेस आणून द्याव्या लागत आहेत. भागवतधर्मात रंगलेल्या पंतांच्या ठायीं भूतदयाही रोमरोमीं भरलेली असेल हेंही सांगावयास नको. एकच उदाहरण देणें बस होईल.

वसतो आत्मा, यास्तव सर्वा भूतीं दया करा नमुनी, ।
करिति उपाया इतरा सुखवाया या दयाकरा न मुनी ॥
ते योगयाग रुचति न, भूतदया हे जसी रुचे हरिला, ।
प्रभु तुष्ट इणें होतां, अर्थ कवण जड जना ! मनीं धरिला ? ॥ ७.८१,८२.

अशा विभूतींचें अंतःकरण कोमल, प्रांजळ व आरशासारखें निर्मळ होतें हें काय सांगावयास पाहिजे ? त्यांचें अंतःकरण बालकाप्रमाणें निष्कपट असूनही पोरकट नव्हतें, स्त्रीप्रमाणें भावनावश असून चंचळ नव्हतें, व यतीप्रमाणें उदास असूनही रुक्ष नव्हतें. ज्या भावनेनें त्यांचें हृदय व्याप्त झालें होतें ती त्यांनीं अगदीं मनापासून हृदयांच्या उमाळ्यासरशीं बोलून दाखविली. त्या एका भावनेनें त्यांचें हृदय कसें विरघळून टाकलें होतें हें पुढच्यासारख्या शेंकडों उद्गारांवरून दिसून येतें.

बा उद्धरीं मला, मी पापी, लटकेंचि कोण निंदुनि घे ।
मिथ्या दुःख मिरवितां, नेत्रांतुनि काय अश्रुबिंदु निघे ? ॥

४९. हें आमचें वाङ्मय निष्क्रियतेला व आळशीपणाला पोषक होणारें आहे, ही समजूतही व्यर्थ आहे. आमच्या संतकवींनीं, अर्थात् पंतांनींही, आपल्या काव्यांत शांति, समाधान, विरक्ति यांचा प्रसाद आम्हां महाराष्ट्रीय जनांवर उधळला आहे. त्याला तें कदान्न आहे म्हणून भिरकावून देणें युक्त होणार नाहीं. आमच्या कवींनीं उपदेशिलेली शांति म्हणजे सुस्तपणा नव्हे, समाधान म्हणजे दुबळेपणा नव्हे किंवा विरक्ति म्हणजे भोगांचा केवळ बाह्यतः त्याग नव्हे. खरें समाधान व खरी विरक्ति, उद्योगपरतेला, पराक्रमाला विरुद्ध असते ही समजूतच चुकीची आहे. उलट अधम वासनांपासून मनाची मुक्तता झाली अंतर्यामींची खळमळ शांत झाली व विरक्त होऊन बुद्धि निःसंग बनली म्हणजेच कर्तृत्वशक्तीला स्फुरण येतें. आजपर्यंत जे जे प्रचंड उद्योग करणारे लोकहितकर्ते होऊन गेले त्यांच्या उद्योगाची प्रभा त्यांच्या विरक्ततेनें, समाधानी वृत्तीनें व निरपेक्षतेनें वाढविलीच होती, कमी केली नव्हती असें दिसून येतें. आमच्या वाङ्मयाचें कार्य

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः

अशा तऱ्हेचे सात्विक कर्ते निपजविण्याचें आहे. तें कार्य त्यानें एकदां केलें. आपण त्याची कास धरूं तर पुनःही करील यांत संशय नाहीं.

समाप्त.

## परिशिष्ट १. कृष्णविजयाच्या कच्च्या प्रतींतील दुबार रचलेलीं पद्यें व इतर पाठभेद. ( मागें पृ. १५७, १५८ पहा. )

१. पुढील आर्यागीति कृष्णविजयाच्या कच्च्या प्रतींत चोपनावा अध्याय संपल्यानंतर त्याच्या पुढेंच त्यांतील आर्यांचा क्रमांक पुढें चालू करून पंतांनीं लिहिलेल्या आहेत. या आर्यागीतींतील मजकूर कृष्णविजयाच्या ५५ व्या अध्यायांतील आहे. प्रसिद्ध असलेल्या श्लोकबद्ध ५५ व्या अध्यायाच्या पहिल्या ७ श्लोकांतील मजकूर या ८ आर्यांत आला आहे. ते श्लोक सर्व लांब लांब वृत्तांतील आहेत. ते या आर्यांशीं ताडून पाहिले असतां त्यांतील वर्णन कसें अधिक भरदार, विस्तृत व प्रौढ झालें आहे हें दिसून येईल.

रुद्रनयन शिखिजग्ध–। स्वाकृति पूर्वींच जो रतीश्वर दग्ध ।
तो ये श्रीच्या पोटा, । सौंदर्याचा न आकरीं ज्या तोटा ॥ ४९ ॥
वैदर्भीचा काम । स्वसुत प्रद्युम्न हें जयाचें नाम ।
त्रिभुवनचित्तहर गुणा–।–मृतनिधि लक्ष्मीपतीहुनी तो न उणा ॥ ५० ॥
सूतींतचि त्या कामा । जाणुनि रिपु, कामरूप शंबर नामा ।
असुर सुमंदमति हरी, । स्वार्थास्तव मायलेंकरां विघड करी ॥ ५१ ॥
उरला जळतां रुद्र–।–कोपज्वलनांत जो तया हा क्षुद्र ।
शंबर देवसपत्न । स्वबळें मारावयासि करितो यत्न ॥ ५२ ॥
त्यजिला बाळ समुद्रीं । कैंची सुमति त्रपा त्या क्षुद्रीं ? ।
पडतांचि तया पीनें । गिळिलें रत्नाकरोदरस्थित मीनें ॥ ५३ ॥
जेणें केला बाळ । ग्रास तयासकट अन्य मीनहि जाळ ।
पसरुनि धीवर धरिती । आश्चर्य स(म)स्त मत्स्य पाहुनि करीती ॥ ५४ ॥
भेटविला दाशांहीं । तो त्या असुरास तत्प्रसादाशांहीं ।
केला सूदाधीन । प्रेक्षुनियां शंबरेंहि अद्भुत मीन ॥ ५५ ॥
रांधाया जो मासा । चिरिती शस्त्रें महानसीं तो मासा ।
त्याच्या उदरीं बाळ । प्रकटे मेघोदरीं जसा ग्रहपाल ॥ ५६ ॥

२. कच्ची प्रत—सर्वें मूर्ख लोक प्रभुस म्हणती, दृष्टि निवळा ।
नसे ज्यांची त्यांला धवळहि दिसे चंद्र पिवळा ॥
पक्की प्रत—सर्वें मूर्ख लोग प्रभुस म्हणती, दृष्टि निवळे ।
न ज्यांची त्यां रोग्यां दिसति दरदुग्धेंदु पिवळे ॥ कृ. वि. ६१. २.

१. कर्मा प्रत—' मोहातें न धरीं,' म्हणे प्रभु तया, ' पुत्रा गृहस्थाश्रम ' ।
पक्की प्रत—हांसोनि प्रभु त्या मुनिप्रति म्हणे,' पुत्रा गृहस्थाश्रम ' ॥

कृ. वि. ६९. ३२.

---

## परिशिष्ट २. पंतांची कांहीं अप्रसिद्ध भागवती कविता.

मागें पृ. २५ वर पंतांच्या स्फुट भागवती प्रकरणांची जी यादी दिली आहे त्यांपैकीं ४ कलिगौरव, ८ प्रल्हादविरचित भगवत्स्तुति व १५ सुदामकथेवरील स्फुट साक्या हीं तीन अजून अप्रसिद्ध आहेत. यांतील प्रल्हादकृत भगवत्स्तुति बरीच विस्तृत असल्यामुळें ती येथें देण्याचा बेत स्थलाभावास्तव रहित करणें प्राप्त झालें आहे. बाकीचीं दोन खालीं दिलीं आहेत.

१. ' **कलिगौरव.** ' या प्रकरणाला हें नांव पांगारकरांनीं दिलें आहे व त्यांनीं आपल्या पुस्तकांत यांतील तीन श्लोक उद्धृतही केले आहेत. ( मो. च. पृ. ३९४ ). वस्तुत: हें प्रकरण म्हणजे भागवतांतील

प्रसंगमजरं पाशमात्मन: कवयो विदु: ।
स एव साधुषु कृतो मोक्षद्वारमपावृतम् ॥ भा. ३. २५. २०.

या श्लोकावर टीका करण्याचा प्रथम उद्देश धरून लिहावयास सुरवात केल्यानंतर जे विचार मनांत स्फुरत गेले ते ग्रथित करून बनलेली रचना होय. मूळ श्लोकाचा अर्थ पंतकृतींतील पहिल्याच श्लोकामध्यें संपूर्ण आलेला असून पुढे पंतांनीं स्वयंस्फूर्त अशीच रचना केल्याचें दिसून येतें. मुळांत कलीचा उल्लेखही आलेला नसून पंतांनीं आपल्या कृतींत कलियुगाचेंच महात्म्य मुख्यत्वेंकरून वर्णन केलें आहे. तेव्हां पांगारकरांनीं दिलेलें नांव या दृष्टीनें युक्तच आहे असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रसंगमिति० ॥ टी० ।—

ज्ञाते जे ते म्हणति विषयीं स्त्र्यादिकीं जो प्रसंग
तो तों साक्षाच्छमनकरिंचा पाश कंठीं अभंग ।
तो साधूंच्या चरणकमळीं योजितां शुद्ध भावें
कैवल्याचें प्रकट उघडें दार होय स्वभावें ॥ १ ॥

म्हणतसे जन काकरभाजन । प्रकट हा कलि पातक भाजन ।
परि गुणज्ञ रसज्ञ सभाजन । करिति या कलिचेंचि सभाजन ॥ १ ॥

कलीमाजि या पाहती यावि सारा । घडे विष्णुच्या कीर्तनें त्यावें सारा ।
भवाब्धी तराया न लागे प्रयास । स्वयें शांति दे दर्शन क्षिप्र वास ॥ २ ॥

तेचि या कलियुगांत कृतार्थ । स्तुत्य ते नर सभाग्य यथार्थ ।
रामनाम सतत स्मरणारे । येथ सादर जना करणारे ॥ ३ ॥

स्वयें स्मरति सर्वदा हरिसि, आणिखालाहि जे
स्मरा म्हणति, साधनें कलि तया सुखा लाहिजे ।
मुकुंदजनकीर्तनीं रुचि जनास हे लाविती
सभाग्य किति ते म्हणों सुख तदीच हेलाविती ॥ ४ ॥

कळी या दोषांचा निधि, परि गुणज्ञीं निवडिला
असे येथें मोटा गुण, विगुण जेणें दवडीला ।
सुखें तारी सर्वां त्वरित हरिचें कीर्तन खरें
तुटेना वज्रें तो सहज तुटतो बंध नखरें ॥ ५ ॥

कृतीं विष्णुध्यानें करुनि दुसऱ्यामाजि यजनें
तिज्या ठायीं साधे उचितपरिचर्याख्य भजनें ।
अनायासें लाभे स्वपद हरिसंकीर्तनरता
कळीमध्यें ज्ञाते सकळ म्हणती धन्य नरता ॥ ६ ॥

## २. सुदाम कथेवरील स्फुट साक्या—( पृ. २७ पहा. )

( १ ) श्रीकृष्णानें केलेल्या सत्काराचें सुदामानें केलेलें वर्णन—

धांवत आला सामोरा तों बहु दूर श्रीजानी हो ।
धरिलें मजला हृदयीं स्त्रीकुचकुंभसुभग भुजानीं हो ॥ १ ॥
झालों धन्य भुवनीं जाये हो । लोकीं मुख न समाये हो ॥ ध्रु० ॥
स्वकरें माझे चरण क्षाळुनि त्या अवनेजनपाथा हो ॥
गंगाजनकपदांगुष्ठानें ओढविला निजमाथा हो ॥ २ ॥
कथिलें गुरुकुलवृत्त कथा बहु वदला स्वमुखें गोडा हो ॥
तुळितां त्याशीं अमृत रसातें तेथ मधुरिमा थोडा हो ॥ ३ ॥
मी लज्जेनें न दिले मग ते आपण शोधुनि पोहे हो ॥
भक्षुनि जाला फार सुखी तो प्रभु, परि उद्गत नोहे हो ॥ ४ ॥
नीजविलें मज निज पर्यंकीं केली स्वकरें सेवा हो ॥
पावित येउनि आज्ञा देतां रोदन आलें देवा हो ॥ ५ ॥

धर्मशास्त्र, वैद्यशास्त्र वगैरे अनेक शास्त्रांमध्यें त्यांची चांगली गति झालेली असल्यानें त्यांनीं त्या त्या शास्त्रावरील स्वहस्तानें लिहून घेतलेल्या अनेक ग्रंथांवरून स्पष्ट होत आहे.... पंतांच्या अंगीं पांडित्य आणि शास्त्रज्ञत्व वसत नव्हतें, असें म्हणण्याचें धाडस कोणीही करणार नाहीं. ' पराडकरी आवृत्ति, आर्याभारत, उपोद्घात पृ. ६७–६९.

५. परंतु या पोकळ स्तुतींतील खरा प्रकार पराडकरी आवृत्तीच्या संस्कृत काव्याच्या खंडास उपोद्घात लिहिणारे श्री. परशुराम लक्ष्मण वैद्य यांनीं चांगलाच चवाठ्यावर आणला आहे. त्यांचा दहा पानांचा संस्कृतांत लिहिलेला उपोद्घात पोकळ स्तुति व निराधार निंदा या दोन्हींपासून अलिप्त असून निर्भीडपणानें लिहिलेला एकंदरीनें वाचनीय आहे. पंतांच्या विद्वत्तेस व संस्कृतप्रावीण्यास अनुलक्षून त्यांनीं काढलेले उद्गार पुढें दिले आहेत:—

' गीर्वाणकाव्येषु तु बहव एव प्रयोगा आर्षाश्चापाणिनीयाश्च कविनानुकृताः। किन्तु मंत्ररामायणे प्रयुक्तान्यपाणिनीयानि प्रायः सर्वाण्यपि रूपाण्यार्षाद्रामायणात्तथैवोद्धृतानीति नात्र विषये कविरयं दोषभाग्भवितुमर्हति ।...... **किन्तु स्फुटकाव्येष्वेवंविधानामपशब्दानां प्रयोगः कवेरस्य दोषभागितां समाविष्करोतीति मनुमहे** । न हि तादृशानि रूपाणि केनाप्यभियुक्तेन कविना प्रयुक्तपूर्वाणि ।...किन्तु 'वत्स्यन्तु, गृहीतुकामः, गृहीतुम्,' इत्यादयः प्रयोगा नैव तत्राप्युपलभ्यन्त इति निवेदयामः ।

' **यद्यपि शब्दशास्त्रन्यायनयाध्ययने नैव सन्ति प्रमाणानि** तथापि साहित्यवेदान्तशास्त्रेष्वस्य परिचयः सर्वत्र स्फुट एव सूक्ष्मदृशां सुधियाम् । **गैर्वाण्यां यद्यपि कवित्वमस्य संशय्यते** तथापि महाराष्ट्र्यां कविप्रथमपद्धतिमयमेवावातारयदिति नात्र केषामपि विशयस्यावसरः ।...... अन्ततश्चेदमवश्यं प्रतिभासते विज्ञाप्यं वाचकमहाभागानां यद्यपि नायं मयूरो गैर्वाण्यां महाकविपदवीमर्हति तथापि नैतावतायं जनो विदुषां मानार्हो न भवतीति । '

भावार्थ—' संस्कृत काव्यांमध्यें पुष्कळच आर्ष व अपाणिनीय प्रयोग या कवीनें केले आहेत. मंत्ररामायणांतील अशा तऱ्हेचीं बहुतेक सर्व रूपें वाल्मीकिरामायणांतून घेतलीं असल्या कारणानें त्या बाबतींत कवीला दोषभाक् मानतां येत नाहीं. ... परंतु स्फुट काव्यांमधील असल्या अपप्रयोगासंबंधानें मात्र हा कवि दोषी ठरतो असें आम्हांस वाटतें. कारण तशा तऱ्हेचीं रूपें कोणत्याही अभियुक्त

कवीनें पूर्वी योजिलेलीं नाहींत. ... तथापि ' वत्स्यन्तु, गृहीतुकामः, गृहीतुम्' इ. प्रयोग तेथेंही (वाल्मीकिरामायणांतही) आढळत नाहींत, हें सांगणें अवश्य आहे.

' जरी व्याकरण, न्याय इ० शास्त्रांच्या अध्ययनाविषयीं प्रमाणें नाहींत तथापि साहित्य व वेदान्त या शास्त्रांशीं असलेला ( पंतांचा ) परिचय सर्वत्र स्पष्ट दिसतो. संस्कृतांतील याच्या कवित्वाविषयीं संशय घेण्यास जरी जागा असली तथापि मराठींत ह्यानें उत्कृष्ट कवित्व केलें ह्याविषयीं कोणासही संशय घेण्यास जागा नाहीं.... सरतेशेवटीं वाचकांना आम्हांस निवेदन करावेसें वाटतें तें येवढेंच कीं, हा मयूर संस्कृतांत महाकवींच्या पदवीवर बसण्यास जरी योग्य नसला तथापि त्यामुळें तो विद्वानांच्या आदरास पात्र होत नाहीं असें मात्र नाहीं. मराठी भाषेंतील याचें कविधुरीणत्व सर्वांसच मान्य होण्याजोगें आहे. '

या वचनांचा आहेर आम्ही परांजपे पांगारकर प्रभृतींस करतों.

पंतांच्या वैद्यकशास्त्राच्या ज्ञानाविषयींही अशीच एक किंवदन्ती पांगारकर-प्रभृतींनीं पसरून ठेविली आहे. पंतांच्या उपलब्ध ग्रंथांतून अगदीं क्वचित् वैद्यक-विषयक उल्लेख आढळतात. परंतु ते अगदींच सामान्य व सर्व प्रसिद्ध गोष्टींचे असतात. जुन्या काळच्या प्रत्येक घरंदाज गृहस्थास सामान्य व्याधींचें व उपचारांचें अनुभवसिद्ध असें बरेंच ज्ञान असे. याहून वैद्यविद्येशीं पंतांचा अधिक दाट परिचय होता असें मानण्यास कांहींच आधार नाहीं.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध. | पृष्ठ | ओळ | शुद्ध | अशुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १९ | साग व | सांगावें | ४४ | २ | | [illegible] |
| ३ | ७ | हेईना | होईना | ,, | २३ | सतद्वीपा | सप्तद्वीपा |
| ,, | २३ | अख्यानांत | आख्यानांत | ४५ | १८ | आलले | आलेले |
| ६ | २ | बाहींच्या कांहींच | कांहींच्या- | ,, | २६ | पंचाध्य यी | पंचाध्यायी |
| | | | बांहींच | ४६ | १२ | ( स्कंध ९. | ( स्कंध ९ ). |
| ७ | २ | वंश वळीचा | वंशावळीचा | ७० | १२ | आह | आहे |
| ,, | ५ | अपटे | आपटे | ,, | १८ | दया दावी | अनुग्रह दावी |
| ,, | ७ | मता तांचा | मतामतांचा | ७१ | ५ | झली | झाली |
| ,, | २० | अहे | आहे | ,, | ७ | आणिलें | आणिलें. |
| ,, | ,, | दखविण्यांत | दाखविण्यांत | | | पुत्रशोकनें | पुत्रशोकानें |
| | | अलें | आलें | ७२ | २० | सध्या | सध्यां |
| ८ | २० | पुकरा केल | पुकारा केला | ,, | २५ | म्हणऊनि | म्हणउनि |
| ९ | ८ | झला | झाला | ७७ | ९ | लावण रें | लावणारें |
| १० | १९ | फिरविला | फिराविली | ८० | १ | म नानें | मानानें |
| ११ | ११ | स धारणपणें | साधारणपणें | ८२ | २३ | भकियोग | भक्तियोग |
| १२ | १२ | न थांचे | नाथांचे | ८४ | १३ | सपत्नुदि | सपत्न्युदि |
| ,, | २५ | लैहिले | लिहिलें | ,, | १४ | स्तप्से | स्तपसे |
| १३ | २७ | सव | सर्व | ,, | २५ | अर्गवतो | अर्णव तो |
| १४ | ६ | घ लण्याची | घालण्याची | ,, | २६ | वर्णव तों | अर्णवतो |
| ,, | १८ | अवतारा मध्यें | अवतारांमध्यें | ८६ | ८ | अहे | आहे |
| १७ | २३ | भावेच | भावेचें | ८७ | १७ | उद्रव | उद्धव |
| २३ | १० | मंत्रमागवतची | मंत्रभाग- | ९३ | १ | वन:स्थलीं | वनस्थलीं |
| | | | वताची | ,, | १९ | अहे | आहे. |
| ,, | २३ | श्लाकांचा | श्लोकांचा | ,, | २४ | सा ति | प्रसूति |
| २५ | २४ | यादीं | यादींत | ९४ | ६ | शिरश्च्छेद | शिरच्छेद |
| ३१ | १ | फसल | फसले | ९५ | २७ | टोंकन | टोंकून |
| ३२ | १९ | तपसुन... | तपासून... | ,, | २९ | जाय | ध्रुव जाय |
| | | फेबुवारी | फेब्रुवारी | १०५ | ६ | सद्भावपुण | सद्भावपूर्ण |
| ३४ | ११ | होय | होय. | १०९ | २७ | मुत्तमंम् | मुत्तमम् |
| ४२ | २ | त | तें | ११० | १२ | ब्रम्ह | ब्रह्म |
| ,, | ५ | होतो | होतें | ११४ | २८ | मन्वतरांचें | मन्वंतरांचें |
| ,, | २८ | जाहे | आहे | ११५ | २७ | मोलकरीसे | मोलकरीसे |
| ४३ | २३ | प्रथांतील | ग्रंथांतलि | १२१ | १७ | उत्तरावात | उत्तरार्धांत |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १२२ | १४ | मुळ स | मुळास | १६० | १६ | चालल | चालले |
| १२५ | २४ | जन्म दिनीं | जन्मदिनीं | १६१ | २४ | नसें तार्टी, | असे, तार्टी |
| १२७ | ७ | इतरत्र; | इतरत्र. | १६२ | २३ | सेन्द्र न्विबुध० | सेन्द्रान्विबुधा० |
| ,, | ८ | एकोणिसाव्या; | एकोणिसाव्या | | | | |
| १२८ | ३ | वागर्थ विव | वागर्थाविव | ,, | २४ | नापशोभनः | नोपशोभनः |
| १३० | २९ | तीथा | तीर्था | ,, | २९ | केलल्या | केलेल्या |
| ,, | ,, | सधुनी | साधुनी | १६३ | ८ | स्व मींबरि | स्वामींबरि |
| १३४ | ८ | त रा | तारा | १६३ | १५ | आह | आहे. |
| ,, | ११ | म गें | मागें | १६४ | १७ | दलें व | दिलेंच |
| १३५ | १८ | तो | ती | १६५ | २० | पहूं | पाहूं |
| १३७ | २ | विस्तर | विस्तार | १६६ | ४ | सख्येच्या | संख्येच्या |
| १३९ | १५ | केलला | केलेला | ,, | ५ | वत्तांतील | वृत्तांतील |
| ,, | २१ | काव्यकल्पनाचें | काव्य-कल्पनांचें | १६७ | २४ | आहे | आहे. |
| | | | | १६८ | १८ | म्ल यता | म्लायता |
| ,, | २५ | द्दवलच्या | बद्दलच्या | १६९ | ११ | परिशिष्ट १ | परिशिष्ट २ |
| ,, | २८ | कला | केला | ,, | १८ | प्रस्तुत सुदम | प्रस्तुत सुदाम |
| १४१ | १४ | (१२, २५) | (१२,१५) | १७० | १८ | उद्गर | उद्गार |
| ,, | २४ | कृतभू० | हृतभू० | १७४ | ८ | वसुदेवनें | वसुदेवानें |
| १४२ | ११ | करुनी | करुनि | ,, | २४ | हाती | होती |
| १४७ | १० | शुद्र | शुद्ध | ,, | २८ | अ र्पी | अर्पी |
| १५० | २९ | वंदावनां | वृंदावनां | ,, | ,, | के मळ | कोमळ |
| १५३ | ६ | स्वगोपुलम् | स्वगोकुलम् | ,, | ,, | मंजरीमाला | मंजरीमाळा |
| १५७ | २ | शिरते | शिरतें. | १८३ | २२ | द्वारकानाशाच | द्वारकानाशाचें |
| ,, | ८ | आहातच | आहेतच | १८४ | २ | आतुला | अतुला |
| ,, | १० | खडयंवर | खड्यांवर | १९० | १६ | नाहीं | नाहीं. |
| ,, | १२ | लिहिलला | लिहिला | १९१ | १४ | उपलब्ध | उपलब्ध |
| ,, | १७ | सहा | आठ | ,, | ,, | शोधक | शोधक |
| ,, | १८ | लिहिण | लिहिणें | १९२ | २४ | आहे | आहे. |
| ,, | २१ | छपील | छापील | ,, | २९ | येते | येते. |
| ,, | ,, | लालाट | ललाट | १९४ | १४ | प्रतिमेचें | प्रतिभेचें |
| ,, | २६ | ६ | ८ | ,, | २१ | म्हणून | म्हणवून |
| १५८ | ५ | ६ | ८ | ,, | २३ | लागला | लागली |
| ,, | ८ | प्रतींताल | प्रतींतील | १९७ | १० | दूरापास्तवं | दूरापास्तत्व |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १९७ | ११ | and | for | २८० | १४ | प्रबंधच्या | प्रबंधाच्या |
| १९९ | २२ | स धु | साधु | २८१ | ६ | °सन्मनी | °सन्मनीं |
| ,, | २५ | पन्हाळगडचिें | पन्हाळगडींच | ,, | ७ | दोषपारा | दोषपरा |
| ,, | २६ | ह | हा | २८५ | ३ | मुडतां | मुरडतां |
| २०० | २० | आहे | आहें | ,, | २१ | पूर्वांवांखेरीज | पूर्वांखेरीज |
| २०२ | १८ | दिसते | दिसते. | २८७ | १ | सभूयस्त्वम् | भूयस्त्वम् |
| २०३ | १९ | साधुश्रोत्रे० | साधुश्रोत्र० | ,, | १२ | दीपस | दीपसा |
| २०७ | २० | वत्तरचनेच्या | वृत्तरचनेच्या | ,, | १६ | सन्यांवर | सैन्यावर |
| २०८ | ११ | रचन | रचना | २८९ | १३ | याचा | यांचा |
| ,, | १२ | हा | हीं | २९० | २३ | ०ज्वलन | ०ज्वलनें |
| ,, | १५ | उपयुक्त | उपर्युक्त | २९४ | १६ | लिगें | लिंगें |
| २१२ | १६ | वानवासिका | नवासिका | २९४ | २७ | जनुसरलें | अनुसरलें |
| २१२ | १७ | खजा | खुजा | २९५ | १७ | घारे | घोरे |
| २१४ | २० | म्हटलेले | म्हटलेलें | २९६ | २७,२८ | मम्मचार्यांचें | मम्मटा-चार्यांचें |
| २१६ | २६ | यणार | येणार | | | | |
| ,, | २७ | मुळाच | मुळींच | ३०८ | ५ | शब्दाच | शब्दाचें |
| २२३ | १,२ | असें असें | असें | ३१३ | १२ | वर्णानम् | वर्णानाम् |
| २२६ | २२ | परिप ठ | परिपाठ | ,, | १४ | प्रसद | प्रसाद |
| २२८ | २ | मनाानें | मनानें | ३१४ | ९ | तधवां | तेधवां |
| २२९ | १५ | न हींत | नाहींत | ३२४ | ८ | मख्य | मुख् |
| २३१ | २५ | पत्रव्यवहरांत | पत्रव्यवहारांत | ३२६ | २२ | उदभूट | उद् |
| २४३ | ४ | रचन झोल | रचून झालें | ,, | २८ | हारादिवलंकारा | हारा-वलंकारा |
| २४६ | १२ | झ लेल्या | झालेल्या | | | | |
| ,, | २९ | असन | असून | ३२८ | २७ | काण | कोण |
| २४७ | ८,९ | लखणीचा | लेखणीचा | ३३२ | ८ | Spontaneou sover | Sponteneous over |
| २५१ | १४ | मांधांत | मांधाता | | | | |
| २५८ | ६ | वज्र | व्रज | ३३३ | १५ | than | then |
| २६४ | १५ | प्रत्यायास | प्रत्ययास | ३३४ | ४ | कवींच्या | १०. कवींच्या |
| २६९ | ३ | प्रादुर्भार्वां | प्रादुर्भावीं | ३३८ | ८ | वेध | मेध |
| ,, | २९ | जस्तिव | जीस्तव | ३४२ | १५ | ^ | तिच्या |
| २७४ | १ | पिध्ययाच | विध्यर्थांचें | ३४३ | २६ | नाहीं | म्हणत नाहीं |
| २७५ | २८ | स तान | संतान | ३४९ | ४ | अलें | आलें |
| २७६ | ७ | विमलु | विमळ | ३६५ | २९ | प्रोक्त | [illegible] |
| २८० | ५ | हेऊं | होऊं | ३७६ | ४ | अधुनिक | [illegible] |